शरत्-साहित्य माला—१

# चंद्रनाथ

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांच्या मूळ बंगाली कादंबरीवरून ]

: अनुवादक :

भा. वि. वरेरकर

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई ४

# प्रस्तावना

चंद्रनाथ या शरद्बाबूंच्या कथेच्या अनुवादाची ही दुसरी आवृत्ति आहे. पहिल्या आवृत्तीचा अनुवाद श्री. य. तेंडुलकर यानीं केला होता. त्या अनुवादामुळेंच या मालेंतील पुढील पुस्तकांचा अनुवाद करण्याचें काम प्रकाशकांनीं माझ्याकडे दिलें. श्री. तेंडुलकर यांनीं केलेल्या अनुवादांत प्रत्यक्ष बंगालच्या बोलभाषेचा पुरेसा परिचय नसल्यामुळें जीं कांहीं वैगुण्यें राहिलीं होतीं तीं या आवृत्तींत दुरुस्त करण्याबद्दल मला प्रकाशकांनीं सांगितलें. पण दुरुस्ती करण्यापेक्षां सर्वच अनुवाद पुन्हा स्वतंत्रपणें करणें मला जास्त इष्ट वाटलें. म्हणूनच या आवृत्तींत तशी योजना करावी लागली.

ज्या उत्साहानें श्री. तेंडुलकर यांनीं हा अनुवाद केला होता तो त्यांचा उत्साह ध्यानीं घेतां या मालेच्या यशाचा पहिला वाटा त्यांनाच द्यावा लागेल. त्या पहिल्या आवृत्तीला श्री. वि. स. खांडेकर यांनीं जी विस्तृत प्रस्तावना लिहिली होती ती बऱ्याचशा प्रमाणांत त्यावेळच्या त्या अनुवादावरच आधारलेली होती. प्रस्तुत अनुवाद वाचल्यावर कदाचित त्या प्रस्तावनेंतील कांहीं विधानें बदलावीं असें आजही त्यांना वाटणें शक्य आहे. त्या आवृत्तीची ती प्रस्तावना छापणें अवश्य होतें खरें, पण ज्या अनुवादासाठीं ती प्रस्तावना होती तो अनुवाद हा नसल्यामुळें आणि विशेषतः युद्धजन्य परिस्थितीच्या आजच्या काटकसरीमुळें प्रस्तावनेसाठीं एवढीं पानें खर्ची घालण्यापेक्षां शरद्बाबूंची एकादी छोटी कथाच समाविष्ट करणें जास्त योग्य वाटल्यामुळें प्रकाशकांना मी तसा सल्ला दिला.

आज प्रसिद्ध होत असलेलीं शरद्बाबूंच्या साहित्याचीं पुस्तकें शक्य तेवढीं एका आकाराची करण्यासाठीं, शरद्बाबूंनीं आपल्या ग्रंथप्रकाशनांत अवलंबिलेली प्रथा उपयोगांत आणायला मालेच्या शेवटच्या दोन ग्रंथापासून सुरवात केली आहे. या पहिल्या ग्रंथांत शरद्बाबूंच्या आणखी दोन कथा समाविष्ट करण्यांत आल्या आहेत.

प्रस्तुत मालेंत आजवर प्रसिद्ध होत असलेल्या पुस्तकांच्या भाषेंत फरक दिसून येत असल्याचें कित्येक विचक्षण वाचकांनीं माझ्या नजरेस आणून दिलें, त्याचा थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. आज जे अनुवाद प्रसिद्ध होत आहेत ते मूळ पुस्तकें ज्या कालानुक्रमानें प्रसिद्ध झालीं तसे झालेले नाहींत. प्रकाशकाच्या अनुकूलतेला अनुसरून हा कालानुक्रम पाळतां येत नसल्यामुळें, तीसपसतीस वर्षांच्या कालावधींत मूळ लेखकाच्या भाषेंत जी परिणती झालेली आहे, तिचें स्वरूप अनुवादांतही दिसून आल्यावांचून राहात नाहीं. त्यामुळें भाषेच्या संगतींत आज दिसणारा फरक राहणें अपरिहार्य आहे.

बंगाली मनोभूमि आणि बंगाली आचारविचार आपल्या महाराष्ट्रीयांच्या दृष्टीनें कांहीं कांहीं बाबतींत अगदींच भिन्न आहेत. त्या आचारविचारांचें स्पष्टीकरण अगदींच अवश्य असल्यावेळीं टीपा देऊन केलेलें आहे; पण मनोभूमीचें विश्लेषण करणें मात्र वंगवाङ्मयाच्या व्यापक अभ्यास न झालेल्या वाचकाच्या दृष्टीनें बरेंच कठिण जाईल. त्यासाठीं शरद्‌बाबूंच्या वाङ्मयाचा समालोचनात्मक स्वतंत्र ग्रंथ लिहिल्याशिवाय या विषयाचें सर्वांगीण विश्लेषण होऊं शकणार नाहीं. एवढें खरें, कीं मनोभूमि आणि मनोभावना यांच्या दृष्टीनें महाराष्ट्र हा देश बंगालपासून अगदींच वेगळा आहे हें ध्यानीं घेऊन या दोन्हीं वाङ्मयाची वाचकांनीं निरपेक्ष तुलना करावी.

हार्जी कासमवाडी
मुंबई ता. ३० डिसेंबर १९४४

भा. वि. वरेरकर.

# १

चंद्रनाथच्या पितृश्राद्धाच्या अगदीं आधल्याच दिवशीं कोणत्या तरी एका बाबतींत त्याचें आणि त्याचा चुलता मणीशंकर मुखोपाध्याय याचें भांडण झालें. त्याचा परिणाम असा झाला, कीं दुसऱ्या दिवशीं मणीशंकर जरी आपल्या वडील भावाच्या उत्तरक्रियेसंबधीं सर्व व्यवस्था करण्यासाटीं हजर राहिला तरीही तो त्या घरच्या एका पाण्याच्या थेंबालाही शिवला नाहीं, किंवा आपल्या घरच्या कुणाही माणसाला त्यानें शिवूं दिलें नाहीं. ब्राह्मणभोजन उरकल्यावर चंद्रनाथ हात जोडून म्हणाला, "काका, माझ्याकडून चूक होओ कीं गुन्हा होओ, माझे वडील तसेच आपण, मी आपल्या मुलासारखा—या वेळीं मला क्षमा करा."

पितृतुल्य मणीशंकर उत्तरादाखल म्हणाला, "बाबारे, तुम्हीं कलकत्याला राहून बी. ए. एम्. ए. होऊन विद्वान आणि बुद्धिमान झालां आहांत. पण आम्हीं सारे जुन्या काळचे मूर्ख आहोंत. तुमचं आमचं पटायचं नाहीं. हेंच पहा ना, शास्त्रकारानीं म्हटलंय,—मुळं कापून डहाळी शिंपायची."

आधुनिक पंडीत आणि जुन्याकाळचे मूर्ख याची शास्त्राच्या या वचनाशीं सांगड घालतां येत नसली तरीही मणीशंकरनें आपल्या मनांतला उद्देश ज्याप्रकारें उघड करून दाखवला तो चंद्रनाथला कळला. त्यानें मनातल्या मनांत प्रतिज्ञा केली, कीं यापुढें चुलत्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवायचा नाहीं. तसें पाहिलें तर त्याचा बाप हयात असताना देखील या दोन

गावांत फारसा सलोखा नव्हता. जेवणाखाण्याचा जेवढा व्यवहार पूर्वी होता तोही आतां बंद झाला.

चंद्रनाथच्या बापानें मागें भरपूर दौलत ठेवली होती. घरीं जवळचें असें कुणी नव्हतें. होता काय तो एक निपुत्रिक मामा आणि त्याची दुसरे-पणाची बायको.

सारें घर कसें खायला येऊं लागलें त्यावेळीं चंद्रनाथ घरच्या गुमास्त्याला बोलावून म्हणाला, "सरकारमहाशय, कांहीं दिवसासाठीं मी कुठंतरी दूर भटकायला जातोंय. इस्टेटीची व्यवस्था आपण आजवर जशी पहात होतां तशीच पहात जा. मला परत यायला बहुधा बराच अवकाश लागेल."

व्रजकिशोर मामानें विरोध प्रदर्शित करून म्हटलें, "यावेळीं कशाला कुठं जातोयस ? तुझं मन ताळ्यावर नाहीं. अशावेळीं घरीं रहाणच बरं."

चंद्रनाथनें तें ऐकलें नाहीं. इस्टेटीची व्यवस्था सरकारमहाशयांवर टाकून आणि घरादाराचा भार व्रजकिशोरवर सोंपवून अगदीं साध्या थाटांत तो मुलुखगिरीसाठीं निघाला. जायच्यावेळीं एका नोकरालासुद्धां त्यानें बरोबर येऊं दिलें नाहीं.

व्रजकिशोरला एका बाजूला बोलावून त्याची बायको हरकाली म्हणाली, "एक काम कसं केलं नाहीं तुम्हीं ?"

व्रजकिशोरनें विचारलें, "कोणतं काम ?"

"आता हा सफरीला गेला. चार ओळी कां लिहून घेतल्या नाहींत त्याच्या-कडून ? माणसाचं केव्हां काय होईल ते सांगतां का येतंय ? समजा, तिकडे कुठं तरी त्याचं अकस्मात काहीं बरंवाईट झालं, तर मग पुढं तुमची काय गत ?"

कानात बोटं घालून जीभ चावून व्रजकिशोर म्हणाला, "छे छे ! असलं काही बोलूं नकोस."

हरकाली रागाला आली आणि म्हणाली, "तुम्हीं असे हे भोळे, म्हणून असं बोलावं लागतंय मला ! शहाणे असता तर कशाला बोललें असतें ?"

पण तिच्या म्हणण्यात काहीं तथ्य होतें, हें तिच्याच कृपेनें व्रजकिशोरला चार दोन दिवसांत पटून आलें त्यावेळीं त्याला पश्चात्ताप झाला.

एक वर्षभर चन्द्रनाथ पुष्कळ ठिकाणीं एकटाच फिरत होता. वर्ष अखेरीला गयेला येऊन त्यानें आपल्या बापाचें वर्षश्राद्ध उरकलें खरें, पण

त्यानंतर घरीं जावें असें त्याला वाटलें नाहीं. कांहीं दिवसपर्यंत काशींत रहावें असा त्यानें बेत केला.

काशींत मुखोपाध्यायांचा पांडा हरिदयाळ घोषाल होता. एके दिवशीं दुपारीं एक कॅन्व्हासची बॅग हातीं घेऊन चंद्रनाथ येऊन त्याच्या घरीं हजर झाला. काशीला चंद्रनाथ अगदींच नवखा नव्हता. यापूर्वी तो आपल्या बापाबरोबर बऱ्याच वेळां इथें आला होता. हरिदयाळचा आणि त्याचा चांगलाच परिचय होता. तो असा अचानक आल्याचें पाहून हरिदयाळला जरा आश्चर्य वाटलें. माडीवरची एक खोली त्यानें चंद्रनाथच्या ताब्यात दिली आणि मर्जीला येईल तितके दिवस त्यानें तिथें रहावें असें ठरलें.

या खोलीच्या एका खिडकींतून आंतल्या सैंपाकघराचा कांहीं भाग नजरेला येत असे. चंद्रनाथ वारंवार या बाजूला बसून मोठ्या उत्सुकतेनें पहात रहात असे. ही उत्सुकता सैंपाकाच्या सामानाबद्दल नसे. त्याला चटक लागली होती ती सैंपाकीणबाईकडे पहात राहायची.

ती बाई सुंदर असली तरी विधवा होती. पण तिची मुद्रा दुःखाच्या जाळानें होरपळलेली होती. यौवन राहिलें आहे कीं नाहीं, तें सुद्धा डोळे उघडून पाहायची बुद्धि तिला नव्हती. ती आपल्याच कामात गुरफटून राहिलेली असे. एक दहा वर्षाची मुलगी तिच्या सैंपाकाच्या कामाला हाताजवळ मदत करीत असल्याचें दिसून येई. तिलासुद्धां चंद्रनाथ डोळे भरभरून पहात असे.

कांहीं दिवसपर्यंत ती चंद्रनाथच्या समोर बाहेर येत नव्हती. जेवणाचें ताट वाढून ठेवून निघून जात होती. हळुहळू ती बाहेर येऊं लागली. एक तर चंद्रनाथ तिच्यापेक्षा वयानें बराच लहान होता; शिवाय—दोन माणसें जास्त दिवस एका जागीं राहूं लागली, कीं आपोआप त्यांच्या ठायीं आपुलकी उत्पन्न होते—तसेंच झालें. हळुहळू ती स्वतः येऊन चंद्रनाथला वाढूं लागली आणि जवळ बसून एकाद्या आईप्रमाणें आग्रह कर करून त्याला खाऊं घालूं लागली.

चंद्रनाथला आपल्या आईची आठवण नव्हती—मातृहीन चंद्रनाथ आपल्या बापाच्या हाताखालींच खेळला वाढला होता.

पुष्कळ अंशीं त्याच्या बापानेंच आईची जागा जरी भरून काढली होती तरीहा असलें वात्सल्य मात्र तिथें त्यानें अनुभवलें नव्हतें.

बापाच्या मृत्युमुळें चंद्रनाथच्या हृदयांत जो कोपरा रिकामा पडला होता तो आतां नुसता भरून येऊनच राहिला नाहीं, तर मातृवात्सल्याच्या नव्या अनुभवामुळें तो सर्वस्वीं मोहाळून गेला.

एके दिवशीं चंद्रनाथनें हरिदयाळला विचारलें; "आपलं जवळचं असं कुणी नाहीं असा माझा समज होता. मग ही कोण ?"

हरिदयाळ म्हणाला, "ही सैंपाकीणबाई."

"कुणी नात्याची आहे का ?"

"नाहीं."

"तर मग ? ही कुठं मिळाली तुम्हांला ?"

हरिदयाळ म्हणाला, "तो एक इतिहास आहे. थोडक्यांत सांगायचं म्हणजे असं, कीं आपला नवरा आणि ही मुलगी यांना बरोबर घेऊन ही तीर्थयात्रेला आली होती. इथं काशींत तिचा नवरा वारला. गावीं कुणाकडे जावं म्हटलं तर आपलं म्हणायला कुणीच नव्हतं. त्याच्यापुढं हें पहातांहांच."

"मग ही आपल्याकडे आली कशी ?"

"मणिकर्णिकेच्या घांटाजवळ मुलगी भिक्षा मागत होती."

थोडा विचार करून चंद्रनाथ म्हणाला, "ही कोणत्या गांवची तें माहीत आहे का ?"

"नक्की माहीत नाहीं. नवद्वीपच्या जवळपास कुठल्या तरी गांवची असावी."

## २

एकदोन दिवसांनी जेवायला बसल्यावेळीं सैंपाकीणबाईकडे पाहून चंद्रनाथनें एकदम विचारलें, "आपण कोण शाखेच्या ?"

सैंपाकीणबाईचा चेहरा गोरामोरा झाला. या प्रश्नाचा उद्देश तिच्या ध्यानीं आला. पण ऐकलें न ऐकलेसें करून ती तशीच घाईघाईनें उठली आणि म्हणाली, "आधीं दूध आणतें हं."

दूध आणायची एवढी घाई नव्हती. ती सैंपाकघरांत गेली ती या प्रश्नाचें उत्तर मनाशीं ठरवण्यासाटीं. तिथें तिची मुलगी शरयूबाला भांड्यांत दुध ओतीत होती. आईच्या उतरल्या चेहऱ्याकडे तिचें लक्ष गेलें नाहीं. आईनें

मुलीच्या तोंडाकडे एकवार पाहीलें, दुधाची वाटी हातीं घेतली, एक दीर्घ निश्वास सोडला आणि आपल्याशींच म्हटलें, " दीन दुबळ्यांचा प्रतिपाळ करणाऱ्या अंतर्यामी परमेश्वरा, तूं मला क्षमा कर."

दुधाची वाटी आणून तिनें ताटाजवळ ठेवली तेव्हां चंद्रनाथनें पुन: तोच प्रश्न केला. एक एक गोष्ट ऐकत सारी हकीकत ज्यावेळीं त्यानें कळून घेतली त्यावेळीं चंद्रनाथनें शेवटीं विचारलें, " आपण घरीं कां जात नाहीं ? तिथं कुणी नाहींच का ? "

" आसरा देईल असं कुणीच नाहीं. "

खालीं मान घालून चंद्रनाथनें कांहीं वेळ विचार केला आणि म्हटलें, " आपल्याला एक मुलगी आहे, तिचं लग्न कसं करणार आहांत ? "

हृदयांतून येणारा सुस्कारा आवरून ती म्हणाली, " विश्वेश्वर जाणे ! "

त्याचें जेवण जवळजवळ होत आलें होतें. वर पाहून त्यानें विचारलें, " आपल्या मुलीला मी तशी चांगलीशी पाहिली नाहीं. हरिदयाळ म्हणतात, कीं मुलगी चांगली शांत आणि सुस्वभावी आहे. दिसायला बरी आहे का ?"

सैंपाकीणबाई थोडीशी हांसली आणि म्हणाली, " मी तिची आई—आईच्या नजरेवर कुणी विश्वास ठेवूं नये बाबा !—तरीपण माझी शरयू तशी कांहीं कुरूप नाहीं. "—पण मनांतल्या मनांत ती म्हणत होती, ' किती माणसं येतात या काशींत. पण असल सौंदर्य कुणी पाहिलंच नसेल. '

यानंतर तीनचार दिवस गेले. एके दिवशीं सकाळीं चंद्रनाथनें शरयूला डोळेभर पाहून घेतलें. त्याला वाटलें, असलें सौंदर्य जगांत दुर्भिळ !

सैंपाकघरांत बसून शरयू भाजी चिरीत होती, तिथें दुसरें कुणीच नव्हतें, आई स्नानासाठीं गंगेवर गेली होती आणि हरिदयाळ नित्याप्रमाणें यात्रेकरूंना गांठण्यासाठीं गेला होता.

चंद्रनाथ येऊन जवळ उभा राहिला. त्यानें हांक मारली, " शरयू ! "

शरयू चमकली. घाबऱ्याघुबऱ्या म्हणाली, " जी ! "

" तुला सैंपाक करतां येतो ? "

मानेनें होकार देत शरयू म्हणाली, " हो—येतो. "

" काय काय शिकली आहेस ? "

शरयू उगीच राहिली. सारें कांहीं सांगायचें म्हटलें तर पुष्कळच सांगावें लागलें असतें. तिच्या मनांतला उद्देश कळल्यामुळें त्यानें दुसराच प्रश्न केला, " तुझी आई अन् तूं अशीं दोघंही इथं आहांत का कामावर ?"

शरयूनें होकार दिला.

" तुम्हांला काय पगार मिळतो ?"

" पगार आईला आहे—मला नाहीं—मी जेवणावारी काम करतें."

" नुसती जेवणावारी काम करतेस ?"

शरयू उगीच राहिली.

चंद्रनाथ म्हणाला, " समज, मी तुला जेवायला घातलं, तर माझ्या घरीं करशील काम ?"

शरयू हळूच म्हणाली, " आईला विचारून सांगेन."

" मग विचार तर."

त्याच दिवशीं चंद्रनाथनें हरिदयाळ ठाकूरकडून चारदोन गोष्टींचा उलगडा करून घेतला आणि घरीं गुमास्त्याला पत्र लिहिलें तें असें:—

" मी काशींत आहें. या महिनाअखेर इथेंच लग्न करायचें मी ठरवलें आहे. मामांना ही हकीकत कळवावी आणि आपण स्वतः थोडी रोकड, दागिने आणि जरूर ते जिन्नसपान्नस घेऊन लौकर निघून यावें."

त्याच महिन्यांत चंद्रनाथचें शरयूशीं लग्न लागलें.

त्यानंतर घरीं जायची वेळ आली. शरयू रडत रडत म्हणाली, " आतां आईचं काय ?"

" तीही येईल आमच्याबरोबर."

सौदामिनीबाईनें तें ऐकलें. शरयूला एका बाजूला घेऊन ती म्हणाली, " ऐकलंस शरयू, तिथ गेलीस कीं मधून मधून माझी आठवण काढीत जा पण माझं नाव कधीं तोंडावाटे बाहेर काढूं नकोस. जिवंत आहें तोंवर ही काशी सोडून मी कुठंच जाणार नाहीं. तुम्हीं कुणी केव्हां या बाजूला आलां, तरच तुझी माझी भेट व्हायची."

शरयू रडूं लागली. आईनें आपल्या पदरानें तिचें रडें दाबून धरलें आणि गंभीरपणें म्हटलें, " पोरी, सारं कळूनसवरून सुद्धां रडतेस ?"

आईच्या कुशींत तोंड खुपसून मुलगी हुंदरली, " आई !—"

" जाऊं दे. आईच्या हितासाठींच जर आईला विसरून जावं लागलं, तर तीसुद्धां मातृभक्तीच बरं पोरी ! "

चंद्रनाथनें आग्रह धरला तरीही तिनें तेंच उत्तर दिलें—" काशी सोडून कुठंच जायचं नाहीं ! "

मनाचा कांहीं निश्चय करून चंद्रनाथ म्हणाला, " दुसऱ्या कुठं अगदीं जायचंच नसेल तर असं करा, काशींत स्वतंत्र घर करून रहा. "

सैंपाकीणबाईनें तो प्रस्तावसुद्धां स्वीकारला नाहीं. ती म्हणाली, " हरिदयाळ ठाकूर मला मुलीसारखी मानतात. माझ्या संकटाच्या काळांत त्यांनीं मला आसरा दिला. मीही त्यांना बापासारखी मानतें. तशीच भक्ति आहे माझी. त्यांना टाकून मला कुठं जातां यायचं नाहीं. "

बाई दुःखी असली तरी तिच्याठायीं स्वाभिमानाची जाणीव आहे, हें चंद्रनाथला कळून चुकलें. ती कळूनसवरून कुणाचे उपकार घेणारी नव्हती. अर्थातच एकट्या शरयूला घेऊन चंद्रनाथला आपल्या घरीं यावें लागलें.

इथें आल्यावर शरयूला सारें कांहीं कळून आलें. घर भलें मोठें होतें. सामानसुमान अगदीं भरपूर होतें. जिकडे तिकडे गडगंज भरलेलें दिसत होतें. तिच्या आश्चर्याला पार राहिला नाहीं. तिला वाटलें, केवढा हा अनुग्रह ! केवढी ही कृपा !

आपल्या बालवधूचें कौतुक करून चंद्रनाथ म्हणाला, " घरदार सारं पाहिलंस ? आवडलं तुला ? "

शरयू अगदीं लाजली. तोंडावर पदर ओढून घेऊन नुसत्या मानेनेंच तिनें होकार दिला चंद्रनाथला तिची आवडनिवड कळायला नको होती—तिचें बोलणें एकायचें होतें,—म्हणूनच तिच्या हनुवटीखालीं हात घालून तिचें तोंड वर उचलून तो म्हणाला, " सांग ना —आवडलं हें ? "

लाजेनें शरयूचा चेहरा लालीलाल झाला. नवरा पुनः पुनः विचारतो आहे म्हणूनच बोलायचें म्हणून ती बोलली, " हे सारं अगदीं तुमचंच ? "

चंद्रनाथ हंसला आणि तिचेच शब्द थोडेसे फिरवून म्हणाला, " हो. हें सारं तुझंच ! "

# ३

त्यानंतर बरेच दिवस निघून गेले. शरयू मोठी झाली होती. नवऱ्याची आवडनिवड कळून घ्यायला शिकली होती. तोंडांतून शब्द निघायच्या पूर्वी शरयू आपल्या मनांतली गोष्ट अचुक ओळखते हें चंद्रनाथला आतां कळून चुकलें होतें. नोकरच म्हणून म्हणायचें तर तीनत्रिभुवन धुंडाळूनसुद्धां चंद्रनाथला असला नोकर मिळाला नसता.

पण नुसतीं कामासाठीं राबणारीं नोकरमाणसें हवीं, म्हणून कांहीं कुणी लग्न करीत नाहीं. पत्नीपासून नवरा कांहीं तरी जास्त अपेक्षा करीत असतो. त्याला वाटे, स्त्रीची चालचलणूक एकाद्या नोकराच्या चालचलणुकीसारखीच सर्वस्वी नसती तर बरें झालें असतें. शरयूची वागणूक मोठी मनमोकळी होती—मोठी गोड होती—पण जोडप्यांतल्या जोडीदारणीची एक विशिष्ट भावना निर्माण करून त्याला सुखी करणें कांहीं तिला साधत नव्हतें. म्हणूनच जोडी जमली होती, कोडकौतुक होत होतें, तरीही दोघांच्या मधें असलेला एक प्रकारचा दुरावा कांहीं दूर होत नव्हता.

एके दिवशीं त्यानें शरयूला सहज विचारलें, "तूं अशी बावरटासारखी कां वागतेस ? मी कांहीं त्रास देतों का तुला ?"

शरयू आपल्याशींच म्हणाली, 'याचें उत्तर तुम्हांला माहीत का नाहीं !' तिला वाटलें, असें म्हणावें, 'तुम्हीं देवता, किती उच्च, किती महान्—आणि मी ? मी कुठली कोण ! तुम्हीं प्रतिपालक–मी आश्रित. तुम्हीं दाते–मी भिकारीण !'

कृतज्ञतेनें तिचें हृदय भरून उठलें होतें म्हणूनच प्रेमाचा बोजा माथीं घेऊन उभें रहाणें तिला अशक्य झालें होतें. रेतीखालीं लपलेल्या फल्गु-नदीप्रमाणें तो प्रेमाचा पाझर हृदयाच्या अगदीं तळाला भिजवून काढीत होता—बेफाम वहात नव्हता.

तसाच तो अविच्छिन्नपणें सारखा वहात राहिला होता पण चंद्रनाथला त्याचा पत्ता लागला नव्हता. एकादा हतभागी जीव उभ्या आयुष्यांत ईश्वराचा पत्ता न लागल्यामुळें जसा उदासवाणा होऊन जातो, तसाच शरयूच्या प्रेमाचा पत्ता न लागल्याचा परिणाम चंद्रनाथच्या मनावर झाला होता. पण आज

अकस्मात उजळत्या दिव्याच्या प्रकाशांत जेव्हां त्याला दिसून आलें, कीं कमलाच्या पाकळयासारख्या तिच्या टपोऱ्या डोळयांत एकदम आसवें भरून आलीं आहेत, त्यावेळीं कासावीस होऊन त्यानें तिला ओढून हृदयाशीं कवटाळलें. त्याच्या हृदयावर तिची मान कोमळून पडली होती.

चंद्रनाथ म्हणाला, " जाऊं दे. आतां ती गोष्टच नको—" असें म्हणून त्यानें आपल्या दोन्ही हातानीं तिचें तोंड वर उचलून धरलें.—झांकलेल्या डोळयांवर शरयूला एका तप्त निश्वासाच्या स्पर्शाची जाणीव झाली.

चंद्रनाथ म्हणाला, " एकदां माझ्याकडे पहा पाहूं—"

शरयूच्या डोळयाचीं पातीं एकमेकांना अशीं कांहीं चिकटून गेलीं होतीं, कीं डोळे उघडून पहाणें तिला अशक्य झालें.

एक क्षणभर थांबून एक मोठा सुस्कारा सोडून चंद्रनाथ म्हणाला, " मोठी घाबरट आहेस तूं शरयू ! म्हणुनच तुला पहावत नाहीं माझ्याकडे. पण एकदां पाहिलं असतंस तर बरं झालं असतं ! आतां असं कर, मी झोंपलेला असलों कीं एकदां डोळे भरून माझं तोंड पाहून घे. असं भीण्याजोगं कांहींच नाहीं माझ्या मुद्रेवर. हृदयाला हा कान लावला आहेस, आंतील बोल नाहीं का ऐकूं येत तुला ? मला वाईट वाटतं तें एवढ्यासाठींच शरयू, कीं तुला माझी ओळख पटली नाहीं. "

तरीही शरयू बोलली नाहीं. मनांतल्या मनांत पतिदेवाच्या पायाला प्रणाम करून ती म्हणाली, " मी पायाची दासी. दासीला जन्मभर दासीसारखंच राहूं द्या. "

## ४

चंद्रनाथची मामी हरकाली अलिकडे अत्यंत अस्वस्थ झाली होती. तिला एवढेंसुद्धां समाधान वाटत नव्हतें. देवानें काय ही आपली विटंबना चालवली आहे असें तिला वाटे. कुणाकुणाला हा संसार म्हणजे कांट्याकुट्यांनीं भरलेल्या जंगलासारखा वाटतो. एकादी पाउलवाट शोधीत असतात ते. या जंगलांत कुणाला वाट सांपडते—कुणाला सांपडत नाहीं. पुष्कळ दिवसांपासून हरकाली या संसाररूपी जंगलांत एक छोटीशी पाउलवाट शोधीत होती.

चंद्रनाथचा बाप वारला तेव्हां त्या वाटेचा थोडासा सुगावा तिला लागला होता. पण चंद्रनाथनें अचानक हें लग्न केलें, शरयू घरीं आली, चंद्रनाथचें पत्नी-प्रेम बेफाम वाढलें, त्यामुळें या सगळ मार्गावर मोटा थोरला धोंडा येऊन पडल्यासारखें तिला वाटलें. हरकालीची एक भाची पांच वर्षांपासून तिच्या माहेरीं वाढली होती—आज ती दहा वर्षांची झाली होती— पण ती गोष्ट कशाला ? हीं अशीं जीं एकामागून एक कारणें उत्पन्न होत होतीं त्यामुळें हरकालीच्या मनांतल्या सुखसमाधानाचा सारखा लोप होत होता.

तसें पाहीलें तर आज घरची घरधनीण तीच होती. तिचा नवराच घरचा कर्ता माणूस होता. पूर्वीसारखेंच सारें कांहीं होतें. शरयूसुद्धां आजपर्यंत तिच्या तोंडाकडे पहात राहिली होती. कधींही तिनें असंतोष किंवा अभिमान प्रकट केला नव्हता. वरवर पहाणाराला वाटलें असतें, कीं ती म्हणजे या कुटुंबांतली एक कुणीतरी सामान्य नोकर चाकरांपैकीं असावी. या संसारात तिला कांहीं अधिकार होता खरा, पण कुणाच्या तरी मर्जीवर तो आधारलेला होता.

तें पाहून हरकालीचा नवरा खूष होऊन म्हणायला सुरवात करी, "सूनबाई म्हणजे आमची एक—"

डोळे वटारून त्याला धमकावीत हरकाली म्हणे, "उगी रहा म्हणतें ना—उगी रहा. ज्यांत आपल्याला कांहीं कळत नाहीं त्यांत माणसानं कांहीं बोलूं नये. तुमच्या हातीं देण्यापेक्षां माझ्या आईबापांनीं हातपाय बांधून मला नदींत बुडवलं असतं तरी बरं झालं असतं !"

व्रजकिशोरचा चेहरा अशावेळीं काळा ठिक्कर पडे.

हरकालीची आतां तिशी उलटली होती. पण शरयूला मात्र अजून पंधरावें वर्षसुद्धां पुरें झालें नव्हतें. ती या घरीं आल्यापासून आंतल्या आंत दोघांचें जणूं कांहीं युद्ध जुंपलें होतें. जीवतोड केली तरी हरकालीला कांहीं जय मिळत नव्हता. एवढीशी आंगठ्या एवढी पोर—पण तिला एवढी ही ताकद कुठली ! तिची ताकद पाहून हरकाली थक्क होऊन जाई. पण बाहेरच्या लोकांना हें कळत नव्हतें, कीं या अंतर्युद्धांत शरयूनें डिक्री मिळवली होती पण ती अंमलांत आणली नव्हती. स्वत: मिळवलेली डिक्री स्वत:च जारी करून तो मिळवलेला वांटा तिनें फिरून प्रतिवादीलाच देऊन टाकला होता. हरकालीची हार झाली होती ती इथेंच.

हरकालीला माहीत होतें कीं शरयू जशी मुग्धदुर्बळ नव्हती तशीच बेअक्कलही नव्हती. ती खालच्या मानेनें कि येक करड्या बोलांचें असें कांहीं निरुत्तर उत्तर देत असे, कीं तें पाहून हरकाली स्तंभित होऊन जाई.

हरकालीला तिच्याशी तह करतां आला नाहीं कीं आपुलकीही उत्पन्न करतां आली नाहीं. शरयू जर भाडखोर किंवा तोंडाळ असती, स्वार्थी किंवा निर्दय असती, मत्सरी किंवा गर्विष्ठ असती, तर हरकालीला कांहींतरी मार्ग सांपडला असता. पण शरयूनें स्वतःच एवढी माया लावायचा प्रयत्न केला होता, कीं हरकालीला दुसऱ्या कुणापुढें मायेसाठीं हात पसरायची आतां सवडच राहिली नव्हती. या घरची आपण एकमेव मालकीण आहें याची शरयूला पुरीपुरी जाणीव होती. हरकालीचा या घरांत कांहीं अधिकार नव्हता—असें असूनही ती स्वतःच 'आपण कुणीच नाहीं' असें म्हणवून घेऊन, उलट हरकालीच सर्वाधिकारी बनवून बसली होती. याचमुळें हरकालीला चीड येत होती. मत्सराच्या जाळाखालीं ती भाजून पोळून मरत होती ती यामुळेंच.

हरकालीला केव्हांही प्रवेश करतां येऊं नये अशी एकच जागा शरयूनें स्वतःसाठीं राखून ठेवली होती. नवऱ्याच्या भोंवतालीं तिनें असा कांहीं एक नाजुक कोट उभारला होता, कीं त्याचा भेद करून आंत प्रवेश केल्याशिवाय चंद्रनाथच्या देहावरच्या एका रोमालाही कुणाला धक्का लावतां आला नसता. या कोटकिल्ल्याच्या बाहेर हरकालीनें वाटेल तें करावें. आत येण्याचा तिला प्रतिबंध होता. हरकाली बुद्धिमती होती. या आंगठ्याएवढ्या पोरीनें कोणत्या तरी जादुमंत्राच्या जोरावर आपल्या नखांतलें आणि दांतांतलें सारें विष नाहींसें करून टाकलें आहे, हें तिला कळून चुकलें होतें.

अशा रीतीनें कंटाळवाणीं वाटणारीं सहा वर्षें निघून गेलीं. अकरावें वर्ष लागलें तेव्हा ती नवऱ्याच्या संसारांत प्रवेश करती झाली होती—आतां तिला सतरावें वर्ष लागलें होतें.

## ५

वयाच्या लहान मोठेपणाची जाणीव ज्याप्रमाणें पुरुषांना असते त्याप्रमाणें ती बायकांच्या जातींत नसते. पुरुषाच्या वयांत बरेचसे पर्याय आहेत—जसें,

दहावें, विसावें, तिसावें, चाळीशी, पन्नाशी, साठी वगैरे. तीस वर्षांचा तरुण वीस वर्षांच्या तरुणावर आपला वरचष्मा गाजवूं शकतो पण बायकांच्या मंडळांत तो नियम चालत नाहीं. लग्न होईपर्यंत ती, मोठी बहीण, भावजय आई, आत्या, किंवा आजी यांच्याजवळ अल्पस्वल्प उमेदवारी करते,—स्त्रीजीवनांत जें कांहीं थोडें बहुत शिकण्याजोगें आहे तें शिकून घेते,—तें झाल्याबरोबर एकदम ती पहिल्या वर्गांत जाऊन बसते. सोळांपासून छप्पनपर्यंत साऱ्याच बायका समवयस्क ठरतात. स्थानभेदानें कदाचित कुठें कुठें थोडा बहुत फरक दिसून येतो पण बहुतांशीं यांत फारसा फरक पडत नाहीं. निदान चंद्रनाथची त्या गांवची मानीव आजी हरिबाला तरी आपल्या आयुष्यांत याच वर्गांतली असल्याचें दिसून येत होतें.

त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं पश्चिमेकडची खिडकी उघडून शरयू आकाशाकडे पहात मुकाट्यानें उभी राहिली होती. एक थाळी मिठाई आणि एक मोठी जुईच्या फुलांची माळ हातीं घेऊन हरिबाला शरयूपाशीं येऊन उभी राहिली. माळ तिच्या गळयात घालून ती म्हणाली, "आजपासून तूं माझी 'सई' झालीस. म्हण पाहूं सई !—"

शरयू मोठ्या पेंचांत पडली. तरीसुद्धां उगीच थोडेंसें हंसून म्हणाली, "ठीक !—"

"नुसतं ठीक म्हणून भागायचं नाहीं अक्का,—'सई' म्हणून हांक मारायला हवी."

याला माया म्हणा कीं हट्ट म्हणा—कीं लाडिकपणा म्हणा, शरयूच्या आयुष्यांत यापूर्वी असें कांहीं घडलें नव्हतें. म्हणूनच तो अचानक गळेपडूपणा तिला पचवतां आला नाहीं. एक आजीच्या वयाची बाई येते काय, एका क्षणांत गळीं पडते काय, आणि 'सई' म्हण म्हणून हट्टाला पेटते काय ! 'सई' म्हणायला तिला कसेंसेंच वाटूं लागलें. पण हरिबाला अगदीं हट्टाला पेटली होती. यांत कांहीं विशेष आहे किंवा अस्वाभाविक आहे असें वाटणें हरिबालेच्या कल्पनाशक्तीपलीकडचें होतें. तें आपुलकीचें संबोधन तोंडांतून बाहेर निघायला शरयूकडून विलंब होतो आहे असें पाहून ती थोडीशी गंभीर झाली—तितकीच जराशी ओशाळून म्हणाली, "तर मग माझी माळ परत दे !—मी जातें कुठंतरी दुसरीकडे !"

शरयू ओशाळली होती पण हटली नाहीं. थोडीशी हंसून ती हळुच म्हणाली, " सईच्या शोधार्थ वाटतं ? "

आजीबाई थोडावेळ थांबून तिच्याकडे पाहून म्हणाली, " वाः ! बरीच आहेस कीं ग ! बरी बोलतेस ! अन् हीं लोकं म्हणतात कीं या घरची सून मुखदुर्बळ आहे म्हणून ! "

शरयू हसूं लागली.

आजीबाई सांगूं लागली, "आतां माझं ऐक. या गांवांत तुला एकसुद्धां स्नेही-सोबती नाहीं. मोठ्या लोकांचं घर म्हणून म्हण, कीं तुझ्या मावशीच्या जिभेच्या गुणानं म्हण, कोण तुमच्या आसपास फिरकत नाहीं. कळलं ? म्हणूनच मी आलेंय. कांहींतरी नातं लावल्याशिवाय काहीं येतां येत नाहीं, तेव्हां म्हटलं आपली तुझी ' सई ' होऊन यावं. अशी म्हातारी झालेंय खरी पण सारखी माळ फिरवीत जप करीत कांहीं सारा दिवस वेळ काढतां येत नाहीं ? आतां मी रोज इथं येणार. "

शरयू म्हणाली, " रोज इथं येत जा आपण. "

हरिबाला गर्जून म्हणाली, " ' येत जा आपण ' काय ग ? ' सई, तूं रोज ये ' असं म्हणायचं. ' तूं ' म्हणवत नाहीं वाटतं ? "

शरयू एकदम हंसत सुटली आणि म्हणाली, " माफ करा आजीबाई. गळयावर सुरी ठेवलीत तरी तें व्हायचं नाहीं. "

आजीबाईसुद्धां हंसत सुटली. ती म्हणाली, " बरं, बरं. तें नाहीं तर नको म्हणूं. पण ' तुम्हीं ' म्हणायला हवं. म्हण—' रोज या तुम्हीं ! ' "

मान खालीं घालून शरयू गालभर लाज आणून हंसली आणि म्हणाली, " सई. रोज या तुम्हीं. "

हरिबालेचा जीव एकदांचा खालीं पडला. ती म्हणाली, " येईन बरं. "

दुसऱ्या दिवसापासून हरिबाला बहुधा रोज येऊं लागली. हजार कामें असलीं तरी दिवसांतून एकदां ती हजेरी देऊन जाई. हें जोडलेलें नातें हळु-हळू घट्ट होत चाललें. हरिबाला आपल्या वयाची नव्हे हें देखील शरयू हळुहळू विसरून जाऊं लागली. एकमेकांनीं असा गळयांत गळा घालून रहाणें चांगलें दिसत नाहीं हेंही आतां तिच्या ध्यानीं येईनासें झालें.

त्या दोघींचें हे निकट संघटन हरकालीला कितीसें रुचत होतें तें सांगतां

आलें नसतें, पण चंद्रनाथला मात्र तें अगदीं पसंत होतें. या बाबतींत तो आपल्या पत्नीबरोबर वारंवार चर्चा करी. आजीबाईनें एकाएकीं लावलेला हा सकृद्दर्शनीं अस्वाभाविक वाटणारा लोभ, म्हणजे त्या दोघांतला एक मौजेचा विषय होऊन राहिला होता.

आणखी एक कारण होतें. चंद्रनाथला आपल्या पत्नीबद्दल मोठा स्नेह वाटत होता. हृदय भरभरून उफाळणारें प्रेम नसलें तरी तिथें स्नेहाचा अभाव नव्हता. अशी स्त्री मिळणें सर्वांच्याच भाग्यीं नसतें असें त्याला वाटे. कुणाची बायको दासीसारखी, तर कुणाची मित्रासारखी, तर कुणाची मालकासारखी —त्याच्या भाग्यानें जर एक पुण्यवती, पवित्रा, साध्वी आणि स्नेहमयी दासी मिळाली होती तर त्याला वाटे, उगीच असमाधान वाटण्यात लाभ कोणता ?

त्याशिवाय एक गोष्ट वारंवार त्याच्या मनांत येई—शरयूच्या पूर्वायुष्यातील दुःखाची कहाणी. तिचें बालपण मोठ्या दुःखाकष्टांत गेलें होतें. दुःखीकष्टी आईची मुलगी या नात्यानें सारें आयुष्य तिला दुःखांत काढावें लागलें होतें. नशिबाच्या फेऱ्यांत सांपडून कदाचित आज ती कुणा दुरात्म्याच्या हातीं पडून डोळ्यावाटे टिपें गाळीत वहावली असती,—कदाचित कुठेंतरी दासी-पणा पत्करून शेंकडों प्रकारचे क्लेश आणि अत्याचार सहन करीत राहिली असती.—कदाचित देवानें दिलेल्या या सौंदर्यामुळें नरकाचा मार्ग सुद्धां तिला जवळ झाला असता,—तसें झालें असतें तर ?

अशी काहीं गोष्ट मनांत आली म्हणजे चंद्रनाथचें अंतःकरण करुणेनें भरून येई—आणि लाजत असलेल्या शरयूचें तोंड वर उचलून पाहून तो म्हणे, " खरंच सांग शरयू, मी जर तुला पाहिलं नसतं,—जर लग्न केलं नसतं तुझ्याबरोबर, तर आज तूं कुठं असतीस ? सांग ना ? "

शरयू उत्तर देत नसे. घाबरून नवऱ्याच्या हृदयाला बिलगून राही. मोठ्या स्नेहानें चंद्रनाथ तिच्या मस्तकावर आपला हात ठेवी—जणू काय तिला धीर देत तो म्हणत असे, ' भीति कसली ! '

शरयू अधिकाधिक बिलगत असे.—अशा कांहीं गोष्टी निघाल्या, कीं तिला मोठी भीति वाटे. याचा अंदाज असल्यामुळेंच चंद्रनाथ तिला आपल्या हृदयाशीं कवटाळून म्हणे, " तसं नव्हे शरयू, तसं नव्हे. दुःखी माणसाच्या घरांत तुला कां जन्म मिळाला कोण जाणे—पण तूंच माझी जन्मजन्मांतरींची

पतिव्रता स्त्री आहेस. या जगांत तूं कुठंही असतीस तरी तुझ्या ओढीमुळं मला तिकडे यावंच लागलं असतं. तूंच मला ओढून काशीला नेलं होतंस शरयू !"

अशा वेळीं त्याच्या हृदयांतून भावनेचा असा काहीं मोठा उमाळा येई, कीं त्याची तुलना शरयूच्या साऱ्या स्नेहानें, प्रेमानें, सेवेनें कीं भक्तीनें करतां आली नसती. असें होतें, तरीही दुःखी माणसाची दया येऊन, संकटांतून दुःखी जीवाला सोडवायच्या अभिमानानें जी वृत्ती येते तिला अनुसरून, छोट्या शरयूबरोबर लग्न करतांना जी आत्माभिमानाची आणि गर्वाची भावना प्रच्छन्नपणें चंद्रनाथच्या अंतरंगांत मुकाट्यानें शिरली होती ती इतकी स्थिर झाली होती, कीं शेंकडों प्रयत्न केले तरी तिचा संपूर्ण उच्छेद करणें चंद्रनाथला अशक्य होऊन बसलें होतें. हृदयाच्या एका अज्ञात अशा अंधाऱ्या कोंपऱ्यांत ही भावना दडी मारून बसली होती. ती ज्यावेळीं डोकें वर काढी त्यावेळीं चंद्रनाथ शरयूला आपल्या हृदयाशीं कवटाळून पुनः पुनः म्हणे, "मला मोठं आश्चर्य वाटत शरयू, चिरकाल जिला पहात आलोंय, तिला माझी ओळख पटायला असा कां उशीर लागतो ? काशीला तुला मी पहिल्यानं पाहिलं तेव्हांच मी ओळखलं, कीं तूं माझी ! किती युगांपासून, किती कल्पांपासून, किती जन्मजन्मांतरांपासून तूं माझी ! कां दुरावलों होतों कोण जाणे !—आतां पुनः अशीं एका ठायीं आलों ?"

त्याच्या हृदयावर तोंड टेकून—तोंड लपवून शरयू हळूच म्हणे, "कोण म्हणतं कीं मीं तुम्हांला ओळखलं नव्हत ?"

उत्साहाची परमावधी होऊन चंद्रनाथ शरयूचा लाजाळू चेहरा आपल्या चेहऱ्याशीं समांतर धरून म्हणे, "ओळखलं होतंस ? मग कां अशी घाबरटा-सारखी वागतेस ? मी काहीं तुला त्रास देत नाहीं. अगदीं माझ्या जिवापलिकडे तुझ्यावर माझं प्रेम आहे शरयू !"

पुनः नवऱ्याच्या हृदयावर तोंड लपवून शरयू उगीच राही. चंद्रनाथ पुनः प्रश्न करी, "बोल ना ? कां अशी घाबरतेस ?"

शरयूला उत्तर सुचत नसे. पतिदेवतेला प्रत्यक्ष स्पर्श केला असतांना खोटें कसें बोलायचें ? भीति वाटत नाहीं असें कसें म्हणायचें ? खरोखरच तिला फार भीति वाटत होती. ती भीति केवढी मोठी होती, किती खरी होती, हें तिच्याशिवाय दुसऱ्या कुणाला कळलें नसतें.

कोणती गोष्ट निघाली होती बरं ! हरिबाला येऊं लागल्यापासून चंद्रनाथला गंमत वाटूं लागली होती. शरयूला एक सखी मिळाली, मनांतल्या दोन गोष्टी उघड करून बोलायला कुणी माणूस मिळालें, हेंच कारण होतें चंद्रनाथच्या आनंदाचें.

एके दिवशीं शरयू सारी दुपारभर हरिबालेची वाट पहात बसलीं होती. आकाशांत ढग आले होते. झिमझिम पाऊस पडत होता.—हरिबाला आली नाहीं. शरयूला वाटलें, पाऊस पडतो आहे म्हणून आली नाहीं. संध्याकाळ होत आली होती. सारा दिवस ती एकटीच होती. हरकालीसुद्धां घरीं नव्हती त्यावेळीं धीर करून शरयू हळुहळु नवऱ्याच्या खोलींत येऊन पोहोंचली. विशेष जरूरी असल्याशिवाय या खोलींत दुसरें कुणी कधीं येत नसे -- शरयूसुद्धां येत नसे.

हातच्या पुस्तकावरून दृष्टि वळवून चंद्रनाथ म्हणाला. " आज तुझी मैत्रीण आली नाहीं वाटतं ? "

" नाहीं. "

" तेव्हां माझी आठवण झाली वाटतं ? "

शरयू उगीच थोडीशी हंसली. जणूं कांहीं ती म्हणत होती, ' आठवण सदा होते—पण धीर होत नाहीं यायचा. '

शरयू म्हणाली, " पाऊस पडतोय म्हणून आली नाहीं वाटतं ? "

" वाटतं काय ! तसं नव्हे—आज काकांची धाकटी मुलगी निर्मला—तिला आशीर्वाद करायला गेली आहे. लवकरच लग्न व्हायचंय तिचं—त्या गडबडींत आजीबाई गुंतली आहे वाटतं ? "

शरयू उद्गारली, " असं होय ! "

त्यानंतर चंद्रनाथ कांहीं वेळ उगीच राहिला होता—मग म्हणाला, " वाईट वाटतं तें एवढ्यासाठीं, कीं आम्हीं जवळचीं असून परकी झालों. मामी कुठंय ? "

" त्यासुद्धां तिकडेच गेल्यायत वाटतं ! "

चंद्रनाथ कांहीं वेळ तसाच विचार करीत उगीच बसला होता. शरयू हळुहळू त्याच्या जवळ आली आणि एका बाजुला बसून म्हणाली, " कसला विचार चाललाय ? सांगा ना ! "

चंद्रनाथनें एकदां हंसायचा प्रयत्न केला. शरयूचा हात आपल्या हातांत धरून तो हळुच म्हणाला, " विशेष कांहीं नाहीं शरयू, मी असं म्हणत होतों,

निर्मलेचं लग्न—पण काकांनीं आम्हांला नुसतं कळवलं सुद्धां नाहीं. अन् मामीला मात्र बोलावून नेलं. आम्हीं दोघंच काय तीं परकी झालों !"

त्याच्या आवाजांत जो थोडासा केविलवाणेपणा आला होता, तो शरयूच्या लक्षांत आला. ती म्हणाली, "आपल्या पायाजवळ तुम्हीं मला जागा दिली म्हणूनच परकी होऊन बसलांत त्यांना!—नाहींतर यापूर्वीच तुमचं भांडण मिटलं असतं."

चंद्रनाथ हंसला आणि म्हणाला, "भांडण मिटवायचा प्रश्न नाहीं. तुला टाकून काकांच्याबरोबर मिळतं घेतल्यानं काहीं विशेष फायदा झाला असता असं मुळींच वाटत नाहीं मला. बरा सुखांत आहें. मी तुझ्याबरोबर लग्न केलं त्यावेळीं काकांची संमती घ्यायला गेलों असतों तर मला वाटतं, तूं तर माझी झालीच नसतीस—कांहीं ना कांहीं अडचण त्यांनीं उपस्थित केलीच असती—कुळाच्या बाबतींत, लागाबांध्याच्या बाबतींत—कांहींना काहीं अडचण काढून त्यांनीं हें लग्न मोडलं असतं."

आंतल्या आंत शरयूच्या अंगावर कांटा उभा राहिला. संध्याकाळच्या छायेनें त्या खोलींत त्यावेळीं अंधार होत आला होता त्यामुळें कुणाचा चेहरा कुणाला दिसत नव्हता. पण जो हात त्यानें आपल्या हातीं धरला होता तो हात थरथर कांपूं लागल्यामुळें शरयूच्या मनांत आलेले विचार चंद्रनाथला आपो-आप कळून आले. चंद्रनाथ हंसून म्हणाला, "आतां कळलं ना? संमती घेतली नाहीं हें बरं केलं कीं वाईट केलं?"

क्षणभर थांबून शरयू म्हणाली, "कोण जाणे! पण माझ्यासारख्या अशा हजार जणी मिळवणं कांहीं कठीण गेलं नसतं तुम्हांला."

शरयूचा नाजूक हात त्याच्या हातांतच होता. तो हलुच थोडासा दाबून तो म्हणाला, "तें कुणी सांगावं. माझी कुणी, अशी ही एकच. ती मिळाली नसती तर काय झालं असतं तें मी पहातोंय. हजार प्रकारच्या कल्पना मनांत येतात—तूंच पहा विचार करून."

दुसऱ्या दिवशीं हरिबाला आली. पण तिची मुद्रा बरीच बदलली होती. रोजच्यासारखी एकदम गळयांत हात टाकून 'सई, सई' म्हणत तिनें धुडगुस घातला नाहीं, कीं खेळायच्यासाठीं पत्ते आण म्हणत पुनः पुनः तिनें आरडाओरडही केली नाहीं. तोंड वांकडें करून ती उगीच राहिली होती.

तो म्हणत होता, "तुझी मुलगी आतां मोठ्या घरीं पडलीय—काय झालंय तिला दोन हजार रुपये द्यायला ? पैसे मिळाले कीं मी चाललों !

सुलोचना म्हणत होती, "दारुड्याला, बदमाषाला दोन हजार रुपये किती दिवस पुरणार ? तुम्ही पुन: याल, पुन: पैसे मागाल—तें नकोय मला. काहींमुद्धां मिळायचं नाहीं तुम्हांला."

"मी दारू सोडीन—कांहीं तरी उद्योग धंदा करीन—पण यापुढं केव्हां-सुद्धां तुझ्याकडे हात पसरायला यायचा नाहीं."

सुलोचना यावर कांहीं बोलली नाहीं. जमिनीवर डोकें टेकून हात जोडून म्हणाली, "माझ्यावर दया करा. पैशासाठीं मी शरयूपुढं हात पसरणार नाहीं—"

दयाळठाकूर जवळ येऊन केव्हां उभे राहिले तें त्या दोघांपैकीं कुणा-च्याही लक्षांत आलें नव्हतें, म्हणूनच तें सारें भाषण जोरजोरानें चालू होतें. आतां दयाळठाकूर ज्यावेळीं एकदम समोर आले, त्यावेळीं तीं दोघेंही दचकलीं. त्या अपरिचित माणसासमोर येऊन दयाळठाकूरनीं विचारलें, "कुणाच्या परवानगीनं या घरांत पाय टाकलास ?"

पहिल्यानें तो माणूस थोडासा घाबरला. जेव्हां त्याला कळून आलें, कीं आपलें वर्तन कायद्याच्या दृष्टीनें गैर झालें आहे, त्यावेळीं त्यानें हळूच काढता पाय घ्यायला सुरवात केली—त्यावेळीं त्याचा हात कडकडून धरून हरि-दयाळनीं पुन: विचारलें, "बोल—कुणाच्या परवानगीनं आलास ?"

आतां पळून जातां येत नाहीं असें पाहून उसनें अवसान आणून तो म्हणाला, "मी सुलोचनेकडे आलों होतों."

बोलण्यासाठीं त्यानें तोंड उघडतांच वस्सकन दारूची घाण आली. आधींच तो नखशिखांत व्यसनानीं पछाडलेला, कुश्चळ झालेला दिसत होता. दयाळ-ठाकूरला चीड आली होती. दांतओठ चावून ते ओरडले, "पण कुणाच्या हुकमानं आलास ?"

"हुकूम कसला ?"

आता त्या माणसाची मुद्रा बदलली होती. प्रश्न करणाऱ्यावर आपल्याला सत्ता गाजवतां येईल याची त्याला आठवण झाली असावी. त्याला वाटलें असावें, कीं या घरांत आपला सुद्धां कांहीं तरी लागाबांधा आहे.

त्या उर्मट उत्तरामुळें दयाळठाकूर भडकले होते. मोठ्यानें ओरडून ते म्हणाले, " बेटा दारुड्या ! तुला तुरुंगांत डांबून टाकीन तें माहीत आहे ? "

तोंड वेंगाडून तो उद्गारला, " माहित आहे तर ! "

दयाळठाकूर यावेळीं अगदीं हातघाईला आले होते. ते म्हणाले, " माहित आहे का ? चल बेट्या, तुला पोलीसच्याच ताब्यांत देतों."

तो माणूस असा कांहीं हंसला, कीं जसा कांहीं तो आत्तांच पोलीसकडे जायला अगदीं तयार होता. तो म्हणाला, " आतांच देतां ? "

त्याला एक धक्का देऊन दयाळठाकूर म्हणाले, " हो हो, आत्तांच."

पडतां पडतां सावरून उभा राहून तो गंभीरपणें म्हणाला, " असं पहा ठाकूर, एकदम एवढा दिमाख दाखवू नका. कुठं पोलिसांतबिलिसांत द्यायचं असल तर इतकी घाई करूं नका. या काशींतून मीं तुम्हांला हुसकून बाहेर काढीन तें माहीत आहे ? "

हरिदयाळ भडकले होते. ते मोठमोठ्यानें ओरडून म्हणाले, " पाजी बेटा ! आज चाळीस वर्षे आहें या काशींत-अन् आतां तूं मला काशीबाहेर काढणार ?"

तो माणूस नुसता गुंडपणा करतो आहे असें त्यांना वाटलें होतें. दुसरा कुणी असता तर या तंबीला घाबरला असता. पण दयाळठाकूर आज कित्येक वर्षे काशींत रहात होते. त्यांना या गुंडगिरीचें कांहींच वाटलें नाहीं. रागारागानें ते म्हणाले, " मला तंबी देतोस काय बेट्या ?—माझ्याजवळ ही गुंडगिरी ! "

" गुंडगिरी नव्हे ठाकूर—तंबीही नव्हे. चला ना, द्या मला पोलीसच्या ताब्यांत. तिथंच काय सांगायचं तें सांगतों. "

" काय सांगणार आहेस तिथं ? "

" तेंच तें !—तें सांगितलं कीं तुम्हांला ही काशी सोडून पळ काढावा लागेल देशोधडीला. तें सांगितलं कीं साऱ्या लोकांना कळून चुकेल, कीं तुम्ही ब्राह्मणाच्या जातींतून भ्रष्ट झालाहांत. "

" मी भ्रष्ट झालोंय ? "

" रागावूं नका ठाकूर. तुम्हींच तेवढे जातीभ्रष्ट झालांहांत असं नव्हे, तर गेल्या तीन वर्षांत जो जो कुणी तुमच्या घरीं येऊन जेवला आहे तो तो माणूस जातिभ्रष्ट झाला आहे, हेंच सर्वांना डांगोरा पिटून सांगणार आहें मी. "

दयाळ ठाकूर घाबरले. भीतीचें खरें कारण जरी अजून त्यांना कळलें नव्हतें तरी आतांपर्यंतचा त्यांचा चढा आवाज एकदम खालीं उतरला. तरीही ते म्हणाले, "मी लोकांची जात बुडवली ?"

"हो हो, तें शाबीत करायची जबाबदारी आहे माझ्यावर."

ठाकूर आतां जरा नरम आले. आवाज अगदींच खालीं आणून म्हणाले, "काय आहें तें एकदां उघड करून सांग ना बाबा."

तो माणूस हळुच हंसला आणि म्हणाला, "एकटे ऐकणार कीं आणखी दहापांच माणसं बोलावणार ? मी म्हणतों, कुणा चारचौघांना बोलावाच. मी काय सांगणार आहें तें तुमच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं सुद्धां ऐकलेलं बरं."

दयाळठाकुरांनीं त्याचा हात धरला आणि म्हटलें, "असा रागावूं नकोस बाबा. रागाच्या भरात मी कांहींतरी बोलून गेलों तें कांहीं मनांत ठेवूं नकोस. ये, आंत ये."

दोघेही माजघरांत आले तेव्हां दयाळठाकूरनीं विचारलें, "आतां बोल."

तो म्हणाला, "ही सुलोचना. आजवर तुम्हीं हिच्या हातचं जेवतांहां— कुठं सापडली ही तुम्हाला ?"

"इथंच सांपडली. दुःखी बिचारी—म्हणून आसरा दिला मी."

"तुम्हीं पैसेवाल्याला आश्रय दिला असं कांहीं मी म्हणत नाहीं. पण ती कुठल्या जातीची आहे याची चौकशी केली होती का ?"

दयाळठाकुरची मुद्रा एकदम गोरीमोरी झाली. ते म्हणाले, "ब्राह्मण-कन्या—विधवा—आचरणानं चांगली आहे—मग तिच्या हातचं खायला दोष कसला ?"

"ब्राह्मणकन्या आणि विधवा—हें खरं आहे. पण ती जर घर टाकून गेली असली तर तिला कोण शुद्धाचरणी म्हणेल का ? तिच्या हातचं कुणी जेवील का ?"

दयाळठाकूर जीभ चावून म्हणाले, "शिव शिव, असं कधीं झालंय !"

"तसंच झालंय. पंधरासोळा वर्षांपूर्वी आपली तीन वर्षांची मुलगी घेऊन सुलोचना घराबाहेर पडली होती, तिला आश्रय देऊन आपण आपल्या-बरोबरच आणखी दहापांच लोकांची जात बुडवलीय !"

"याला प्रमाण ?"

" प्रमाण आहे तर ? त्याची काळजी नको तुम्हांला. ज्याच्यासाठीं तिनं घर टाकलं तो तिचा प्रेमाचा पुतळा राखाल भट्टाचार्य अजून जिवंत आहे. "

दयाळठाकूर त्या माणसाच्या चेहऱ्याकडे काहीं वेळ पहात राहिले. हाच तो राखाल असावा असें त्यांना वाटलें. ते म्हणाले, " तूं ब्राह्मण का ? "

आपल्या अंगावरच्या मळक्या उपरण्याखालचें त्याहीपेक्षां कळकट जानवें बाहेर काढून दाखवीत तो म्हणाला, " तर काय गवळी ? "

दयाळठाकूर एक पाऊल मागें हटून म्हणाले, " पाहिलं तर दिसतोस म्हारासारखा. तरी पण बाबा नमस्कार ! "

तो माणूस रागाला आला नाहीं. तो म्हणाला, " नमस्कार. आपला अंदाज चुकीचा नाहीं. म्हार म्हटलंत, धेड म्हटलंत, मुसलमान ख्रिश्चन म्हटलत तरी चालेल, मी जात मानीत नाहीं. मी परमहंस आहें. "

" तूं बदमाष आहेस ! "

तो म्हणाला, "उगीच कशाला त्या गोष्टीची मला आठवण देतां ? पुष्कळांनीं मला तें विशेषण लावलंय. यापूर्वी कोण होतों, आतां कोण झालोंय, तें आतां कळलंयच. पण मीच तो राखालदास. "

दयाळठाकूर रागानें लालीलाल झाले. कसेंबसें मन आवरून ते म्हणाले, " आतां काय करणार आहेस ? सुलोचनेला घेऊन जाणार आहेस ? "

" जी—नाहीं. आपल्या जेवणाखाणाची गैरसोय होईल त्यामुळं, तें माहीत आहे मला. मी एवढा नराधम नाहीं. "

जिवावर येऊन दयाळठाकुरनीं हे त्याचे कुजके उद्गार दृष्टिआड केले. ते म्हणाले, " मग काय पाहिजे तुला ? कशाला आलायस आतां ? "

" पैसा हवा आहे. पैसा दुर्मिळ झालाय म्हणूनच नाइलाजानं आलोंय–हजार दोन हजार मिळाले कीं मुकाट्यानं निघून जाईन, हेंच सांगायला आलोंय. "

" एवढे पैसे तुला देणार कोण ? "

" ज्याला गरज असेल तो. आपण द्याल—सुलोचनेचा जांवई देईल—तो बडा माणूस आहे ना ? "

त्याची ही मिजास पाहून दयाळठाकूर मनांतल्या मनांत स्तंभित झाले. तो जसा फार धूर्त होता, तितकाच कावेबाज होता हें त्यांना कळून चुकलें होतें. ते म्हणाले, " बाबा रे, आम्ही दरिद्री माणसं, एवढी मोठी रक्कम कधीं

डोळ्यांनीं पाहिली सुद्धां नाहीं. सुलोचनेच्या जांवयाला तेवढी रक्कम देतां येईल हें खरं—पण तो द्यायचा नाहीं. त्याची तुला ओळख नाहीं. तंबी देऊन त्याच्या कडून दोन हजार रुपये उकळायची गोष्ट तर दूरच राहो—पण दोन पैसेसुद्धां मिळायचे नाहींत तुला. तूं मोठा अक्कलवान आहेस याचा अंदाज मला आलाय. पण तो तुझ्यापेक्षांही जास्त अक्कलवान आहे. दुसरी कांहीं तरी शक्कल काढ. हें कांहीं तिथं चालायचं नाहीं."

दयाळच्या तोंडाकडे कांहीं वेळ पाहून राखाल उगीच थोडासा हंसला. तो म्हणाला, "त्याची काळजी मला आहे. पाहूं तर खरं. यत्ने कृते यदि—

दयाळठाकूर मधेंच म्हणाले, "राहूं दे बाबा, देवभाषेची उगीच विटंबना करूं नको."

राखाल दिमाखानें म्हणाला, "जशी आपली आज्ञा. पण आतां मला इथं बसायला वेळ नाहीं. त्याचा पत्ता सांगा ना मला ?"

दयाळ म्हणाले, "सुलोचनेलाच विचार ना बाबा."

राखाल म्हणाला, "ती सांगत नाहीं. पण आपल्याला सांगावा लागेल."

"आणि नाहीं सांगितला तर ?"

राखाल शांतपणें म्हणाला, "सांगावाच लागेल. बरं—नाहीं सांगितलात तर काय करीन तें मी आधींच सांगितलंय."

दयाळठाकूरांचा चेहरा उतरला. ते म्हणाले, "मी कांहीं तुझं घोडं मारलं नाहीं बाबा."

राखाल म्हणाला, "नाहीं. कांहींच केलं नाहींत. म्हणूनच म्हणतोंय, आतां कांहींतरी करा. नांवपत्ता सांगितलात, कीं जाऊन आमच्या जांवईबुवाला भेटेन आणि आशीर्वाद देऊन येईन—मुलीलाही एकदां पाहून घेईन—फार दिवस पाहिली नाहीं ना तिला !"

अंतरांत दयाळठाकूर घाबरले होते, तरीही मुद्रेवर बेफिकिरी दाखवून म्हणाले, "मी कांहींसुद्धां करणार नाहीं. तुला जें काय करायचं असेल तें कर. नकळत माझ्या हातून पाप घडलंय, त्याच्यासाठीं प्रायःश्चित्त करीन. मला कसली आलीय भीति ?"

"भीतीचा प्रश्न नाहीं—पण पांड्यांच्या जमातींत ही गोष्ट आजच्या आज फैलावेल. मग काय वाटेल तें करीन, सुलोचनेच्या जांवयाचा

पत्ता लावीन, अन् त्यालासुद्धां या साऱ्या गोष्टी सांगेन. नमस्कार ठाकूर. मी चाललों."

तो खरोखरच जातो आहे असें पाहून दयाळठाकूर त्याचा हात धरून त्याला बसवून घेऊन समजावणीच्या स्वरानें म्हणाले, "बाबारे, असा मला थोडक्यांत सोडणारा माणूस तूं नव्हेस तें मला पटलंय. असा रागावूं नकोस. माझं सांगणं ऐक. इतक्यांतच या गोष्टीची बकवा करूं नकोस. एक आठवडाभऱ्यानें ये, म्हणजे काय करतां येतं तें पहातों."

"ध्यानांत ठेवा, त्या दिवशीं मात्र मी असाच परत जायचा नाहीं."

त्याच्याकडे टवकारून पाहून दयाळबाबू म्हणाले, "काय रे बाबा, खराच का तूं ब्राह्मणाचा मुलगा ?"

"जी होय."

एक मोठा सुस्कारा सोडून दयाळठाकूर म्हणाले, "आश्चर्य आहे! बरं बरं—एका आठवड्यानं ये. तोंवर कांहीं बकवा करूं नकोस—समजलास ?"

"जी." असें म्हणून राखाल एकदोन पावलें जाऊन पुन: मागें फिरला आणि म्हणाला, "असं पहा, दोन रुपये द्या मला. मनी बॅग कुठं हरवली वाटतं!" असें म्हणून तो दांत विचकून हसूं लागला.

आतां त्याच्याकडे रागानें पहाणेंसुद्धां दयाळठाकूरनां कठीण गेलें. मुकाट्यानें दोन रुपये काढून त्यांनीं त्याच्या हातीं दिले. ते कनवटीला लावून तो निघून गेला.

तो निघून गेला खरा पण दयाळबाबू मात्र तिथेंच स्तब्ध होऊन बसून राहिले होते. हजारों विंचवांच्या नांग्या चोंहींकडून आपल्या अंगावर मारल्या जात असल्याचा भास त्यांना होत होता.—

## ७

पण सुलोचना कुठें होती ? आज तीन दिवस जेवणखाण, पूजापाठ, यात्रेकरूंचा शोध वगैरे सारें कांहीं बंद करून हरिदयाळ तिच्या शोधार्थ सारी काशी पालथी घालीत होते. तरीही तिचा पत्ता लागत नाहीं असें पाहून ते घरीं आले आणि कपाळावर हात मारून म्हणाले, "विश्वेश्वरा! काय हें संकट

आणलंस ? अनाथाला दया दाखवतांना शेवटीं पदरीं पाप बांधायचाच योग यावा का ? "

गल्लीच्या टोंकाला कैलासकाकाचें घर होतें. तिथें जाऊन हरिदयाळनीं पाहिलें पण घरांत कुणीच नव्हतें. त्यांनीं हांक मारली, " काका आहे का घरांत ? "

कोण उत्तर देत नाहींसें पाहून ते आंत गेले. पहातात तों दिव्याजवळ बसून कैलास एकटाच बुद्धिबळें खेळण्यांत गुंग झाला होता. ते म्हणाले, " एकटेच का खेळतांहां काका ? "

वर पाहून काका म्हणाला, " या बाबाजी. हा एवढा उंट वांचवून दाखवा पाहूं. "

हरिदयाळ संतापला होता. मनांतल्या मनांत त्याला एक शिवी हांसडून तो म्हणाला, " स्वतःची जात बचावतां येत नाहीं, तो बुद्धिबळातला उंट कसा बांचवूं ? "

ते उद्गार कैलासच्या कानीं अर्धे गेले तर अर्धे गेले नव्हते. त्यानें विचारलें, " काय म्हणतां बाबाजी ? "

" मी म्हणतों —त्या दिवशींची भानगड कळली का ? "

" कसली भानगड ? "

" त्या दिवशीं आमच्या घरीं जो गोंधळ पडला होता तो ! "

कैलास म्हणाला, " नाहीं बाबाजी, चांगलंसं ऐकूं आलं नाहीं. मला वाटतं तो गोंधळ अगदींच हळुहळू झाला —पण त्या दिवशीं मात्र मी तुमचा उंट मारला खास ! "

मनांतल्या मनांत हरिदयाळनें त्याच्या बेचाळीस पूर्वजांचा उद्धार केला. ते म्हणाले, " तें खरं आहे. पण ती भानगड कळली का तुम्हांला ? "

क्षणभर विचार करून कैलास म्हणाला, " नाहीं. तसं कांहीं फारसं ऐकलं नाहीं. अशी जर हळुहळूच गडबड केली तर दुसऱ्याच्या कानीं जाईल कशी ! पण त्या दिवशीं कुणाकुणाचा खेळ कसा कसा जमला होता तें आठवतं ना ? शेवटीं तुम्हाला वजीर कांहीं बचावतां आला नाहीं ! ठीक—हा असा इथं होता—आतां दाखवा पाहूं वांचवून. कसं ?— "

हरिदयाळ चिडून म्हणाले, " वजीर गेला चुलींत. मी असं विचारतोंय, त्या दिवशींची बातमी कांहीं आली आहे का तुमच्या कानीं ? "

हरिदयाळच्या चिडलेल्या चेहऱ्याकडे पाहून बिचारा काका ओशाळला आणि म्हणाला, " कोण जाणे बाबाजी—नीटसं कांहीं आठवत नाहीं. "

क्षणभर थांबून हरिदयाळ गंभीरपणें म्हणाले, " या जगांत येऊन कांहींच केलं नाहीं तुम्हीं —पण परलोकावर तरी विश्वास आहे ? "

" आहे तर ! "

" मग ? त्याची काय व्यवस्था केली आहे ? कधीं एक दिवस देवळांत तरी गेलां होतां ? "

कैलास चकित होऊन म्हणाला, " हें काय बोलणं झालं दयाळ ? देवळांत गेलों नाहीं मी ? किती वेळ तरी गेलोंय. "

तितक्याच गंभीरपणें दयाळठाकूर बोलूं लागले, " आज वीस वर्षें या काशींत आहां, पण मला वाटतं वीस दिवससुद्धां देवदर्शन घेतलं नसेल तुम्हीं. पूजापाठ तर दूरच. "

कैलास त्याला खोडून म्हणाला, " नाहीं दयाळ, वीस दिवसांपेक्षां खात्रीनं जास्त वेळां गेलोंय. आणखी असं पहा बाबाजी, वेळच मिळत नाहीं मग पूजाबिजा व्हायची कशी ? आतां हेंच पहा ना, सकाळींच उठून शंभू मिश्राबरोबर दोन डाव टाकावे लागतात. माणूस खेळतो छान ! एक डाव पुरा होईतों दुपार टळून जाते. त्यानंतर स्नानसंध्या जेवण होईपर्यंत तिसरा प्रहर उलटतो. त्यानंतर बाबाजी, गंगा पांडे आहे—तुम्हीं कांहीं म्हणा पण तो माणूस अजब खेळतो ! त्यादिवशीं बेट्यानं माझ्यावर जवळजवळ मातच केली होती. घोडा आणि हत्ती दोघेही दोन कोपऱ्यांत दाबून टाकून—मी काय म्हणतों तें ऐकलं ? "

" अरे बाबा, आतां पुरे झालं. दुपारीं काय करतां तें आधीं सांगा. "

"दुपारीं होय ? गंगा पांडेबरोबर त्याचे ते दोन हत्ती—कालच काय झालं—"

दयाळठाकूर अतिशय चिडीला आले आणि म्हणाले, " कळलं कळलं दुपारीं गंगा पांडे आणि संध्याकाळीं मुकुंद घोषाळचा बैठकखाना – आतां वेळ कसा मिळावा तुम्हाला ? "

कैलास उगीच राहिला असें पाहून हरिदयाळ अधिकच गंभीर झाला आणि त्याला बोधामृत पाजूं लागला, " पण काका, आतां किती दिवस राहिलेयत ? आतां कांहीं परलोकाची तयारी तर केली पाहिजे ! निदान थोडा-

बहुत विचार तर केला पाहिजे. बुद्धिबळाची पिशवी घेऊन कांहीं स्वर्गाला जातां यायचं नाहीं."

कैलास एकदम हो हो करीत हंसत सुटला आणि म्हणाला, "नाहीं दयाळ, बुद्धिबळाची पिशवी मला वाटतं बरोबर नेतां यायची नाहीं! अन पुढची तयारी करायची म्हणतां का बाबाजी? मी केव्हांही तयारच आहें. ज्या दिवशीं हांक येईल त्याच दिवशीं कुणाच्या तरी हातीं हें सारं सोंपवून सरळ जायला निघेन. त्याची कसली काळजी करायची?"

"पण गांठचं कांहीं आहे ना? त्याचं काय व्हायचं?"

"कांहींच नाहीं बाबाजी, कांहींच नाहीं. ज्या दिवशीं माझी कमला निघून गेली, ज्या दिवशीं माझ्या कमलचरणनें माझ्या तोंडाकडे पहात पहात डोळे मिटले त्याच दिवसापासून सारी भीति, सारे संशय त्यांच्या मागनं मागनंच निघून गेले. कसे गेले तें मला कळलंसुद्धां नाहीं बाबाजी." बोलतां बोलतां म्हाताऱ्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

दयाळठाकूर म्हणाले, "जाऊंदे तें. आतां मी काय सांगतों तें ऐकलं?"

"बोला बाबाजी."

दयाळ ठाकूरनीं त्या दिवशींची सारी हकीकत त्याला तपशिलवार सांगितली. शेवटीं ते म्हणाले, "आतां काय करायचं?"

ती हकीकत ऐकत असतांना कैलासचा सदा हंसतमुख असणारा चेहरा एकदम पांढरा फटक पडला. तो अगदीं कळवळून म्हणाला, "छे छे! असं होणंच शक्य नाहीं हरिदयाळ. सुलोचना म्हणजे एक सती साध्वी आहे."

दयाळ म्हणाले, "मलासुद्धां तसंच वाटलं होतं. पण या बायकांच्या बाबतींत कुणी खात्री देऊं नये."

"छे! छे! असं बोलूं नकोस. माणसाच्या हातून पापपुण्य हें घडतंच, त्यांत स्त्रीपुरुष भेद कसला पाह्यचा? तुमच्या आईची हकीकत ध्यानांत आहे ना तुमच्या बाबाजी? कीं तीसुद्धां विसरून गेलांहांत?"

हरिदयाळ ओशाळले—तितकीच त्यांना चीडही आली. कांहीं वेळ मान खालीं घालून नंतर ते म्हणाले, "पण आतां जात बुडेल ना?"

कैलास म्हणाला, "तर मग प्रायश्चित्त घे. नकळत घडलेल्या पापाला काय प्रायश्चित्तच नाहीं?"

" आहे तर !—तरीदेखील इथले लोक मला वाळींत टाकतील."

" टाकीनात वाळींत ! —"

हरिदयाळ एकदम उसळून उठून म्हणाले, " टाकीनात वाळींत ! म्हणतां काय ? जरा शुद्धीवर येऊन बोला काका."

" शुद्धीवरच बोलतोंय दयाळठाकूर ! असं पहा, आतां तुमचं वय झालंय—मला वाटतं पन्नाशी उलटली असेल—एवढीं वर्षं जातींत होतां—राहिलेलीं चारदोन वर्षं गेलीं हातचीं म्हणून काय बिघडलं बाबाजी ? काय असं मोठंसं नुकसान होणार आहे ? "

" काय नुकसान होणार ? जात जाईल, धर्म जाईल, परलोकीं याचा जाब काय देऊं ? "

कैलास म्हणाला, " एका अनाथ स्त्रीला आसरा दिला, असा द्या ना जाब ! "

हरिदयाळ उगीच राहून विचार करूं लागले. त्यांच्या मनांत आलेल्या विचारांशीं ही सूचना जुळती नव्हती. थोडा वेळ थांबून ते म्हणाले, "तर मग सुलोचनेच्या जांवयाचा पत्ता देऊं नको म्हणतां ? "

" मुळींच द्यायचा नाहीं. एक बेटा बदमाष दारुड्या येतो काय आणि तंबी देऊन तुमच्या कडून पैसे उकळतो काय ? आणखी एका सभ्य गृहस्थाकडून तसेच पैसे उकळायला का तुम्हीं मदत करणार आहांत त्याला ? "

" पण नाहीं केलं तसं तर माझं सर्वस्व बुडतं ना ? एकसुद्धां यजमान यायचा नाहीं मग माझ्या घरीं. मग कसं चालेल माझं ? "

कैलास म्हणाला, " त्याची काळजी तुम्हांला नको. सरकार बहादुरच्या कृपेनं मला वीस रुपये पेन्शन मिळतंय. तुम्हींन् मी —चुलत्यापुतण्याचं त्यांत कसंबसं भागून जाईल तेवढंच. आपण जेवूं खाऊं आणि बुद्धिबळ खेळूं. घराबाहेर पाऊलसुद्धां टाकायचं नाहीं मग."

हरिदयाळला चीड आली होती —पण त्याचे ते बाळबोल ऐकून ते हंसले आणि म्हणाले, " काका, हा माझा बोजा तुमच्या माथीं कां ठेवूं ?—तसंच दुसऱ्याची भानगड माथीं घेऊन मी तरी माझी जात कां बुडवूं ?—त्यापेक्षां —"

कैलास म्हणाला, " वा: वा: छान ! म्हणजे त्याचं नांव गांव कळवून एका गरीब बिचाऱ्या पोरीला नवऱ्याच्या घरांतून-संसारांतून, सुखासमाधानातून

हुसकून बाहेर का काढणार ? हीं म्हातारीं हाडं कोल्ह्याकुत्र्यांच्या हातून वांचवावीं असं नाहीं का वाटत तुम्हांला ? वांचतील बरं बाबाजी ! पण ही गोष्ट मला विचारायला आलांत इथंच चुकलं. आतां ज्याअर्थी माझी सल्ला घ्यायला आलांहांत त्याअर्थी आणखी एक गोष्ट सांगतों, या वाराणशी क्षेत्रांत अन्नपूर्णेचं साम्राज्य आहे—इथं राहून तिच्या सतीसावित्री पोरींचा छळ करणं चागलं नव्हे बाबा !"

हरिदयाळ संतापून म्हणाला, "आतां शाप देण्यावर आलांत वाटतं काका? "

"नाहीं. तुम्हीं काशीचे पांडे—खुद्द बाबा विश्वेश्वराचीं वाहनं तुम्हीं ! आमचे शाप तुम्हांला बाधायचे नाहींत. ती भीति नको तुम्हांला. पण ज्या कामाला हात घालतांहांत तें साधंसीधं काम नव्हे. त्याचे परिणाम फार भयंकर होतील. सतीसावित्रीला यमसुद्धां भीतो याची आठवण देतोंय तुम्हांला. तुमच्याबरोबर मी खेळलोंय—पुष्कळ डाव टाकलेयत—तसा लोभही लागलाय तुमचा—"

हरिदयाळनीं यावर उत्तर दिलें नाहीं. काळवंडल्या मुद्रेनें ते उठून उभे राहिले.

कैलासनें विचारलें, " बाबाजी, मग माझं ऐकणार नाहीं वाटतं ? "

हरिदयाळ म्हणाले, " वेड्याचं मागणं मानायला वेडं व्हावं लागतं ! "

कैलास उगीच राहिला. हरिदयाळ निघून गेले.

जवळची प्याद्यांची पिशवी हातीं घेऊन गांठी मारीत मारीत कैलास आपल्याशींच म्हणाला —' मला वाटतं तो म्हणतो तेंच खरं आहे. या जगांत माझ्यासारख्या माणसाचा सल्ला कुणाला पटायचा नाहीं. कुणी माणूस मेलं, त्याला खांदा द्यायला कुणी नसलं, तर कुणी कुणी येतात मला बोलवायला— जाळलं पाहिजे ना प्रेत ? कुणी आजारी पडला तरीसुद्धां बोलावतात मला— शुश्रुषा करायला हवा ना कुणी आणखी ? येतात ते बुद्धिबळं खेळायला. आज हे एवढे दिवस गेले—एवढा बुड्ढा झालों—पण माझा सल्ला विचारायला कांहीं कुणी आला नाहीं !'

सूर्याच्या प्रकाशापेक्षां देखील शुद्ध आणि स्फटिकापेक्षांही स्वच्छ असलेली ही गोष्ट कां कुणाला पटत नाहीं, अगदीं सरळ आणि प्रांजल भाषेंत दिलेला सल्ला या लोकांच्या गळीं कां उतरत नाहीं, याचा विचार करीत त्यानें सारी रात्र घालवली—पण त्या प्रश्नाचा उलगडा त्याला झाला नाहीं.

त्याच रात्रीं हरिदयाळनें पुष्कळ विचार करून मनाचा निश्चय केला आणि चंद्रनाथचा काका मणिशंकर याला एक पत्र लिहिलें. चंद्रनाथनें बुद्धिपुरस्सर एका वेश्येच्या मुलीबरोबर लग्न करून संसार थाटला आहे, असा त्या पत्रांतील मजकुराचा रोंख होता.



हरिदयाळनीं सारी हकिकत तपशीलवार मणिशंकरला लिहून कळवली होती, त्याचमुळें त्यांचा त्या हकिकतीवर सहज विश्वास बसला. त्यांना वाटलें, ही बातमी खोटी नसावी.

पण या प्रकरणीं काय करावें याचा त्यांना उमज पडेना. सुखाची असो कीं दुःखाची असो, ही बातमी महत्वाची होती यांत शंका नव्हती. हा एवढा बोजा एकट्यानें उचलणें कठिण गेल्यामुळें त्यांनीं आपल्या बायकोला एकातांत सारी हकिकत सांगून टाकून भार हलका करीत म्हटलें, "मला विचारलं असतं तर हें कां असं झाल असतं ? असली लबाडी मी पचूं दिली असती का ? कसं का असेना, सध्यां ही गोष्ट उघड करूं नकोस. एकदां मला यावर चांगला विचार करूं दे."

पण चांगला विचार करायला अवधि फार लागत असतो, चार दोन दिवस धीर धरावा लागतो,—स्त्रीजातीला तें कठिण जातें,—अर्थात् हरिदयाळच्या पत्राचा सारांश चारदोन कानीं जातां जातां हळुहळू ही कानांची संख्या वाढतच गेली.

मुलगी न्हायला आल्याच्या वेळीं ही बातमी हरिबालेच्या कानीं गेली होती, म्हणूनच शरयूवर चन्द्रनाथचें प्रेम किती आहे याचा अंदाज भीतभीत घेण्याचा तिनें प्रयत्न केला होता. त्या दिवशीं बायकांच्या मेळाव्यांत याच गोष्टीची चर्चा – कुजबुजत का होईना—पण मोठ्या उत्साहानें सुरू झाली होती. प्रेमाची मात्रा किती मोठी आहे याच्यावरच शरयूचें भवितव्य अवलंबून होतें, याची कल्पना बायका मंडळींनाच झाली असती.

साऱ्या जणीं कुजबुजत होत्या खऱ्या, पण सर्वांच्या मुद्रेवर एक प्रकारची भेसूर आनंदाची छटा दिसून येत होती.—स्त्रीजातीच्या कोमल अंतःकरणांतूनच

त्या तसल्या छटेचा उगम झाला होता. प्रत्येकजण दुःखाचें प्रदर्शन करीत होती, प्रत्येकजण सुस्कारे सोडीत होती, पण अंतःकरणापासून सर्वांचीच ही इच्छा होती, कीं शरयूच्या भाग्यदेवतेनें आतां पाठ फिरवली—आतां दुःखाचा उमाळा येऊन ' अरेरे ' म्हणावें ! या भयंकर दुःखाचें चित्र मोठ्या कौशल्यानें काढून प्रत्येकजण तें दुसऱ्या प्रत्येकीच्या मनावर ठसवून द्यायचा प्रयत्न करीत होती. या उठाठेवीच्या पायीं दोन दिवस कुणाला धड झोंपसुद्धां आली नाहीं.

अशा प्रकारें एक आठवडा गेला. अशीच रात्रंदिवस आग धुमसत होती—भडकली नव्हती. अडवलेल्या पाण्यासारखी ती बातमी नुसती बायका मंडळींत फिरून फिरून पसरली आणि पुनः अटकून राहिली. त्यांना वाटलें होतें तसें झालें नाहीं—दुथडी भरून पाणी वाहून गेलें नाहीं—म्हणूनच या सात दिवसांत सारींच अस्वस्थ होऊन राहिलीं होतीं.

पुरुष मंडळींतही ही बातमी उठली आणि थोडक्याच वेळांत ओसरली. चंद्रनाथाला बहिष्कृत करण्यापेक्षांही आणखी कांहीं घडवून आणायचा त्याचा बेत होता. संसाराचा बोजा प्रत्येकाला उचलायचा होता—हातपाय पसरून पुष्कळ वेळ आराम करायला कुणाला वेळ नव्हता—म्हणूनच या प्रकरणाचा निकाल होण्यापूर्वींच सारा कट ढासळला. बाब क्षुल्लक असती, चंद्रनाथ दरिद्री असता, तर कदाचित् या प्रकरणाची कांहींना कांहीं करून निश्चिती लागली असती. पण या बाबतींत उघड उघड कट करून चंद्रनाथला सामना द्यायला उभें रहायचा धीर कुणालाच होईना.

कुणी पुढें सरसावला असता तर तो मणिशंकर. पण कां कोण जाणे, तो कोणत्याच गोष्टीला तोंड फोडीत नव्हता; त्यामुळें गांवांतल्या प्रौढ विधवा आणि सधवा यांनी एकजूट करून आपलें कर्तव्य बजावायला सुरवात केली. बिचारा निरपराधी व्रजकिशोर आणि त्याची पत्नी हरकाली यांची जात बचावण्याच्या पवित्र उद्देशानें त्यांनीं मोठ्या कष्टानें त्यांना सांगून दिलें, कीं सुनेची आई—म्हणजे शरयूची आई—ही एक काशींतली वेश्या होती. अर्थात असल्या मुलीच्या हातचें खाल्ल्यामुळें त्या दोघांचीही जात बुडाली आहे—धर्मनाश झाला आहे.

पहिल्यानें हरकाली नुसतीच पहात राहिली. त्यानंतर तिनें विचारलें, " काय झालंय ? "

राममयची म्हातारी आई एवढा मोठा सुस्कारा सोडून म्हणाली, "आणखी काय व्हायचं राहिलंय ग बाई? जें व्हायचं तें सारं झालंय-सत्यानाश झालाय."

असें म्हणून तिनें साद्यंत सर्व हकिकत तिला सांगितली. ती हकिकत सांगत असतांना मधून मधून जी कांहीं चूकभूल होत होती तिची दुरुस्ती जमलेल्या चार जणी वेळींच करीत होत्या.

आतां हरकालीला कळून चुकलें, कीं खरोखरच सारा सत्यानाश झाला; पण यांतला किती वांटा स्वतःचा व किती वांटा दुसऱ्या कुणाचा, हें निश्चितपणें ठरवण्यासाठीं ती मुकाटयानें आपल्या खोलींत गेली आणि दार बंद करून बसली. तिचें बरें करण्याच्या इच्छेनें ज्या आल्या होत्या त्या—बरें झालें कीं वाईट झालें याची चांगलीशी कल्पना न आल्यामुळें—हतबुद्ध होऊन एवढेंसें तोंड करून एकामागून एक निघून गेल्या.

एकांतांत येऊन बसल्यावेळीं हरकाली बरीच अस्वस्थ झाली. एवढी मोठी चांगली बातमी शेवटपर्यंत टिकून राहण्याइतकें आपलें फुटकें नशीब बड आहे कीं नाहीं याची तिला शंका पडली होती. तिला वाटलें, नाहीं टिकली तर उपायच नाहीं—पण जर नशिबानें उलट खाल्ली असेल, एवढ्या दिवसानें देवानें खरोखरच आपल्याकडे कृपादृष्टीनें पाहिलें असेल, तर जोंपर्यंत ही आपली भाचेसून आहे, जोंपर्यंत ती दुसऱ्याच्या हातीं सांपडली नाहीं, तोंपर्यंतच आपल्याला संधि आहे. शेवटपर्यंत वाटेल तें करून जीव टाकून हें प्रकरण तडीला लावलें पाहिजे याबद्दल आतां तिला शंका राहिली नव्हती.

चन्द्रनाथ जिथें लिहित वाचीत बसत असे त्या जागीं येऊन ती एवढें लांब तोंड करून उभी राहिली. तिच्या मुद्रेवरची भेसूर छाया पाहून चन्द्रनाथ घाबरून म्हणाला, "काय झालंय मावशी?"

कपाळावर हात मारून रडकुंडीला येऊन हरकाली म्हणाली, "बाबा चंद्रनाथ, आम्हीं अशी हीं दीनदुबळीं, म्हणून का आम्हांला अशी शिक्षा दिलीस?"

चंद्रनाथला कांहींच कळेना. असें आपण काय केलें, याची त्याला कल्पनाच होईना.

हरकाली बोलत होती, "आतां काय राहिलंय? घांसभर अन्नाच्या पायीं जात गेली—धर्म गेला. बाबा, खायला अन्न असतं आमच्या घरीं, तर अशा प्रकारें आमचा सत्यानाश करतां आला असता का तुला?"

क्षणभर स्वस्थ राहून चंद्रनाथ मन शांत ठेवून म्हणाला, "झालंय काय ?"

पदरानें डोळे पुसून हरकाली म्हणाली, "जळलं आमचं नशिब तें—जें व्हायचं होतं तें झालं. असा साधासीधा सोन्यासारखा माणूस तूं—मेल्या जखणीन तुला भुरळ घातली नि हें असं केलं !"

"तुझ्या पाया पडतों मामी, काय तें उघड उघड बोल पाहूं."

"काय बोलूं आतां ! तुझ्या चुलत्यालाच विचार काय तें."

चंद्रनाथ आतां चिरडीला आला. तो म्हणाला, "काकांनाच जर विचारायचं तर मग तूं कशाला उगीच जीव टाकनेयस ?"

"आमचा सत्यानाश झालाय म्हणून तर जीव टाकतेंय बाबा ! नाहींतर कशाला आलें असतें ?"

आपला मामा आणि मामी यांवर चन्द्रनाथची फार भक्ति होती. पण असल्या प्रकारामुळें कुणाला राग आला नसता ? आधींच त्याला राग आला होता आतां अधिकच चिडून तो म्हणाला, "इथं राहून सत्यानाश होत असेल तर वाटेल तिकडे निघून जा —माझ्यासमोर असं कांहीं करूं नकोस."

त्याचे ते उद्गार ऐकल्याबरोबर चंद्रनाथच्या स्वर्गस्थ आईचें नांव घेऊन हरकाली मोठ्यानें भोकाड पसरून रडूं लागली, "काय ग बाई ! अग तूं मला बोलावून आणलेंस अन् आतां हा तुझा मुलगा मला घरांतून धुडकावून घालवतोय ग !"

कावराबावरा होऊन चन्द्रनाथनें मामीचा हात दाबून धरून म्हटलें, "उघड करून बोलली नाहींस तर कसला सर्वनाश तें मला कसं कळावं मामी ? नुसती 'सर्वनाश सर्वनाश' म्हणतेयस पण काय तें अजून एका शब्दानं सुद्धां सांगत नाहींस !"

एकदां डोळे पुसून घेऊन हरकाली म्हणाली, "तुला काय माहीत नाहीं ?"

"नाहीं."

"तुमच्या काशीच्या पांड्यानं तुझ्या काकाला पत्र लिहिलंय—"

"काय लिहिलंय ?"

एक मोठा आवंढा गिळून मान वेळावीत हरकाली म्हणाली, "बाबा रे, काशीला तूं एकटा सांपडलास, मेल्या जखणीनं तुला भुरळ घातली अन् वेश्येबरोबर लग्न लावायला लावलं."

एवढाले डोळे करून चन्द्रनाथनें विचारलें, " कुणाचं ग ? "

कपाळावर हात मारून हरकाली म्हणाली, " तुझं. "

जरा जवळ सरकून चन्द्रनाथनें शांतपणें विचारलें, " वेश्येबरोबर कुणाचं लग्न लागलं म्हटलंस ? माझं ? "

" हो. "

" म्हणजे लग्नाच्यापूर्वी शरयू वेश्येचा का धंदा करीत होती ? मामी, तिला इथं आणली तेव्हां ती दहा वर्षांची होती याची तरी आठवण आहे का तुला ?"

" तें मला काय माहित चंद्रनाथ ? पण तिच्या आईची काशींत ख्याती झाली आहे. "

" म्हणजे शरयूची आई वेश्येचा धंदा करीत होती ?—ती स्वतः नव्हे—होय ना ? "

हरकाली मनांतल्या मनांत तडफडली आणि म्हणाली, " एकच तें—बाबा, दोन्हीही एकच. "

चंद्रनाथ तिला दरडावून म्हणाला, " कुणाला काय म्हणतेस मामी ? तुला काय वेड लागलंय ? "

हरकाली भेदरली. रडकुंडीला येऊन ती म्हणाली, " वेडच लागलंय म्हणेनास ! आतां आम्हां दोघांना एकदां प्रायश्चित्त घेऊंदे. मग दोन डोळे जी वाट दाखवतील तिकडे जाऊं निघून. असल्या या जिण्यापेक्षां भीक मागणं बरं ! "

रागाच्या तिरमिरींत चंद्रनाथ म्हणाला, " तेंच बरं ! "

" तर मग जावं का आम्ही ? "

तोंड फिरवून चंद्रनाथ म्हणाला, " जा. "

तें ऐकतांच हरकालीनें पुन्हा एकदां मोठ्या जोरानें कपाळावर हात मारून घेतला,—" मेल्या फुटक्या नशिबा ! शेवटीं हेंच होतं का अदृष्टांत ? "

पुन्हा तिच्याकडे तोंड वळवून चन्द्रनाथ गंभीरपणें म्हणाला, " तर मग काय तें सरळ सरळ सांग ना ? "

" सांगितलं ना सारं ! "

" काहीं नाहीं सांगितलंस ! पत्र कुठं आहे ? "

" तुझ्या काकाकडे "

" काय लिहिलंय त्यांत ? "

" तेंच तर सांगितलं ना ! "

चंद्रनाथ तिथून उठून एका खुर्चीत आडवा झाला. त्याला शिसारी आली होती. शरमेनें चूरमार होऊन पायापासून डोक्यापर्यंत तो शहारून उठला. सारा देह जसा कांहीं काष्ठवत् झाल्यासारखा त्याला वाटलें. त्याच्या तोंडून नुसता एकच उद्गार निघाला, " छी: ! "

त्याच्या चेहऱ्याकडे पाहतांच हरकाली घाबरून गेली. प्रेताच्या तोंडावर सुद्धां असली भयाण छाया तिला कधीं दिसून आली नव्हती.

एक शब्दसुद्धां न बोलतां ती निघून गेली.

९

चन्द्रनाथ म्हणाला, " कुठं आहे तें पत्र ? "

मुकाट्यानें पेटी उघडून मणिशंकरनीं पत्र काढून त्याच्या हातीं दिलें. सारें पत्र वाचून होतांच चंद्रनाथचा चेहरा उतरला. त्यानें विचारलें, "याला पुरावा ?"

" राखालदास स्वत:च आला होता. "

" त्याचं बोलणं खरं कशावरून ? "

" तें मी कसं सांगूं ? तुला योग्य वाटेल तें तूं कर. "

" कशाला आला होता तो ? ही बातमी देण्यांत त्याला काय फायदा ? "

" फायद्याची बाब लिहिली आहे ना पत्रांत ? दोन हजार मागत होता तो."

चंद्रनाथ त्याच्याकडे कांहीं वेळ टक लावून पहात राहिल्यावर अगदीं सहजगत्या म्हणाला, " असं कांहींच न सांगतां नुसती जरब दाखवून देखील त्यानं पैसे उकळले असते. पण आतां त्यावर सगळंच पाणी पडलं. एक प्रकारें माझ्यावर आपले उपकार झालेयत—एवढे पैसे तरी वांचले माझे ! "

मणिशंकर अगदीं ओशाळून गेला. आपण ही गोष्ट उघडकीला आणली नाहीं असें सांगावें, असें एकदां त्याच्या मनांत आलें होतें—पण ही बातमी बाहेर पडली ती आपल्याकडूनच, याची त्याला आठवण झाली. ही हकिकत बायकोला सांगितली नसती तर कशी कुणाला कळली असती ? म्हणूनच खालीं मान घालून तो स्वस्थ बसला.

चंद्रनाथ पुन्हा म्हणाला, "मी या गांवचा मालक आहें. माझी बदनामी करण्यासाठीं माझ्या गांवांत माझ्या घरीं एक दीन लंपट भिक्षुक कुणाच्या जोरावर यायचा धीर करतो तें आपल्याला मी विचारीत नाहीं—पण मला तुम्हांला एवढंच विचारायचं काका. कीं मी मेलों म्हणजे तरी आपण सुखी व्हाल ?"

जीभ चावून मणिशंकर म्हणाला. "छे छे ! असलं भलतं कांहीं बोलं नकोस चंद्रनाथ !"

चंद्रनाथ म्हणाला, "पुन्हां असं बोलायचा प्रसंगच यायचा नाहीं. आपण मला वंदनीय आहांत. माझ्या हातून चूक झाली असेल तर मला क्षमा करा. माझी सारी धनदौलत आपण घेऊन टाका. मग तरी माझ्यावरचा राग जाईल ना तुमचा ? मी नुसता इथं राहीन—दरमहा खर्चापुरतं मला कांहीं तरी द्या.—देवाची शपथ घेऊन सांगतों, यापेक्षां जास्त कांहींसुद्धां मी मागणार नाहीं.—पण अशा रीतीनें माझा सत्यानाश करूं नका."

बोलतांना त्याचा गळा दाटून आला. बळेंबळेंच दांतांनीं ओंट चावून त्यानें ओंठाशीं येणारें रडें आवरून धरलें.

मणिशंकर उठला आणि चंद्रनाथचा हात दाबून धरून रडूं लागला. तो म्हणाला, "बाबा चंद्रनाथ, तूं माझ्या मोठ्या भावाचा एकुलता एक मुलगा—मी भीक मागतों तुझ्याकडे, या म्हाताऱ्याला असं टाकून बोलूं नकोस."

तोंड फिरवून चंद्रनाथनें डोळ्यांतलीं आसवें पुसलीं आणि म्हटलें, "मी टाकून बोलत नाहीं काका, पण नशिबाचा एवढा मोठा घाला पडल्यावर देशत्याग करण्याखेरीज मला दुसरा मार्ग नाहीं, एवढंच मी आपल्याला सांगून टाकलं."

चकित होऊन मणीशंकर म्हणाला, "देशत्याग कां करायचा ? नकळत हें लग्न घडून आलं त्यांत मोठीशी लाज वाटायला नको. एकदां कसलं तरी प्रायश्चित्त करून टाकलं कीं काम भागलं."

चंद्रनाथ उगीच राहिला. मणीशंकरला आतां अवसान आलें. तो म्हणाला, "उपाय खूप आहेत—सूनबाईला टाकून आतां गुपचुप प्रायश्चित्त घेऊन टाक—पुनः लग्न कर, संसारी हो,—सारं कांहीं ठाकठीक होऊन जाईल."

चंद्रनाथच्या अंगावर शहारे आले.

संसारांतल्या अडीअडचणी मणीशंकरला चांगल्या कळत होत्या. चंद्रनाथला या वेळीं काय वाटलें असेल याची कल्पना येऊन ते नुसते त्याच्याकडे पहात राहिले.

चंद्रनाथ म्हणाला, " कांहीं झालं तरी तिला मी टाकणार नाहीं काका."

मणीशंकर म्हणाला, " टाकलंच पाहिजे चंद्रनाथ. आज जरा आराम कर. उद्यां थंड डोक्यानं विचार करून पहा—त्यांत कांहीं मोठंसं कठीण नाहीं. यापुढं सुनबाईला घरीं आसरा देणं शक्यच नाहीं."

" पण पुरावा मिळाल्याशिवाय तिला टाकून द्या असं कसं म्हणतां आपण ? "

कांहीं वेळ विचार करून म्हातारा म्हणाला, " या गोष्टीची जास्त बकवा होऊं नये म्हणून मी खबरदारी घेइन. पण आतां तिला टाकल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तिला टाकली अन् प्रायःश्चित घेतलं कीं सारी भानगड मिटून जाईल."

" कोण मिटवील ? "

" मी मिटवीन."

" कांहीं सुद्धां तपास न करतां—"

" तुला वाटलं तर तपास मागाहून कर—पण ही गोष्ट अगदीं खरी आहे हें तुला मी खात्रीपूर्वक सांगतों."

चन्द्रनाथ घरीं आला आणि आपल्या खोलीचें दार बंद करून घेऊन खाटेवर आडवा झाला. शरयूला टाकलें पाहीजे असें मणीशंकर म्हणाले होते. बिछान्यावर पडल्यापडल्या शून्य दृष्टीनें वर पहात माणूस जसा झोंपेंत बोलतों तसा तो आपल्याशींच पुनः पुनः तेंच तेंच बोलत होता—' शरयूला टाकली पाहिजे. ती वेश्येची मुलगी ! '

पुनः पुनः त्यानें तें वाक्य निरनिराळ्या प्रकारें आपल्याशींच उच्चारून पाहिलें—स्वतःच्या कानांनीं ऐकून घेतलें—पण त्याच्या मनाला तें पटलें नाहीं. शरयूला आपण टाकली आहे—शरयू घरात नाहीं—शरयू आपल्या खोलींत नाहीं—डोळयांसमोर नाहीं—डोळयाआडही नाहीं—ती आतां मुळीं त्याची नाहींच ! हजार प्रयत्न केले तरी ही कल्पना यथातथ्य स्वरूपांत पटणें त्याला अशक्य झालें.

आणि मणीशंकर म्हणत होता, कीं यांत कांहीं कठीण नाहीं. हें काम कठीण होतें कीं सोपें होतें, शक्य होतें कीं अशक्य होतें, ही गोष्ट मनाला पटवून घेण्याइतकी ताकद माणसाच्या हृदयांत असूं शकते कीं नाहीं, तें कांहींच त्याला निश्चित करतां येईना. तो निर्जीवपणें पडून राहिला होता. केव्हांतरी त्याला झोंप लागली. झोंपेत त्याला स्वप्नें दिसत होतीं. त्यांतलीं कांहीं स्पष्ट होतीं तर कांहीं अंधुक होतीं. झोपेच्या भरांत एक कांहींतरी विलक्षण अशी अस्पष्ट टोंचणी त्याच्या सर्वांगाला जाणवत होती—ती जाणीवसुद्धां त्याला खरी वाटत होती.

संध्याकाळ झाली तेव्हां झोंपेतून जागा होऊन तो उठून बसला. आता त्याची मन:स्थिति मोठी विलक्षण झाली होती. त्याच्या मनात मायाममतेला जागा राहिली नव्हती. रागाला किंवा चिडीला यायचें सामर्थ्य त्याच्या ठायीं राहिलें नव्हतें. कसल्या तरी अस्पष्ट आणि चटकन् न कळणाऱ्या शरमेच्या अवजड भारानें त्याचा सारा देह आणि सारें मन इतकें पांगळें होऊन पडलें होतें, कीं तो एकदम जमीनदोस्त होत जाऊं लागला होता.

खोलींत दिवा लावण्यासाठीं नोकरानें दारावर थाप मारली त्यावेळीं घाई-घाईनें उठून चंद्रनाथनें दार उघडलें. तो आंतल्याआंत शतपावली करीत होता. नजरेसमोर दिव्याचा प्रकाश दिसला त्यावेळीं भ्रमाची काळोखी त्याच्य नजरेवरून आपोआप नाहींशी होऊं लागली. त्यांतूनच एकाएकीं त्याच्या मनांत संशय जागा झाला—खरंच का हें ! शरयूला माहीत आहे का हें ? कळून सवरून शरयूनें आपला असा घात केला असेल असें चंद्रनाथला मुळींच वाटेना. तो तसाच बाहेर आला आणि शरयूच्या खोलीकडे वळला.

सांजवात करून शरयू बसली होती. नवरा आलेला पाहून ती घाईघाईनें उठून उभी राहिली. तिच्या मुद्रेवर उद्वेगाचें लक्षण जसें एवढेंसुद्धां दिसत नव्हतें, तसेंच तिच्या चेहऱ्यावरचें रक्त आटून गेलें होतें.

चंद्रनाथनें सरळसरळ विचारलें, "तुला कळलं ना ?"

मानेनें होकार देऊन शरयू म्हणाली, "हो."

"खरं आहे तें ?"

"हो—खरं आहे."

चंद्रनाथ मट्कन् बिछान्यावर बसला—, "इतके दिवस कां मला सांगितलं नाहींस ?"

"आईनं मना केलं होतं—तुम्हींही विचारलं नाहीं."

"तुझ्या आईवर मी जे उपकार केले त्याची फेड तुम्हीं लोकांनीं अशी का केली ?"

खालीं मान घालून शरयू स्तब्ध होऊन उभी राहिली होती.

चंद्रनाथनें पुनः विचारलें, "तूं अशी घाबरटासारखी कां वागत होतीस तें आतां कळलं. एवढं प्रेम केलं तरी कां सुखी झाली नव्हतीस तेंही आतां कळलं. उगवत्या सूर्याच्या प्रकाशासारखं आतां सारं कांहीं अगदीं स्वच्छ होऊन गेलंय ! म्हणूनच वाटतं तुझी आई इथं यायला कबूल झाली नव्हती ?"

मानेनें होकार देऊन शरयू म्हणाली, "हो !"

एका क्षणांत चंद्रनाथच्या समोर गेल्या कांहीं दिवसांतील सान्या हकिकतींचें चित्र उभें राहिलें. तो काशीवास, ती पवित्र वाटणारी शरयूच्या विधवा मातेची मूर्ति,—कृतज्ञतेनें ओलावलेले ते दोन डोळे, मायेनें भरलेलें तिचें तें भाषण—चंद्रनाथ एकाएकीं विरघळला आणि म्हणाला, "शरयू, सारी हकीकत मला मोकळ्या मनानं सांगशील ?"

"सांगतें ऐका. माझ्या मामाचं घर नवद्वीपच्या आसपास कुठं तरी आहे. राखाल भट्टाचार्यांचं घर माझ्या मामाच्या घराशेजारीं होतं. लहानपणापासूनच माझ्या आईची आणि त्याची मैत्री जमली होती. दोघांचं लग्न व्हावं असं देखील बोलणं निघालं होतं. पण आमच्यापेक्षां त्यांचा दर्जा जरा खालचा असल्यामुळं तें लग्न घडून आलं नाहीं. हाली शहरांत माझ्या बापाचं घर. मी तीन वर्षांची होतें तेव्हां माझे बाबा वारले. मला घेऊन माझी आई नवद्वीपला आली. मी पांच वर्षांची झालें तेव्हां मला घेऊन माझी आई—"

चंद्रनाथ म्हणाला, "बरं पुढं ?"

"कांहीं दिवस आम्हीं मथुरेला राहिलों. कांहीं दिवस वृंदावनला राहिलों. त्यानंतर काशीला आलों. या मुदतींत राखाल दारू पिऊं लागला होता. आईच्या अंगावर चारदोन दागिने होते, त्यांच्यापायीं रोज त्याचा झगडा होई. त्यानंतर एके रात्रीं सारे दागिने चोरून तो पळून गेला. त्यावेळीं

आईच्या हातीं एक पैसासुद्धां नव्हता. कशीबशी भिक्षा मागून आम्ही सात आठ दिवस काढले. त्यानंतर काय झालं तें तुम्हांला सारं कळलंच आहे."

चंद्रनाथच्या मस्तकांत आगीचा डोंब उठला. खालीं मान घालून राहिलेल्या शरयूकडे क्रूर नजरेनें पहात तो म्हणाला, "छे छे शरयू, तूं ही अशी! तुम्हीं या अशा! सारं कळून सवरून तुम्हीं माझा असा हा घात केला? स्वप्नांतसुद्धां मला असं वाटलं नसतं. केवढी महापापी आहेस तूं!"

चंद्रनाथनें तिच्याकडे पाहिलें नाहीं. पूर्वीपेक्षांही अधिक कठोरपणानें तो म्हणाला, "आतां उपाय?"

डोळे पुशीत शरयू हळूच म्हणाली, "तुम्हींच सांगा."

"इकडे ये तर!"

शरयू जवळ आली तेव्हां चंद्रनाथनें कडकडून तिचा हात धरला आणि म्हटलें, "लोक मला सांगताहेत कीं तुला मी टाकून द्यावं. तें होणार नाहीं माझ्याकडून. तुला खरं वाटायचं नाहीं, पण तुझ्यावरचा माझा सारा विश्वास उडून गेला ग!"

एका क्षणांत शरयूच्या पांढऱ्या फटक झालेल्या चेहऱ्यावर पुनः रक्त वाहूं लागल्याची छटा दिसून आली. आसवांनीं डंवरलेले दोन्ही डोळे पुनः एकदां चमकले. ती म्हणाली, "विश्वास उडाला?"

"हो. हो. उडाला—पार उडाला! तूं काय वाटेल तें करशील."

नवऱ्याच्या तोंडाजवळ तोंड आणून ती खड्या आवाजांत म्हणाली, "तुम्हीं म्हणजे माझ्यालेखीं काय आहांत ते तुम्हींच जाणतां. आपल्या तोंडाकडे एकदां चागलं पाहून घे असं एक दिवस तुम्हीं मला म्हणालां होतां. आज मी उपाय सांगतें—बोला—ऐकून घ्याल?"

"हो. सांग ना—काय उपाय तो सांग ना?"

शरयू म्हणाली, "विष खाल्लं मी तर? तर होईल ना सारं सुरळीत!"

चंद्रनाथची मुठ आणखी घट्ट झाली. जशी कांहीं ती पळून जाईल म्हणून तो तिचा हात दाबून धरीत होता. तो म्हणाला, "होय शरयू, होय! विष घेशील?"

"घेईन."

"अगदीं शांतपणें—अगदीं गुपचुप."

" हो—तसंच. "

" आजच्या आज ? "

शरयू म्हणाली, " ठीक आहे—आजच्या आज. "

चंद्रनाथ जायला निघतो आहे असें पाहून त्याचे दोन्ही पाय कवटाळून धरून ती म्हणाली, " एक आशीर्वाद सुद्धा दिला नाहीं मला ? "

वर पाहून चंद्रनाथ म्हणाला, " यावेळीं नाहीं. तूं गेलीस—मेलीस—तुझं प्रेत जळून भस्म झालं म्हणजे मग आशीर्वाद देईन तुला ? "

त्याचे पाय सोडून शरयू म्हणाली, " तेव्हांच द्या तर ! "

चंद्रनाथ जायला निघाला आहे असें पाहून ती एकदम पुढें सरली आणि दाराकडे पाठ करून त्याचा रस्ता अडवून उभी राहून म्हणाली, " मी विष खाल्लं तर तुमच्यावर कांहीं आफत नाहीं ना यायची ? "

" मुळींच नाहीं. "

" कुणी कांहीं संशय घ्यायचा नाहीं ना ? "

" अर्थात घेतील. लोकाना संशय येणारच—पण लांच देऊन लोकांचं तोंड बंद करीन. "

शरयू म्हणाली, " एक पत्र लिहून उशीखालीं ठेवून देईन. तें दाखवा त्यांना. "

चंद्रनाथ तिच्या जवळ आला आणि तिच्या मस्तकावर हात ठेवून म्हणाला, " हो—तसंच कर. चांगलं तपशीलवार लिहून खालीं चांगली स्पष्ट सही कर आपली. मी तुझा खून केला असा कुणी आरोप करूं नये माझ्यावर, असंच लिही.—आणखी एक गोष्ट, खिडक्या दरवाजे चांगले घट्ट बंद करून घे—एवढामुद्धां आवाज बाहेर येतां नये—माझ्या कानीं येतां नये – "

शरयूनें दार सोडलें आणि खालीं वाकून त्याला साष्टांग नमस्कार केला. त्याची पायधूळ माथीं लावून घेऊन ती उठून उभी राहिली आणि म्हणाली, " आतां या तर—" पुन: कांहींतरी तिला संशय आला,—चटूकन् त्याचा हात धरून ती म्हणाली, " थांबा, आणखी एक क्षणभर थांबा ! "

हातीं दिवा घेऊन ती नवऱ्याजवळ आली आणि त्याचा चेहरा नीट निरखून पाहूं लागली. पहातांच ती एकदम दचकली. चंद्रनाथच्या दोन्हीं

डोळयांत कसली तरी अमानुष वृत्तीची छटा झळकत होती. त्याची नजर पिसाटाच्या नजरेसारखी धगधगत होती.

चंद्रनाथ म्हणाला, “ डोळयांत काय पहातेयस शरयू ? ”

एक क्षण थांबून शरयू म्हणाली, “ कांहीं नाहीं. आतां जा. ”

चंद्रनाथ हलुहलु खोली बाहेर पडला. तो आपल्याशींच पुटपुटत होता,— “ हेंच ठीक !—हेंच ठीक—आजच्या आज ! ”

## १०

त्या रात्रीं शरयू आपल्या खोलींत आली त्यावेळीं तिला एकदम रडूं कोसळलें. ती आपल्याशींच म्हणाली, “ विष कांहीं घेववायचं नाहीं माझ्याच्यानं. मीच असतें तर गेलें असतें मरून, पण आतां मी एकटी नाहीं— आई होणार आहें मी. आई असतांना कशी पोटच्या गोळयाचा खून करूं ? ”

म्हणूनच ती मेली नाहीं. पण आतां आपले सुखाचे दिवस संपले हें मात्र तिला कळून चुकलें होतें.

मध्यान्ह रात्रीं चन्द्रनाथ अचानक आपल्या पत्नीच्या खोलींत आला. सारी हकिकत कळली तेव्हां त्याचें माथें भडकलें. तिला हृदयाशीं कवटाळून धरून तो स्वस्थ बसला. पुनः पुनः तो पुटपुटत होता, “ असं कांहीं करूं नकोस शरयू —असं कांहीं करूं नकोस ! ”

पण यापेक्षा अधिक कांहीं आश्वासन देणें त्याला शक्य झालें नाहीं. त्याच्या या भल्या मोठ्या घरांत या हतभागी पोरीला आसरा द्यायला एक कोपरासुद्धां त्याला शोधून सांपडेना. शरमेनें काळवंडलेलें तोंड झांकायला शरयूला इथें एवढीसुद्धां आधाराची जागा नव्हती. साऱ्या गावांत कुणी आपल्याला मायेच्या नजरेनें पाहील असें तिला केव्हांही वाटत नव्हतें. डोळयांतून ठिबकणारीं गरम टिपें पुसून टाकील असें कुणीही तिचें नव्हतें.

रडूनकढून तिनें सात दिवसांची मुदत मागून घेतली होती. भाद्रपद महिन्याचे हे शेवटचे सात दिवस नवऱ्याच्या आसऱ्याला रहायचें आणि नंतर रस्त्यावरच्या निराधार भिकारणीप्रमाणें या घराला कायमचा रामराम ठोका-

यचा, असें ठरलें होतें. भाद्रपद महिन्यांत घरचें कुत्रामांजर सुद्धां हांकवून घालवायचें नाहीं, त्यामुळें गृहस्थाचें अकल्याण होतें, असा समज असल्यामुळें तिनें ही मुदत मागून घेतली होती.

एके दिवशीं नवऱ्याचा हात धरून ती म्हणाली, " माझ्या नशिबीं जें झालंय तें मी भोगीन. त्यासाठीं तुम्हीं वाईट वाटून घेऊं नका. माझ्यासारख्या दळभद्रीला घरात आणून तुम्हीं फार कष्ट सोसलेत—आतां ते पुरे झाले. मला निरोप द्या आणि पुन: ससारी व्हा. मरल्या घरांतला हा संसार कोसळून घालूं नका. "

चन्द्रनाथ खालीं मान घालून निरुत्तर होऊन राहिला होता. बरें वाईट कोणतेंही उत्तर त्याला सुचत नव्हतें. त्याला जाणवत होतें ते हेंच, कीं शरयूची जीभ आता सैल सुटूं लागली होती. पूर्वीपेक्षां ती आतां पुष्कळच बोलूं लागली होती. यापूर्वीं तिच्याठायीं जो घाबरटपणा होता तो आतां नाहींसा झाला होता. यापूर्वी तोंड बंद ठेवून मुखवटा चढवून ती या संसारांत वावरत होती. नुसत्या वाऱ्याच्या झुळकीला सुद्धां त्यावेळीं ती घाबरत होती—हा मुखवटा चटूकन् दूर होईल म्हणून भीत होती.

आतां तिची खरोखरीची ओळख पटली. आतां ती भीति राहिली नाहीं म्हणूनच ती अशी निर्भयपणें बोलूं लागली होती. उभ्या आयुष्यांत तिचें सर्वस्व म्हणजे काय तो तिचा नवरा. तें सर्वस्व समाजाच्या कोर्टांत डिक्री जारी होऊन आतां लिलांव झालें होतें. आतां ती ऋणमुक्त झाली होती, सर्वस्व हरवून बसली होती, संन्यासिनी झाली होती, म्हणूनच आतां नवऱ्याबरोबर ती मोकळेपणानें बोलूं लागली होती. मित्रासारखी, शिक्षकासारखी, अधिकारी-त्राणीनें उपदेश देत निर्भयपणें मतामत प्रगट करीत होती.

त्या दिवशीं रात्रीं उभयतांनीं उभयतांना शिक्षा केली होती. विष घ्यायचें आमिष चंद्रनाथला तिनें सुचवलें तो तिचा दुबळेपणा तिला उपयोगी पडला होता. शरयूचे सारे दोष त्याखालीं झांकले गेले होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हरकाली एक कागद घेऊन नवऱ्याला सांगून मातीमसण कांहीं तरी एक पत्र लिहवीत होती.

ब्रजकिशोरनें मधेंच विचारलें, " कशाला ल्याहायला हवंय हें एवढं ! "

त्याला दम देऊन हरकाली म्हणाली, " थोडी अक्कल असती तर असं

विचारलं नसतं तुम्हीं. एकदां माझं ऐकलं नाहीं त्याचा परिणाम हा झाला. आतां यापुढं आपली अक्कल चालवीत जाऊं नका."

हरकाली जसें सांगत होती तसेंच, घातलेलें शुद्धलेखन लिहिल्याप्रमाणें व्रजकिशोरनें अक्षरशः लिहिलें. पत्र लिहून पुरें झालें तेव्हां हरकालीनें तें अथपासून इतिपर्यंत वाचून घेतलें आणि खूप होऊन मान हलवीत म्हटलें, "ठीक झालं."

बिचारा व्रजकिशोर उगीच बसून राहिला होता.

तिसऱ्या प्रहरीं तो कागद हातीं घेऊन हरकाली शरयूपाशीं आली आणि म्हणाली, "सुनबाई, या कागदावर आपली सही कर पाहूं."

कागद हातीं घेऊन शरयू रस्त्याकडे पाहून म्हणाली, "काय मामी ?"

"मी सांगतेंय तें कर ना सूनबाई !"

"सही कशावर करायची तें तरी सांगशील ?"

एवढा लांब चेहरा करून हरकाली म्हणाली, "तुझ्याच कल्याणासाठीं हें सारं करतेंय बेटा. तूं आतां इथून जाणार—आतां कुठं कशी रहाणार आहेस त्याचा पत्तासुद्धां नको का आम्हांला कळायला ? म्हणून मी म्हणतें बेटा, कुठेंही राहिलीस तरी दरमहा पांच रुपये पोटगी तुला मिळत जाईल, हें काय थोडं झालं ?"

शरयूला आपलें बरेंवाईट कळत होतें आणि या आपल्या कल्याणकर्त्रीच्या हृदयांत कल्याणाची कितीशी इच्छा झांकून राहिली होती याचीही तिला कल्पना होती. ज्याचें भलेंमोठें घर नदींत कोसळून नदींतून वहात जात असतें तिथें चारदोन विटाकाठ्या वांचवायच्यासाठीं तो कांहीं नदीबरोबर भांडत बसत नाहीं. त्यावेळीं शरयूला असेंच वाटलें. तरीही तिनें एकदां हरकालीच्या तोंडाकडे पाहून घेतलें.

तीच नजर ! आजवर ज्या नजरेकडे पाहिलें, कीं हरकालीला काळिज पिळून तिटकारा येत असे, भीतिनें थरकांप होत असे, तीच ती नजर ! त्या नजरेला नजर देणें हरकालीला कठीण गेलें.

खालीं पाहून ती म्हणाली, "सूनबाई !—"

"हो मामी. मी सही करतें."

हातीं लेखणी घेऊन स्पष्ट अक्षरांत तिनें आपली सही केली.

आज आश्विन वद्य द्वितीया होती. आज शरयू जाणार होती. सकाळपासून सारखा पाऊस पडत होता. आतां ही जाते कीं नाहीं याची हरकालीला चिंता लागली होती.

सारा दिवसभर शरयू घरच्या सामानासुमानाची निरवानिरव करीत होती. मोलवान कपडेलत्ते एकेक निवडून काढून ती कपाटांत बंद करून ठेवीत होती. सारे दागदागिने तिजोरींत टाकून तिजोरी बंद करून तिनें नवऱ्याला बोलवणें पाठवलें.

जमिनीवर आंग टाकून तिनें एकदां पोटभर रडून घेतलें. घर सोडून जाण्याची वेळ जसतशी जवळ येत होती तसतसे तिच्या मनाला होत असलेले क्लेश असह्य होत होते. हे सात दिवस जसे गेले तसाच आजचाही दिवस जाईल असें तिला वाटेना. आज शेवटच्याच दिवशीं आपला धीर कोसळून पडेल, जायच्या वेळीं दारांतून धुडकावून दिलेल्या भिकाऱ्याप्रमाणें आपली दशा होईल, अशी शंका तिला वाटत होती. स्वाभिमानाची जी कल्पना तिनें आजवर जीव टाकून हृदयाशीं घट्ट धरून ठेवली होती, ती अशी सोडून टाकायला तिचें मन तयार होईना.

चंद्रनाथ येतांच ती डोळे पुसून उठून बसली. ती म्हणाली, " या. आज माझा जायचा दिवस—"

अजूनही तिच्या डोळ्याचीं पातीं ओलावलेलीं होतीं. चंद्रनाथ आला तो दुसरीकडेच पहात बसला होता. शरयू जवळ येऊन म्हणाली, "या किल्ल्या घ्या. पुन: लग्न करीपर्यंत या आपल्यापाशींच ठेवा. दुसऱ्या कुणाकडे देऊं नका."

चंद्रनाथ रुक्षपणें म्हणाला, " ठेवून दे त्या तिकडे कुठंतरी. "

आपल्या हातानें चंद्रनाथचा चेहरा धरून आपल्या समोर ओढून घेऊन थोडेसें हंसून शरयू म्हणाली, " रडूं येतंय वाटतं ? "

चंद्रनाथला वाटलें, प्रसंग मोठा कठीण आहे.

त्याचे डोळे पुसून शरयू मोठ्या लडिवाळपणानें म्हणाली, "आठवण करा, मी यापूर्वी कधीं अशी थट्टा केली नाहीं. आज जायच्या दिवशीं जरा गंमत करून पहाणार आहें. रागवायचं नाहीं बरं!—" त्यानंतर ती म्हणाली, " होतं नव्हतं तेवढ कपाटांत बंद करून ठेवलंय. एकदां पाहून घ्या. माझ्या वस्तू निष्कारण कुठं गहाळ होऊं देऊं नका. "

चंद्रनाथनें पाहिलें,—शरयूच्या अंगावर हातांतल्या चारपांच कांचेच्या बांगड्यापलीकडे दुसरा कुठलाही दागिना नव्हता. स्वतःच्या डोळ्यांनीं तिची ही अशी अवस्था पाहिल्यामुळें त्याच्या हृदयांत बाण बसला. पण तो तरी काय बोलणार होता ? या असल्या देवीच्या मूर्तिला चारदोन दागिने अंगावर घालून जा म्हणायला त्याला धीर तरी कसा व्हावा ?

गळ्यांत पदर घेऊन शरयूनें त्याला प्रणाम केला. त्याची पायधूळ मस्तकाला लावून ती म्हणाली, "मी जातें म्हणून उगीच मनाला लावून घेऊं नका. आतां तुमच्या हातीं कांहीं नाहीं हें मला कळून चुकलंय !—"

एवढा वेळ चंद्रनाथनें कसेंबसें मन आवरलें होतें.—आतां अशक्य झालें.—तो एकदम उठून निघून गेला.

संध्याकाळच्यापूर्वी गाडीची वेळ होती. स्टेशनवर जायला निघायची वेळ झाली होती. पाऊस पडत होता. घरचा म्हातारा गुमास्ता कपड्याचें गाठोडें पंचांत बांधून घेऊन जाऊन कोचमनजवळ बसला. पुराणांतली ती सीता-देवीची कथा आठवल्यामुळें त्याच्या डोळ्यांवाटे सारख्या आसवांच्या धारा लागल्या होत्या. डोळे पुसून तो मनांतल्या मनांत म्हणाला, "भगवंता, मी नोकर म्हणून का मला असं संकटांत घातलंस ?"

हरकालीला काय वाटत होतें याची अचुक कल्पना असल्यामुळें तिला हांक मारून घेऊन शरयूनें प्रणाम केला. तिची पायधूळ घेऊन ती म्हणाली, "मामी, ही माझी ट्रंक एकदा उघडून पहा."

हरकाली ओशाळून म्हणाली, "नाहीं—नाहीं—नाहीं—राहूं दे—" पण तितक्यांत शरयूनें आपली ट्रंक उघडून हरकालीच्या समोर ठेवली. ती संधी टाळणें तिच्यापक्षीं असंभवनीय होतें. वांकड्या नजरेनें तिनें पाहिलें,—आंत एकदोन साधारण कपडे, दोन तीन पुस्तकें, कागदात गुंडाळलेल्या दोन तसबिरा आणि असेंच कांहीं सटरफटर होतें. शरयू म्हणाली, "एवढंच आहे हें."

हरकाली आस्तेआस्ते मागें हटली.

संध्याकाळ व्हायच्यापूर्वीच शरयू गाडींतून निघाली. कोचमननें चाबूक हाणला आणि गाडी एकदम दाराच्या फाटकाबाहेर चालू झाली.

दुसऱ्या मजल्याच्या खिडकींतून मणीशंकर पहात होता. आज त्याला एकाएकीं वाटलें—झालें हें कांहीं बरें झालें नाहीं !

# ११

सारी रात्र मणीशंकरला झोप आली नाहीं. सारी रात्रभर त्याच्या कानांत एका भल्या मोठ्या गाडीचा घडघड आवाज दुमदुमत होता. भल्या पहाटे बिछाना सोडून तो बाहेर आला. पहातों तों दरवाजाजवळ फाटकेतुटके कपडे घातलेला एक अपरिचित माणूस पेंगत बसला होता. जवळ येतांच तो माणूस उठून उभा राहिला आणि म्हणाला, " मी एक वाटसरू आहें—"

मणीशंकर तसाच चालूं लागला होता त्यावेळीं त्यानें मागून हांक मारली, " मणीशंकरबाबूंचं घर हेंच काय ? "

त्यानें मागें वळून म्हटलें, " हेंच !"

" केव्हां भेट होईल त्यांची ? सांगाल का भला ? "

" माझंच नांव मणीशंकर. "

मोठ्या आदबीनें नमस्कार करून तो म्हणाला, " मी आपल्याकडेसच आलों आहें. "

त्या माणसाला एकवार नखशिखान्त पाहून घेऊन मणीशंकर म्हणाला, " काशीहून आलायस काय बाबा ? "

" जी होय ? "

" दयाळनं पाठवलंय ? "

" जी होय. "

" पैशासाठीं आलायस ? "

" जी होय."

हळूच हंसून मणीशंकर म्हणाला, " मग माझ्याकडे कशाला आलास ? मी पैसे देईन असं का वाटलं तुला ? "

मानेनें नकार देत तो माणूस म्हणाला, " तसं नव्हे—दयाळठाकूर म्हणाले, कीं पैसे मिळायचा मार्ग आपण दाखवून द्याल. "

कपाळाला आंठ्या घालून मणीशंकर म्हणाले, " बरोबर आहे. जरा आंत ये. "

दोघेही आंत गेले आणि आंतून दरवाजा बंद करून घेऊन बसले.

मणीशंकर म्हणाला, " तें सारं खरंच तर ? "

" अगदीं सारं खरं ! " असें म्हणून त्यानें खिशांतून कांहीं पत्रें काढून त्याच्या हातीं दिलीं. तीं सारीं पत्रें वाचून पाहिल्यावर मणीशंकर म्हणाला, " मग यांत सुनबाईचा काय गुन्हा ? "

" तिचा गुन्हा नसेल—पण आईच्या गुन्ह्याचा बोजा मुलीवर पडतोच कीं नाहीं ? "

" तर मग जी स्वतः गुन्हेगार नाहीं तिला काय म्हणून उगीच संकटांत घालायचं ? "

" माझा निरुपाय आहे. पैशासाठीं मला हें सारं करावं लागतंय ! "

कांहींवेळ विचार करून मणीशंकर म्हणाला " असं पहा बाबा, ही बदनामी झाली तर मला सुद्धां मान खालीं घालावी लागेल. चंद्रनाथ माझा पुतण्या आहे ना ? "

राखालदास निष्ठुरपणें म्हणाला, " त्याला मी काय करूं ? "

" तुझ्याकडे पाहिलं म्हणजे दिसतंच आहे. समज, मी स्वतः पैसे दिले, तर कसं काय होईल ? "

" छान होईल. मग मुद्दाम होऊन चंद्रनाथबाबूकडे जायची तसदी घ्यायला नको. "

" पैसे मिळतांच तूं हा गांव सोडून जाशील ? मग कोणतीही गोष्ट बाहेर फोडायचा नाहींस ? अगदीं कबूल ? "

" कबूल. "

" किती पैसे हवेत ? "

" निदान दोन हजार ! "

मणीशंकर बाहेर गेला आणि आपला नायब लक्ष्मीनारायण याला चारदोन गोष्टी सांगून पुनः आंत आला. पेटी उघडून त्यानें एकेक हजाराच्या दोन नोटा काढून राखालदासच्या हातीं देऊन म्हटलें, " सरकारी तिजोरी इथून दहा कोस दूर आहे. तिथं नेऊन या नोटा मोड. दुसऱ्या कुठं मोडतां यायच्या नाहींत. यापुढं या बाजूला फिरकूं नकोस. तुझ्याबद्दल माझं मत तेवढंसं बरं झालेलं नाहीं म्हणून सांगतों, पुनः जर या बाजूला यायचा प्रयत्न करशील तर जिवंत परत जायचा नाहींस ! तुला सांगून ठेवतोंय. "

राखालदास निघून गेला.

जीव टाकून पायपीट करीत दुसऱ्या दिवशीं तो शहरांत जाऊन हजर झाला. त्यावेळीं कचेरी बंद झाली होती त्यामुळें त्याचें काम झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं योग्यवेळीं तो त्या दोन हजाराच्या नोटा घेऊन खजिनदाराकडे गेला आणि म्हणाला, " या नोटांची रोकड द्या. "

खजिनदारानें दोन्ही नोटा हातीं घेऊन उलटून पालटून पाहिल्या. त्याला बसायला सांगून ते बाहेर गेले आणि पोलीस दरोग्याला बरोबर घेऊन परत आले. राखालदासला दाखवून ते म्हणाले, " या नोटा चोरीच्या आहेत. जमीदार मणीशंकरबाबूंच्या माणसाकडून कळलं आहे, कीं काल सकाळीं भिक्षेच्या निमित्तानं एक माणूस घरांत घुसला आणि या नोटा चोरून घेऊन पळाला. त्यांनीं दिलेले नंबर या नोटाशीं मिळताहेत. "

राखालदास म्हणाला, " जमीदारबाबूंनींच स्वतः या नोटा दिल्या. "

खजिनदार म्हणाले, " तें काय तें आतां मॅजिस्ट्रेटला सांग. "

मॅजिस्ट्रेटसमोर उभा केल्यावेळीं राखालनें सांगितलें, " नोटांच्या मालकाकडेसच तपास केला, कीं साऱ्या गानगडीचं निराकरण होईल. "

खटल्याच्या दिवशीं डेप्युटीसाहेबाच्या कोर्टांत जमीदार मणीशंकर हजर झाले आणि त्यांनीं शपथेवर सांगितलें, " या माणसाला उभ्या जन्मांत आपण कधीं पाहिलं सुद्धां नाहीं. नोटा माझ्या पेटींत होत्या. मी कधींच कुणाला दिल्या नाहींत. "

स्वतःचा बचाव करण्यासाठीं राखालनें पुष्कळ पुष्कळ सांगायला सुरवात केली. मॅजिस्ट्रेटनें त्यांतलें कांहीं लिहून घेतलें, कांहीं सोडून दिलें. बाकीच्या गोष्टींच्या बाबतींत मणीशंकरच्या वकीलानें सारीच गडबड उडवून दिली. तात्पर्य काय, कीं कुणीच त्याचें म्हणणें कानावर घेतलें नाहीं.

डेप्युटीसाहेबांनीं त्याला दोन वर्षें सक्त मजुरीची सजा फर्मावली.

## १२

हरिदयाळच्या घरीं आतां जुन्यांतली मोलकरीणसुद्धां राहिली नव्हती. सैंपाकीणबाई निघून गेली तिचा मुळींच पत्ता नव्हता. शरयू ज्यावेळीं त्या घरीं आली त्यावेळी घरीं कुणीच नव्हतें. घर नुसतें खायला आलें होतें. तिच्या

बरोबर आलेला म्हातारा गुमास्ता रडत रडत म्हणाला, “ मी जाऊं का आईसाहेब ? ”

त्याला नमस्कार करून शरयू खालीं मान घालून उभी राहिली. बिचारा गुमास्ता डोळ्यांतून आसवें गाळीत निघाला. दयाळठाकूर येईपर्यंतसुद्धां त्यानें वाट पाहिली नाहीं, कीं वाट पहावी असें त्याला वाटलेंही नाहीं.

संध्याकाळीं दयाळठाकूर घरीं आले. शरयू ओटीवर बसलेली होती तें पाहून त्यानीं विचारलें, “ कोण तूं ? ”

नमस्कार करून शरयू उठून उभी राहिली आणि कशीबशी उद्गारली, “ मी ती. ”

“ शरयू !—”दयाळ आश्चर्यचकित होऊन तिला नीट निरखून पाहूं लागले. शरयूच्या अंगावर एक फुटका मणीही नव्हता. अंगावरचें वस्त्र अगदीं साधें-सिधें होतें. दासदासी कुणी बरोबर नव्हतीं. जवळच एक ट्रंक मात्र पडलेली होती. साऱ्या प्रकाराची कल्पना येऊन ते तोंड वेंगाडून म्हणाले, “ शेवटीं मला वाटलं तसंच झालं. घालवलं वाटतं घरांतून ? ”

शरयू उगीच राहिली.

त्यावेळीं दयाळठाकूर एकदम तोडून टाकून बोलूं लागले, “—इथं तुला आसरा मिळायचा नाहीं. एकदां जवळ केलं त्याची शिक्षा चांगलीच भोगतोंय—आतां बस्स झालं. ”

मान खालीं घालून शरयूनें विचारलें, “ आई कुठं आहे ? ”

“ बया गेली कुठं पळून ! माझा सत्यानाश करून कुठं काळं तोंड केलं मेलीनं. अगदीं जातीवर गेली आपल्या.—” संतापानें त्याच्या सर्वांगाचा भडका झाला होता. खवचटपणानें ते म्हणाले, “—कुणी सांगावं, कदाचित् असेल कुठंतरी मजा मारीत. ”

शरयू तिथल्या तिथें मटकन् बसली. अखेरचा उपाय म्हणून ती आपल्या आईपाशीं आली होती.

दयाळठाकूर बोलत होते, “—मी तुला आसरा दिला तर जातिबहिष्कृत व्हावं लागेल मला. तसं व्हायला नकोय. ज्यानं एवढ्या प्रेमानं तुला नेलं हातं, त्यानं शेवटीं डोकं टेंकायला एक झोपडीसुद्धां बांधून दिली नाहीं तुला. अन् आता माझ्याकडे पाठवून दिलं तुला ! नीच इथून. ”

आतां शरयूला रडें कोसळलें. ती म्हणाली, "दादामहाशय, माझी आई नाहीं---मी आतां जाऊं कुठं?"

हरिदयाळच्या अंतःकरणांत आतां मायाममतेचा लवलेशसुद्धां राहिला नव्हता. निर्दयपणें तो म्हणाला, "या काशीसारख्या जागीं तुला आसरा मिळायला तोटा पडायचा नाहीं. प्रयत्न केलास तर मिळेल कुठंतरी जागा."

तो मोठ्या पेंचांत पडला होता, म्हणूनच असा कुजका उद्गार काढणें त्याला मानवलें.

स्वतःच्या नवऱ्यानेंच जिथें आपल्या घरीं आसरा दिला नाहीं तिथें हरिदयाळ कुठला देणार? त्याला दोष देण्यांत अर्थ नव्हता हें शरयूला कळत होतें. पण डोकें टेंकायला तिला कुठेंच जागा नव्हती. दोन दिवस नवऱ्याच्या घरीं पाहुण्याप्रमाणें ती आजवर पाहुणचार घेत होती—आतां तिला निरोप देण्यांत आला होता. पाहुण्याचा आदर करणार, त्याच्यासारखा माणूस या जगांत मिळाला नसता—आतां तो पाहुणचार गेला कुठें!

हृदयाला होत असलेल्या यातनांचा पुरावा तिच्या डोळ्यांवाटे पाझरत होता. नुकतें सोळावें वर्ष उलटलेलें—एवढ्या थोड्या वेळांत सारे सोपस्कार होऊन गेले. आई नाहीं, बाप नाहीं, नवऱ्यानें टाकून दिलें, आसऱ्याला जागा नाहीं—मिळवला होता काय तो कलंक—मिळवली होती बदनामी—अन् जन्मतः मिळालेलें सौंदर्य. या सौंदर्यावरसुद्धां दुसऱ्या कुणाला जगतां आलें असतें पण तसें जगायची शरयूची तयारी नव्हती. आतां जे कांहीं आयुष्याचे दिवस उरले होते ते कसे कंठावे?—किती दिवस असें जगून रहावें लागणार होतें याचीच तिला विवंचना पडली होती. किती दिवस का असेनात, आज तिचा नवा जन्म झाला होता. यापूर्वी आयुष्यांत तिनें दुःखकष्ट पुष्कळ सोसले होतें. पण अशा प्रकारची मरणप्राय बदनामी आणि लांछना कुठें कुणी अनुभवली होती!

दयाळठाकूर मारे रागारागानें बोलत होते. आतां एकदम किंचाळून म्हणाले, "कशाला बसून राहिली आहेस?"

काकुळतीला येऊन शरयू म्हणाली, "कुठं जाऊं?"

"मला काय माहीत?"

भरल्या गळ्यानें शरयू म्हणाली, "दादामहाशय, आजची रात्र—"

" नीघ—नीघ—क्षणभरसुद्धां इथं बसूं नकोस."

शरयू उठून उभी राहिली. तिला आश्चर्य वाटलें खरें, पण तिला तितकेंच अवसान आलें होतें. तिला वाटलें, हजार अपराध केले तरी ज्याच्यासमोर हात पसरायचा अधिकार होता, त्याच्याकडेसुद्धां जर कांहीं मागितलें नाहीं, तर अशा परकी माणसाकडे तरी काय म्हणून भीक मागावी? ती आपल्याशींच म्हणाली, " दुसऱ्याकडे आसरा नसला तरी काशीक्षेत्रांतली गंगा तर आटली नाहीं! ती कांहीं जातीपातीची भीति मानीत नाहीं! कीं तिची जातही बुडत नाहीं! या अशा संकटांत एका दीनदुबळ्या पोरीला आपल्या उदरांत ती मोठ्या आनंदानें ठाव देईल. कुठेंच आसरा मिळाला नाहीं तर तिथें तर आहे!"

शरयू उठून चालूं लागली पण तिच्या पायांत त्राण नसल्यामुळें ती मटूकन खालीं बसली.

दयाळठाकुरला वाटलें, कीं असें संकट आपल्यावर कधींच आलें नव्हतें. त्याचा गळा सुकून गेला होता. थकून गेल्यामुळें शेवटीं ती तशीच बसून राहील या भीतीनें ते ओरडून म्हणाले, " धक्की मारल्याशिवाय जाणार नाहींस वाटत! बऱ्या बोलानं चालती हो. नाहीं तर—"

इतक्यांत एकाएकीं बाहेरून हांक आली, " बाबाजी!"

हरिदयाळ अस्वस्थ झाला आणि उद्गारला, " हा काका आला वाटतं!"

एका हातात बुद्धिबळांची मोटली आणि दुसऱ्या हातांत गुडगुडी घेऊन पहातां पहातां कैलासचंद्र आंत आला. तो एकदमच आत आला नव्हता. गडबड कानीं आल्यामुळें बाहेर उभा राहून हरिदयाळच्या तोंडची शिवीगाळ ऐकून घेऊनच आंत आला होता. अर्थात आंत येतांना त्याच्या हातीं बुद्धिबळांची मोटली आणि गुडगुडी होती, तरीही चेहेऱ्यावर हसूं नव्हतें. तो आला तो सरळ शरयूसमोर येऊन उभा राहिला आणि म्हणाला, " शरयू वाटतं! केव्हां आलीस पोरी?"

कैलासकाकाला शरयू ओळखीत होती. तिनें त्याला नमस्कार केला. आशीर्वाद देऊन काका म्हणाला, " ये पोरी, ये. तुझ्या मुलाचें घर असतांना इथं कशाला आलीस पोरी?" हातांतली गुडगुडी खालीं ठेवून शरयूची ट्रंक बगलेला मारून तो म्हणाला, " चल पोरी, संध्याकाळ झाली." तो अशा कांहीं प्रकारें बोलत होता, कीं जसा कांहीं तो तिला घेऊन जायलाच आला होता.

त्याचें भाषण शरयूच्या डोक्यांत चांगलेंसें शिरलें नाहीं. ती खालीं मान घालून बसून राहिली होती.

कैलासचंद्र उद्गारला, "—आपल्या म्हाताऱ्या मुलाच्या घरीं यायला लाज कसली? तिथ कुणीसुद्धां तुला एका वाकड्या बोलानं बोलायचं नाहीं. आई-बेट्याचा नवा संसार थाटूंया आपण! चल आई, उगीच वेळ लावूं नकोस."

तरीही शरयूला उठायची स्फूर्ति झाली नाहीं.

हरिदयाळ त्याला डिवचून म्हणाला, "हें काय चाललंय काका?"

"कांहीं नाहीं बाबाजी!—" पण त्याचवेळीं तो शरयूच्या अगदीं जवळ गेला आणि जवळ जवळ तिचा हात धरल्यासारखें करून व्याकुळतीनें म्हणाला, "चल ना पोरी. उगीच इथं बसून कडवे बोल कशाला ऐकून घेतेयस?"

शरयू उठून उभी राहिली असें पाहून हरिदयाळ म्हणाला, "काय हें! हिला का घरीं घेऊन जाणार आहांत?"

म्हाताऱ्यानें उत्तर दिलें, "नाहीं रे बाबा, नेऊन रस्त्यावर बसवणार आहें!"

त्याची वक्रोक्ती ऐकून हरिदयाळ चिडला आणि म्हणाला, "काका, हें बरं नाहीं. उद्या काय होईल त्याचा विचार करा आधीं."

कैलासचंद्रानें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं.—पण शरयूला म्हटलें, "लवकर चल पोरी, नाहींतर हा पुनः कांहीं तरी फटकळासारखा बोलेल."

शरयू दरवाजाबाहेर आली. खांद्यावर ट्रंक घेऊन कैलासचंद्र तिच्या मागोमाग निघाला.

त्याच्या मागोमाग जाऊन हरिदयाळ म्हणाला, "काका, शेवटीं जात का घालवणार आहां!"

मागें न फिरता कैलासचंद्र म्हणाला, "घेतली तर देऊन टाकतों बाबाजी."

"यापुढं आमच्याबरोबर जेवतां खातां यायचं नाहीं तुम्हांला—माहीत आहे?"

आतां थांबून मागें वळून कैलासचंद्र म्हणाला, "हा कैलासकाका कधीं कुणाच्या घरीं आजवर बसला होता का ताटपाटावर?"

"नसलांत बसलां तरी पण मी तुम्हांला बजावतोंय!"

कैलासनें कपाळाला आठ्या घातल्या. आज एवढ्या वर्षांच्या काशीवासांत पहिल्यानेंच त्याला राग आल्याचें दिसून आलें. तो म्हणाला, "हरिदयाळ, यजमानाच्या मर्जीप्रमाणें वागून खायला चारघांस मिळवायला मी कांहीं

काशीचा पाड्या नव्हे. कसली भीति दाखवतां मला ? जें मला पटलं तेंच आजवर मी करीत आलोंय–तेंच आज करीन–त्याची काळजी तुम्हाला नको !"

हरिदयाळ अगदीं कोरड्या बोलानें म्हणाला, "तुमच्या बऱ्यासाठींच—"

"राहुं दे बाबाजी, तुमची सल्ला घेतल्याशिवाय आज जर हीं पंचावन्न वर्षे मला घालवतां आलीं, तर आतां उरलेलीं चारदोन वर्षे देखील तुमच्या सल्ल्याशिवाय सहज निघतील की. जा बाबाजी, घरात जा."

हरिदयाळ मागें हटला.

घरीं जातांच कैलासचंद्रनें खांद्यावरची ट्रंक खालीं ठेवून अगदीं सहजपणें म्हटलें, "पोरी—आई, हें सारं घरदार तुझं. मी तुझा मुलगा. म्हाताऱ्यावर जरा थोडीबहूत नजर ठेव, अन् तुझा स्वतःचा संसार चालवून घे. यापेक्षा जास्त काय सांगूं ?"

आतां कैलासचद्राला सांगायचें असें कांहीं शिल्लक राहिलें नव्हतें. सांगणेंही कठीण जात होतें. पण शरयू मात्र सारखी आसवें पुशीत पुशीत विचार करूं लागली, तरीही बोलायला यापुढें कांहीं राहिलें आहे असें तिला वाटेना।

शरयूला आसरा मिळाला.

## १३

शरदृतूंतल्या पहांटेच्या वाऱ्याच्या गोडगोड झुळका ज्यावेळीं चंद्रनाथच्या खोलींत शिरून वागडत, त्यावेळीं सारी रात्र जागरण झाल्यामुळें चंद्रनाथ गाढ झोंपी जाई. सूर्याचे कडक किरण खिडकींतून त्याच्या तोंडावर डोळ्यांवर ज्यावेळीं येऊन झडप घालीत, त्यावेळीं चंद्रनाथची झोंपमोड होई. तरी देखील झोपेची झांपड त्याच्या डोळ्यावरून दूर होत नसे. डोळ्याचें पातेंन् पातें भारावून जात असे.—तरीसुद्धा बळेंबळेंच बिछाना सोडून तो बाहेर येई. सारा दिवस कसलें कामकाज नाहीं, आनंद नाहीं, उत्साह नाहीं, दुःख क्लेश सुद्धां जवळजवळ नाहीं. सुखाची आशा तर त्यानें केव्हांच सोडून दिली होती. नदीच्या आटलेल्या पाण्यांत संध्याकाळच्या वेळीं मालानें भरलेली होडी जशी या कांठावरून त्या कांठाला हाळत डुलत वांकणें घेत कशी बशी संथपणें जाते, त्याचप्रमाणें चंद्रनाथचे दिवस एका सूर्योदयापासून दुसऱ्या

सूर्योदयापर्यंत हालत डुलत जात होते. आकाशभर पसरलेल्या काळ्या मेघांनीं भर मध्यान्हकाळीं आपल्या जीवनाच्या सुखाचा सूर्य आच्छादून टाकला आहे, या मेघांच्या आडच एक दिवस तो अस्ताला जाईल, असेंच त्याला वाटत होतें. आतां यापुढें तिची भेट होणार नाहीं ! मुकाट झालेल्या त्याच्या भयाण घरांत निराशेची काळी छाया रोजरोज अधिकाधिक काळोख पसरूं लागली होती आणि त्या छायेच्या पसाऱ्याखालीं आळसावलेल्या डोळ्यांनीं जगाकडे पाहात चंद्रनाथ कसेबसे दिवस घालवीत होता.

या मार्गशीर्षांत चंद्रनाथचें पुन: लग्न करायचें, असें हरकाली म्हणत होती. चंद्रनाथ कांहीं बोलत नव्हता. तो बोलत नाहीं ही त्याची संमती आहे कीं विरोध आहे, याचा निर्णय करण्याच्या बाबतींत हरकालीची आपल्या नवऱ्या-बरोबर चर्चा चाले. मणीशंकरबाबूंना विचारलें तर ते म्हणत, " खुद्द चंद्रनाथला विचारल्याशिवाय कांहींच बोलतां यायचं नाहीं."

सध्यां कार्तिक मासांतली दुर्गापूजा सुरू झाली होती. मणीशंकरच्या पूजा-मंडपांतून सनईचे सूर भल्या पहाटे ऐकूं येऊं लागल्यामुळें गांवचे लोक आगामी आनंदाची वाटाघाट करीत होते. चंद्रनाथची झोप मोडली. डोळे झांकून बिछान्यावर पडून तो ऐकत होता. कसले कसले सूर निघताहेत याचा तो विचार करीत होता पण त्यांतल्या एकाही सुराबरोबर आनंदाची लहरी कांहीं तरळत येत नव्हती. उलट त्याच्या हृदयाकाशांतले काळेकुट्ट ढग अधिकाधिक पसरत होते.

आज एकाएकीं त्याला वाटलें, कीं आतां इथें रहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. नोकराला बोलावून तो म्हणाला, " माझं सामानसुमान बांधून तयार कर. आज मी अलाहाबादला जाणार. "

हरकालीच्या कानीं ती बातमी जातांच ती धांवतच आली. ब्रजकिशोरनें देखील त्याची समजूत घालायचा प्रयत्न केला. एवढेंच नव्हे, मणीशंकर स्वत: येऊन त्याला समजावून सांगूं लागले, कीं आज षष्ठीचा दिवस, आज कुठें जाणें इष्ट नाहीं, तरीही चंद्रनाथनें कुणाचेंच ऐकलें नाहीं.

दुपारीं हरिबाला येऊन हजर झाली. शरयू गेल्यापासून तिनें हें घर वर्ज्य केलें होतें.

तिला पहातांच चंद्रनाथ म्हणाला, " आज अचानक इकडे कुठं आजीबाई ! "

त्याच्या प्रश्नाचें उत्तर द्यायच्या ऐवजीं तिनेंच प्रश्न केला, "बाहेरगांवीं जातोयस आज ?"

चंद्रनाथ म्हणाला, "हो. जातोंय."

"पश्चिमेकडे जाणार आहेस ?"

"जाईनही."

कांहींवेळ विचार करून हरिबालेनें हळुच विचारलें, "आणखी कुठं जाणार आहेस का दादा ?"

तिचा उद्देश ध्यानीं येऊन चंद्रनाथ म्हणाला, "नाहीं—" नंतर उगीच बावरल्यासारखा तो हें उचल तें उचल करूं लागला.

जें सांगण्यासाठीं हरिबाला आली होती तें सांगायला तिला संकोच वाटूं लागला—सांगायचा धीरही होईना. कांहीं वेळानें उसनें अवसान आणून ती म्हणून गेली, "दादा तिची कांहीं व्यवस्था नाहीं का केलीस ?"

दोघांची भेट झाल्यापासून दोघांच्याही मनांत एकच गोष्ट आली होती. म्हणूनच या साऱ्या प्रश्नांसरशीं दोघांच्याही डोळ्यांना पाणी आलें. मन आवरण्यासाठीं चंद्रनाथनें दुसरीकडे तोंड फिरवलें आणि म्हटलें, "व्यवस्था कसली करायची ?"

"काशींत ती कुठं असते ?"

"असेल आपल्या आईकडे."

"तें खरं—पण—"

चंद्रनाथ तिच्या तोंडाकडे पाहून म्हणाला, "पण काय ?"

क्षणभर उगीच राहून आजीबाईनें हळुच विचारलें, "कांहीं पैशांची व्यवस्था कर दादा.—आज ती एकटी आहे—पण उद्यां दोन दिवसांनीं—"

चंद्रनाथनें कळल्या न कळल्यासारखें केलें. तो म्हणाला, "दोन दिवसांनीं काय ?"

डोळ्यांतून येणारीं दोन मोटीं टिपें हरिबालेनें चंद्रनाथच्या नजरेसमोर पुसलीं आणि म्हटलें, "तिच्या उदरात जो आहे—सुखासमाधानानं तो जर जगून चालता बोलता झाला तर—" चंद्रनाथला नखशिखान्त कांटे भरलें. तो एकदम म्हणाला, "आज षष्ठी आहे ना आजीबाई !"

"होय भाई."

"तर मग आज—"

"जायचं नाहीं म्हणतोस ?"

"त्याचाच विचार करतों."

"मग तसंच कर. पूजा उरकली म्हणजे जायचं तिकडे जा. या उत्सवाच्या दिवसात इथं घरींच रहा."

कां कोण जाणे, चंद्रनाथनें त्या प्रस्तावाला संमती दिली.

विजयादशमीच्या नंतर एके दिवशीं चंद्रनाथनें गुमास्त्याला बोलावलें आणि म्हटलें, "सरकारमहाशय, काशीला तिला सोडून आलांत त्यावेळीं हरिदयाळ कांहीं बोलले होते का ?"

गुमास्ता म्हणाला, "त्यांची माझी भेटच झाली नाहीं."

चंद्रनाथ घाबरून म्हणाला, 'भेट झाली नाहीं ? मग कुणाकडे ठेवून आलांत तिला ? तिची आई तरी भेटली ना ?"

गुमास्ता म्हणाला, "जी—नाहीं ! घरांत कुणीच नव्हतं."

"कुणीच नव्हतं ! त्या घरांत कुणी माणसं रहातात कीं नाहीं याची तरी खबर काढली होती ! हरिदयाळनीं कदाचित् बिऱ्हाड बदललं असेल."

गुमास्ता म्हणाला, "हो. ती खबर काढली होती. दयाळ घोषाळ अजून त्याच घरांत रहातात."

एक सुस्कारा सोडून चंद्रनाथ क्षणभर उगीच राहिला. नंतर त्यानें विचारलें, "आतापर्यंत किती पैसे पाठवले ?"

"जी !—कांहींच पाठवलं नाहीं."

"पाठवलं नाहीं ?—" चंद्रनाथला आश्चर्य वाटलें. मनाच्या टोंचणीनें त्याचा चेहरा पांढरा फटक पडला. तो म्हणाला, "कां ?"

गुमास्ता शरमेनें मेल्यासारखा झाला होता. तो म्हणाला, "मामाबाबू म्हणाले, कीं महिना पांचांच्या हिशेबानं कांहींतरी पाठवलं तरी चालेल."

तें ऐकून चंद्रनाथ भडकून उठला.

"पांचाच्या हिशेबानं ? पैसा काय मामाबाबूंचा होता ? आजपासून दरमहा काशीच्या पत्त्यावर पांचशें रुपये पाठवीत जा."

"जी." म्हणून बिचारा गुमास्ता स्तंभित होऊन हलुच तिथून सटकला.

ती बातमी कानीं जातांच हरकाली भुंवया चढवून म्हणाली, "वेड लागलंय त्याला!"

गुमास्त्याला खुणावून तिनें एका बाजूला बोलावलें. तो गेतांच ती हंसत सुटली. ती अशी कां हंसते आहे याची म्हाताऱ्या गुमास्त्याला चांगलीच कल्पना आली होती. हरकाली आड उभी राहून म्हणाली, "सरकारमहाशय, किती पैसे पाठवायला सांगितले त्यान?"

"महिना पांचशें रुपये."

पुनः आडून तिच्या खंचचट हंसण्याचा आवाज ऐकूं आल्यामुळें बिचारा गुमास्ता घोटाळ्यांत पडला. एकदां पोटभर हंसून घेतल्यावर ती शेवटीं गंभीर झाली. तशीच आडून म्हणाली, "अरेरे! रागावला कीं बिचाऱ्याला शुद्धबुद्धच रहात नाहीं. मेल्या भद्रकपाळीचं नशिबच तसं! पांच रुपये पाठवावे म्हणून मी म्हटलं तेव्हां राग आला वाटतं त्याला!—म्हणूनच रागारागानं पांचशें रुपये पाठवा म्हणाला वाटतं? कळलं का सरकारमहाशय, एक पैसासुद्धा द्यायचा नाहीं तिला, असं वाटतंय चंद्रनाथला."

या बोलण्याचा अर्थ पहिल्यानें गुमास्त्याच्या ध्यानांत चांगलासा आला नाहीं. मनांतल्या मनांत ज्यावेळीं त्यानें आंकडे मोडून पाहिले त्यावेळीं त्याला वाटूं लागलें, कीं हरकालीनें म्हटलें तेंच खरें. कळून सवरून जिला घराबाहेर काढलें तिला आपखुषीनें कुणी एवढी रक्कम पाठवील का?

विचार करून तो म्हणाला, "आपण सांगाल तसं करीन मी."

"सांगायचं आणखी काय? एवढी साधी गोष्टसुद्धां कशी कळली नाहीं तुम्हांला?"

बिचारा गुमास्ता ओशाळून म्हणाला, "तसंच करतों तर!"

"हो तसंच. पाठवायचंच असलं तर पांचाच्या हिशेबानं पाठवा. चन्द्रनाथनं नाहीं दिले तर माझ्या हिशेबातून पांच रुपये पाठवा."

हरकालीला दरमहा पन्नास रुपये हातखर्च म्हणून मिळत होते.

निघायच्या वेळीं गुमास्ता म्हणाला, "तेवढेच पाठवतों तर."

चंद्रनाथ घरीं नव्हता अलाहाबादला गेला होता. त्याला पत्र लिहून त्याची संमती घेण्याचें गुमास्त्याच्या मनांत आलें होतें. पण पुनः त्याला असें वाटलें, असल्या अवास्तव बाबतींत निष्कारण उठाठेव करायला जाऊन स्वतःवर अक्कलशून्यतेचा आरोप करून घेण्यानं काय फायदा!

# १४

वर उल्लेखिलेली घटना झाल्यानंतर दोन वर्षें निघून गेलीं. या मुदतींत इतर कुठें कांहीं बदल झालेला असो वा नसो, कैलासकाकाच्या जीवनांत मात्र मोठीच उलटापालट झाली होती. ज्या दिवशीं त्याची कमला निघून गेली होती, ज्या दिवशीं त्याचा कमलचरणनें शेवटचा निश्वास टाकून या जगाला रामराम ठोकण्यासाठीं डोळे झांकले होते, त्या दिवसापासून या अफाट विश्वाकडे कैलासचंद्रानेंही डोळेझांक केली होती. पण शरयूच्या छोट्या मुलानें या विसरलेल्या जगांतल्या स्नेहपूर्ण अशा विकट मार्गावर त्याला पुनः खेंचून आणलें होतें. त्या दिवशीं त्याचे डोळे कितीतरी दिवसानीं पुनः आनंदाश्रूंनीं भरून आले. डोळे पुसून तो म्हणाला, "माझ्या घरीं प्रत्यक्ष विश्वेश्वर आला!"

तेव्हां तो छोटा होता. 'विशू' म्हणून हांक मारली तर त्याला 'ओ' देतां येत नसे. तो नुसता पहात राही. त्यावेळीं तो शरयूच्या मांडीवर, लखियाच्या आईच्या कुशीला, अन् बिछान्यावर पडून राही—पण ज्या दिवसापासून त्याची चळवळीं पावलें उंबरठा पार व्हायला शिकलीं, ज्या दिवशीं त्याला कळूं लागलें, कीं दुधापेक्षां पाणी चांगलें, स्वच्छ अस्वच्छपणाची पर्वा न करतां वाटेल त्या पाण्याच्या भांड्यांत शरयूच्या नजरेआड तोंड बुडवून आकंठ पाणी प्यायला जेव्हां तो शिकला, ज्या दिवसापासून त्याला पुरेपूर खात्री पटली, कीं आपल्या गौरवर्ण कोमल अंगावर आणि तोंडावर कोळशाचा किंवा धुळीचा लेप चढला कीं देहाची शोभा जास्त वाढते, त्या दिवसापासून शरयूच्या कडेवर बसायचें सोडून तो कैलासचंद्राच्या मांडीवर मजबूत ठाण मांडून बसूं लागला.

सकाळींच उठून कैलासचंद्र हांक मारी, "विशू." विशू तोंड पसरून म्हणे, 'दादू!' कैलासचंद्र म्हणे, "चल तर दादा, शंभू मिश्राच्या घरीं एक डाव टाकून येऊं.' त्यानें बुद्धिबळांची पिशवी हातीं घेतली कीं, 'तल' म्हणून तो दोन्ही हात पसरून म्हाताऱ्याच्या गळ्याला मिठी मारी. कैलासचंद्राच्या आनंदाला पारावार नाहींसा होई.

शरयूला हांक मारून तो म्हणे, "पोरी, आमचा विशू पक्का खिलाडू होणार." शरयू गालांतल्या गालांत हंसे. बुद्धिबळांची पिशवी हातीं घेऊन विशू म्हाताऱ्याच्या कडेवर बसून बुद्धिबळें खेळण्यासाठीं बाहेर पडे. रस्त्यानें जातांना कुणी कुणी त्याला थट्टेनें विचारीत, "काका, म्हातारपणीं आतां तुम्हांला आणखी दोन हात फुटले वाटतं ?"

गालभर हंसून म्हातारा म्हणे, "हें पहा बाबाजी, हे हात आतां वाळलेयत. यांच्यांत आतां जोर राहिला नाहीं. तेव्हां आतां हे दोन नवे हात फुटलेयत. आतां या संसाराच्या वृक्षावरून कोसळायची भीति नको."

बोलणारा बाजूला होई आणि म्हणे, "म्हाताऱ्याच्या तोंडाला लागेल कोण ?"

शंभू मिश्राच्या घरीं बुद्धिबळांचा अड्डा मांडला म्हणजे श्रीमान् विश्वेश्वरला सुद्धां तिथें एक विशेष जागा होती. दादामहाशयांच्या मांडीवर बसून लाल मबलें झुलवीत तो गंभीरपणें पहात राही—जशी कांहीं जरूर पडली तर दोन डाव टाकायची त्याची तयारी होती.

हस्तीदंती मोहरीं त्याच्या दादामहाशयाच्या हस्तें एकामागून एक मारलीं जात, त्यावेळीं मोठ्या उत्साहानें विश्वेश्वर तीं दोन्ही हातांनीं आवरून आपल्या मबल्यांत भरून घेई. लाल रंगाच्या वजिरावर मात्र त्याचा डोळा असे. तो हातीं येईपर्यंत आशाळभूत नजरेनें सारखा तो त्याला सुचवी, "दादू, तो—तो !"

खेळाच्या रंगांत कैलासचंद्र विचुकपणें म्हणे, "थाब दादा—"

तो तितक्यांत जर कुठें आजुबाजूला गेला, तर कैलासचंद्राचें लक्ष विशू आणि बुद्धिबळें या दोघांच्यामधें सारखें हेलकावे घेत राही.

गडबडींत जर एकादें मोहरें मारलें गेलें तर कैलासचंद्र तसाच मागें फिरून हांक मारी, "दादू, हें आधीं घे. ये, ये. आधीं पळत ये." धांवत येऊन विश्वेश्वर आपल्या बैटकीचा ताबा घेऊन बसे आणि त्यासरशीं म्हाताऱ्याचा उत्साह दुपटीनें वाढे. खेळ संपला कीं तांबडा वजीर हातीं घेऊन दादामहाशयाच्या कडेवर बसून तो घरीं येई.

कैलासचंद्राच्या जीवनांत अशा प्रकारें नवी अमदानी सुरू झाली होती. शून्या संवयींत आतां खंड पडूं लागला होता. कित्येक दिवस मोहऱ्यांची पिशवी शोधून सांपडेनाशी होई—केव्हां केव्हां कुठल्या तरी कोपऱ्यांत पडून राही—केव्हां केव्हां रोज सकाळीं शंभू मिश्राची भेट घ्यायची सवडसुद्धां होत

नसे—गंगा पांडेच्या घरच्या दुपारच्या खेळाचा अड्डा एक प्रकारें बंदच झाला होता—मुकुंद घोषच्या बैठकखान्यात आतां पूर्वीसारखीं माणसें गोळा होत नव्हतीं. मुकुंद घोषनें कितीही हाका मारून कंठशोष केला तरी कैलासचंद्रची भेट रात्रीं होणें कठीण झालें होतें.

त्या दिवशीं रात्रीं दिव्याजवळ बसून तो आपल्या नव्या शिष्याला खेळायला शिकवीत होता. तो म्हणत होता, " विशू, घोडा अडीज घरं चालतो ! "

विशू गंभीरपणें म्हणे, " घोला—"

" हो—घोडा—"

" घोला च्यात्तो—" म्हणजे अर्थ असा, कीं घोडा चालतो.

" हो. घोडा चालतो—अडीज घरं चालतो. "

विश्वश्वराच्या मनांत नवीनच कल्पना येई. तो म्हणे, " गाडी च्यात्ते."

हताश होऊन कैलासचंद्र त्याला अडवून म्हणे, " नाहीं दादा, हा घोडा गाडी ओढीत नाहीं. तो घोडा वेगळा. "

शरयू कुठें जवळच असली तर मुलाच्या बुद्धीची तीव्रता पाहून पदरानें तोंड झांकून हंसत निघून जाई.

विशू त्यावेळीं आपल्या छोट्या करंगळीनें दाखवून देई, " तो—तो."
अर्थात तो लाल वजीर—तो त्याला हवा होता. एवढां मोहरीं असतांना या लाल वजीरावरच त्याची एवढी नजर कां तें म्हाताऱ्याला कांहीं केल्या कळत नसे.

पण त्याची मागणी नाकारणें शक्यच नव्हतें. म्हातारा पहिल्यानें फसलें तरी प्यादें उचलून द्यायचें ढोंग करी.—विशू मोठा चाणाक्ष होता—तो फसत नसे. शेवटीं मोठ्या नाखुषनें त्यानें मागितलेली वस्तु त्याच्या छोट्याशा हातीं देऊन तो म्हणे, " कळलं दादा, हरवूं नकोस. "

" कां ? "

" वजीर नसला तर खेळतां येईल का ? "

" नाय येत ? "

" मुळींच नाहीं. "

विशू गंभीर होऊन म्हणे, " दादू, वजील ! "

" होय दादू, वजीर ! "

त्या दिवशीं भोलानाथ चटर्जींच्या घरीं कीर्तन होतें.

कैलासचंद्र हांक मारून म्हणाला, "विशू, चल दादा, कीर्तनाला जाऊं."

लाल अंगरखें नि वर कोट घालून विश्वेश्वर त्यावेळीं तीट लावून केस विंचरून दादूच्या कडेवर बसून कीर्तनाला गेला. हरदासबुवांनीं राजा भरताची कथा लावली होती. त्या वनवासी महापुरुषाच्या हातीं आलेलें हरिणाचें बालक त्याला कसें बिलगलें, नुकतेंच जन्मलेलें तें हरिणाचें पोर काकुळतवाणांनें कसें त्याच्याजवळ आसरा मागूं लागलें, ती कथा मोठ्या करुणवाणीनें गाइली जात होती. त्यावेळीं विशू जरा पलीकडे बसला होता. कैलासचद्रानें त्याला ओढून आपल्या हृदयाशीं कवटाळलें.

त्यानंतर हरदासबुवा कथा सागूं लागले. क्षणाक्षणाला, घटकेघटकेला, दिवसादिवसाला, तें हरणाचें पोर कशाप्रकारें त्या राजाला आपल्या प्रेमाच्या पाशांत गुंतवूं लागलें, हजार ठिकाणीं तुटलेली मायेची साखळी त्याच्या सभोंवार कशी पुनः गुंफली जाऊं लागली, नित्यकर्मांत, पूजापाठांत, एवढेंच काय, पण ईश्वराचें चिंतन करतांनासुद्धां तिथे तें हरणाचें पाडस कसें उभें राहूं लागलें, ध्यान करीत असतांना मनःचक्षूंपुढें त्या निराधार पाडसाची आसवांनीं डंवरलेली करुण दृष्टि आपल्याकडे लागल्याचें कसें दिसूं लागलें, त्यानंतर तें कसें मोठें झालें, याचें वर्णन बुवा करीत होते. घर सोडून तें अंगणांत येऊं लागलें, अंगणातून बागेंत गेलें, त्यानंतर जंगलात जाऊं लागलें, हळुहळू जंगलांतून वाटेल तिकडे उड्या मारीत दूर दूर हिंडूं लागलें. तें यायच्या वेळीं आलें नाहीं तर भरतराजा कासावीस होऊं लागे. गच्चीवरून हांका मारी, 'ये पाडसा, ये!" त्यानंतर कवि स्वतः रडूं लागला. रडतां रडतां श्रोत्याचे डोळे भरून आले—गळे दाटूं लागले. जन्मारम्भ जोडलेलें मायेचें बंधन तोडून एके दिवशीं एका निमिषात तें पाडस कसें निघून गेलें, जंगलांतल्या हरणाच्या कळपांत कसें सामील झालें, माणसाच्या हृदयाची यातना जाणायला तें कसें विसरलें!—वृद्ध भरत टाहो फोडून हांका मारीत होता, 'ये पाडसा, ये!' कुणी आलें नाहीं. व्याकुळ होऊन फोडलेल्या हाकेला कुणी उत्तर दिलें नाहीं. साऱ्या जंगलभर भटकत तो त्या पाडसाला शोधीत होता. दऱ्याखोऱ्यात, कडाकपारींत, प्रत्येक झाडाखालीं, प्रत्येक वेलीच्या जाळींत, तो रडत रडत हांक टोकीत होता, "ये पाडसा, ये!" कुणी आलें नाहीं. एक दिवस, दुसरा दिवस, तिसरा दिवस निघून गेला,—

चंद्रनाथ म्हणाला, " एक मेली असं कळलं तर दुसरं करीन."

" इडापिडा टळो, असलं कांहीं बोलूं नको बाबा ! "

चंद्रनाथ उगीच राहिला.

मणीशंकरला एकदम भडभडून आलें. ते म्हणाले, " तुला संसारांतून उठवायला मीच कारणीभूत झालों असं जें मला वाटतंय—मनाला डांचतंय—ती डांचणी मेलों तरी नाहींशी व्हायची नाहीं."

बराच वेळ विचार करून चंद्रनाथ म्हणाला, " कुठलं स्थळ ठरवलंय ? "

डोळे पुसून मणीशंकर म्हणाले, " कलकत्त्याचं. एकदां तूं स्वतः जाऊन पाहून आलास तर बरं."

चंद्रनाथ म्हणाला, " उद्यांच जातों तर."

आशीर्वाद देऊन मणीशंकर म्हणाले, " मग जाच एकदां. पसंत झालं तर मला पत्र लिही. मी इकडचीं सारीं माणसं घेऊन सरळ कलकत्त्याला येईन—" थोडा वेळ थांबून ते म्हणाले, " आतां माझे फार दिवस राहिले नाहींत चंद्रनाथ. तूं संसारी झालास सुखी झालास, एवढं पाहीलं, कीं मी सुखानं डोळे मिटीन."

दुसरे दिवशीं चंद्रनाथ कलकत्त्याला गेला. बरोबर व्रजकिशोरमामा आला होता. मुलगी पाहायचा विधी उरकला. व्रजकिशोर म्हणाला, " मुलगी म्हणजे नुसती लक्ष्मी दिसते ! "

चंद्रनाथ तोंड फिरवून बसला. कोणत्याच प्रकारें त्यानें मत दिलें नाहीं.

स्टेशनवर गेऊन तिकीट काढून दोघेही गाडींत बसले. व्रजकिशोरनें विचारलें, " मग कसं काय ? पसंत पडली ना ? "

चंद्रनाथ म्हणाला, " नाहीं."

व्रजकिशोर एकदम कोसळून पडला म्हणाला, " एवढी छान मुलगी—तरी पसंत पडली नाहीं ? "

चंद्रनाथनें पुनः सांगितलें, " नाहीं "

व्रजकिशोरला विचार पडला. त्यानें शरयूला पाहिलें नव्हतें.

ठरल्या स्टेशनवर आगगाडी थांबली तेव्हां व्रजकिशोर खालीं उतरला. चंद्रनाथनें जाऊन अलाहाबादचें तिकीट काढलें. व्रजकिशोर म्हणाला, "आतां केव्हां येणार ? "

" काकांना माझे प्रणाम सांगा. त्यांना म्हणावं आतां इतक्या लवकर यायची इच्छा नाहीं. "

ती हकिकत ऐकल्यावर कपाळावर हात मारून मणीशंकर म्हणाला, " जें व्हायचं तें होईल. माझी प्रकृति बरी असती तर स्वतःच जाऊन सूनबाईला शोधून घेऊन आलों असतों. उगीच लोकांच्या भीतीनं नरकांत किती दिवस पचायचं? आणि हे लोक म्हणजे तरी काय? तुम्हींआम्हींच ना!"

ही हकिकत कळतांच दांतओठ खाऊन हरकाली म्हणाली, " मरायच्या वेळेला थेरड्याला भुतानं झपाटलं वाटतं. " गुमास्त्याला बोलावून तिनें विचारलें, " चंद्रनाथ काय म्हणाला ? "

गुमास्ता म्हणाला, " आजपर्यंत किती पैसे काशीला पाठवले, एवढंच विचारलं त्यानीं. "

" नुसतं एवढंच विचारलं ? आणखी कांहीं नाहीं ना ? "

भकास तोंडानें हरकाली तिथून निघून गेली.

## १६

चन्द्रनाथनें अलाहाबादचें तिकीट काढलें होतें खरें पण वाटेंतच त्यानें बेत बदलला. तो काशीला येऊन पोहोंचला.

बरोबर दोन नोकर होते. त्यानीं गाडी ठरवून सामान भरलें पण तो त्या गाडींत बसला नाहीं. डाक बंगल्यावर आपली वाट पहात राहायचा हुकूम करून तो पायींपायीं दुसऱ्याच रस्त्याला वळला.

रस्त्यानें चालतांना त्याला त्रास होत होता. त्याचा चेहरा उतरला होता—मढयागत झाला होता.—टाकलेलें आपले प्रत्येक पाऊल आपल्याच उरावर पडतें आहे असें त्याला वाटूं लागलें होतें. तरीही तो सारखा चालत होता. थांबत नव्हता.

थोड्या वेळानें हरिदयाळच्या घराच्या तो अगदीं जवळ जवळ आला. रोजच्या परिचयाचा तो सारा रस्ता. गल्लीच्या वळणावर तेंच पूर्वांचें ओळखीचें दुकान—अगदीं तसेंच दिसत होतें. दुकानाचा भला लठ्ठ मालक अगदीं पूर्वींसारखाच मोठी भट्टी घेऊन त्यांत भजीं तळीत होता. चंद्रनाथ क्षणभर तिथें

उभा राहिला. दुकानदारानें त्याच्याकडे पाहिलें. पण साहेबी थाटाचा पोषाख केलेल्या माणसाला भर्जी घ्यायला कसें सांगावें असा त्याला प्रश्न पडला. एकदां नुसतें पाहून तो पुनः आपल्या कामाला लागला.

चंद्रनाथ पुढें चालूं लागला. वळणाच्या पुढें त्याचें पाऊल उचलेना. काशींतल्या अरुंद गल्ल्या—एवढीसुद्धां हवा येणें कठीण—श्वासोच्छ्वास करणेंसुद्धां मुष्कील होत होतें. एकदोन पावलें चालून तो थांबे—पुनः चाले, पुनः थांबे.—वाट संपतां संपत नव्हती. त्याला वाटूं लागलें, आतां यापुढें जायचें आहे तरी किती लांब? वाट संपल्यावर शेवटीं काय दिसणार आहे ?

शेवटीं एकदांचा तो हरिदयाळच्या घरासमोर येऊन उभा राहिला. किती तरी वेळ तो उभा राहिला होता. हांक मारावी असें वाटलें पण त्याचा घसा कोरडा पडला पडला होता. बसक्या आवाजानें, मोडक्या बोलीनें, त्यानें एकदां हांक मारली—तो पुनः थांबला. घड्याळ काढून पाहिलें—नऊ वाजले होते. धीर करून त्यानें पुनः हांक मारली, " ठाकूर ! दयाळठाकूर ! "

कुणी उत्तर दिलें नाहीं. त्याचा साहेबी थाटाचा पोशाख पाहून रस्त्यावरून जाणारा प्रत्येक माणूस परतून परतून त्याच्याकडे पहात होता.

चंद्रनाथनें पुनः हांक मारली, " दयाळठाकुर ! " आतां आंतून कुणीतरी बायकी आवाजात उत्तर दिलें, " ठाकूर घरीं नाहींत. "

उत्तर देणारी होती एक बंगाली मोलकरीण.

ती दारापर्यंत आली आणि चंद्रनाथचा पोशाख पाहून तशीच आड झाली. मातृभाषेंत तो बोलत होता म्हणूनच एकदम भिऊन पळून गेली नाहीं.

पुनः ती आडून म्हणाली, " ठाकूर घरीं नाहींत. "

" केव्हां येतील ? "

" दुपारीं. "

चंद्रनाथ आंत आला. आनंद, शंका आणि लाज या तिहींच्या संमिश्रणानें त्याचें हृदय थरथर कांपत होतें.—आंत शरयू असेल ! पण आंत शिरून पहातो तों तिथें कुणीच दिसलें नाहीं. त्यानें विचारलें, " घरात दुसरं कुणी नाहीं का ? "

" नाहीं. "

" कुठं आहेत ती ? "

" कोणती ती ? "

" एक बाई . "

" ही मी आहें तेवढीच. माझ्याखेरीज दुसरी कुणी बाई इथं नाहीं. "

" एक लहान मूल ? "

" नाहीं—कुणी नाहीं. "

चंद्रनाथ मटकन पायरीवरच बसला. तो उद्गारला, "मग हीं गेलीं कुठं ?"

मोलकरीण अस्वस्थ होऊन म्हणाली, " नाहीं हो, इथं दुसरं कुणीच नाहीं. मी नि ठाकूरमहाशय यांच्याखेरीज इथं दुसरं कुणी नाहीं. गेल्या एक महिन्यांत कुणी यजमान देखील आला नाहीं. "

स्तब्ध होऊन चंद्रनाथ जमिनीकडे पहात बसून राहिला. त्याच्या मनाला यावेळीं काय यातना होत होत्या त्या एक भगवंतालाच माहीत. कांहीं वेळ गेल्यावर त्यानें पुनः विचारलें, " केव्हांपासून तूं इथं आहेस ? "

" सुमारें दीड वर्ष. "

" तेवढ्यांत कुणाला पाहिलं नाहींस ? एक तिचा मुलगा किंवा मुलगी,—नाहींतर ती नुसती बाईच—कुणीच नाहीं ? कुणालाच पाहिलं नाहींस ? "

" नाहीं. मी कुणालाच पाहिलं नाहीं "

" त्यांच्याबद्दल कुणाकडून कांहीं ऐकलं नाहींस ? "

" नाहीं. "

चंद्रनाथनें यानंतर कांहीं विचारलें नाहीं. दयाळठाकूरची वाट पहात तो तिथेंच बसून राहिला. त्याची शरयू हयात नाहीं असें आतां त्याला वाटूं लागलें होतें. तरीही प्रत्यक्ष ऐकून खात्री करून घ्यावी म्हणून तो बसून राहिला. एकेक मिनीट त्याला एक वर्षासारखें भासत होतें.

दुपार उलटून गेल्यावर हरिदयाळ ठाकूर घरीं आले. पहिल्याच भेटीला ते जरा चमकले खरे पण लगेच त्यांना त्याची ओळख पटली.

कोरड्या बोलांनीं त्यांनीं विचारलें, " खरंच की ! चंद्रबाबू होय ? केव्हां आलांत ? "

कोरडलेल्या आवाजानें चंद्रनाथ उत्तरला, " बराच वेळ झाला. हीं कुठं गेलीं ? "

" अं! असं असं ? हीं म्हणजे तीं होय ?—"

डळमळत डळमळत चद्रनाथ उठून उभा राहिला. जिवाचा आटापीटा करून त्यानें तोंडावाटे शब्द काढायचा प्रयत्न केला आणि विचारलें, " सारं आटोपलं वाटतं ? केव्हां ? "

" काय आटोपलं ? "

तितक्याच भरलेल्या गळ्यानें चंद्रनाथनें कसाबसा प्रश्न केला, " शरयू केव्हां मेली ठाकूर ? "

आतां ठाकूरच्या ध्यानीं आलें. ते म्हणाले, " मेली नाहीं. खुशाल आहे."

" कुठं आहे ? "

" कैलासकाकाच्या घरीं "

" कुठं आहे तें घर ? "

" याच गल्लीच्या टोंकाला. फणसतळ्याच्या घरांत. "

दोन्ही हातानीं मस्तक दाबून धरून चंद्रनाथ पुनः मटकन खालीं बसला. कितीतरी वेळ तो उगीच बसून राहिला होता. नंतर अगदीं शांतपणानें त्यानें विचारलें, " ती का इथं नाहीं ? "

दयाळठाकूरनीं असा विचार केला, कीं गोष्ट एकंदरींत खोटी नव्हे—मग उगीच लाज कशाला बाळगायची ? धीर करून ते म्हणाले, " आपण जिला घरांत राहूं दिलं नाहीं तिला मी माझ्याकडे कशी राहून घेऊं ? तुमच्या-सारख्या दहापांच यजमानांच्या कृपेनंच ना आमचं चालतं ? "

चंद्रनाथला त्याचें बोलणें पटलें. थोडा विचार करून तो म्हणाला, " काय म्हणून ती कैलासकाकाच्या घरीं गेली ? "

" तें स्वतःच घेऊन गेले तिला. "

" ते कोण ? "

" काशीवासी एक दुःखी ब्राह्मण आहे तो. "

" शरयूची अन् त्यांची पूर्वींची ओळख होती का ? "

" हो. चांगली ओळख होती. "

" त्यांचं वय काय ? "

मनांतल्या मनांत हंसून हरिदयाळ म्हणाले, " जवळ जवळ साठाच्या आसपास असावं. शरयूला ते ' आई ' म्हणून हांक मारतात. "

" तिथं आणखी कोण कोण आहेत ?"

" एक मोलकरीण आहे, शरयू आणि विशू."

" विशू कोण ?"

" शरयूचा मुलगा."

चंद्रनाथ एकदम उभा राहून म्हणाला, " येतों."

हरिदयाळनें त्याला थांबवून घेतलें नाहीं. संथपणें चन्द्रनाथ बाहेर निघून गेला. गल्लीच्या टोंकाला आल्यावर त्यानें एका माणसाला विचारलें, " कैलास बाबाचं घर माहित आहे का तुम्हांला ?"

त्यानें बोटानें घर दाखवून दिलें. चन्द्रनाथ सरळ घरांत शिरला. त्यावेळीं घरांत समोर कुणीच दिसलें नाहीं. एक सुंदर गुटगुटीत बाळसेदार मुलगा ओसरीवर बसून भांड्यांतलें पाणी घेऊन सर्वांगावर माखीत होता. त्याच्या कोंवळ्या चेहऱ्यावरची काळवंडलेली छाया जणूं काय त्याला हादरून हालवून हंसत हंसत खिजवीत होती.

त्याला उचलून कडेवर घेऊन चंद्रनाथनें आंत प्रवेश केला. विशू घाबरला नाहीं कीं भ्यायल्याचें कोणतेंही लक्षण त्यानें दाखवलें नाहीं. अपरिचित माणसाकडे जायची त्याला संवय असावी असें वाटलें. चन्द्रनाथच्या नाकावर आपला चिमुकला गोंडस हात ठेवून त्याच्याकडे पाहून तो म्हणाला, " कोण तुमी ?"

चन्द्रनाथनें कडकडून त्याचा मुका घेतला आणि म्हटलें, " मी बाबा."

" बाबा ?"

" हो, बाबा ! कोण तूं ?"

" मी विशू."

चन्द्रनाथनें घड्याळाची सांखळी सोडवून काढून त्याच्या गळ्यांत घातली. खिशांत चाकू, पेन्सील, मनीबॅग, जें जें कांहीं होतें तें काढून मुलाच्या हातीं दिलें. मुलाच्या हातीं आणखी कांहीं द्यावें असें त्याला वाटत होतें पण कांहींच सांपडलें नाहीं.

एवढ्या जिनसा हातीं आल्यामुळें विशू एकदम खूष झाला आणि म्हणाला, " बाबा !"

एक शब्दसुद्धां न बोलतां चन्द्रनाथनें त्याचा चिमुकला चेहरा आपल्या चेहऱ्याशीं भिडवला आणि म्हटलें, " बाबा !"

लखियाच्या आईनें तें पाहून आरडाओरड करायला सुरवात केली. कुणी तरी साहेब घरांत शिरला आणि विशूला कडेवर घेऊन खेळवतो आहे असें खिडकींतून सहज पहातांना तिला दिसलें होतें. दम अटकून ती एकदम सैंपाकघराकडे धावली. कैलासचंद्र घरीं नव्हता. आज किती तरी दिवसांनीं विश्वेश्वराची पूजा करण्यासाठीं तो गेला होता शरयू देखील नुकतीच देवळांतून परत येऊन सैंपाकाला लागली होती. लखीयाची आई तिथें धापा टाकीत आली आणि म्हणाली, “ माईजी !—”

“ काय ग ! ”

“ घरांत साहेब घुसलाय आणि विशूला कडेवर घेऊन खेळवतोय.”

शरयू आश्चर्यचकित होऊन म्हणाली, “ म्हणतेस काय ! ”

दाराच्या आडून तिनें पाहायचा प्रयत्न केला पण कुणी दिसलें नाहीं. लखियाच्या आईनें तिचा पदर ओढून तिला मागें ओढलें आणि म्हटलें, “ बाहेर जाऊं नका. बाबूजी येऊं दे.”

शरयूनें तिचें म्हणणें ऐकलें नाहीं. तिला संशय आला होता. पुढें होऊन पहाते तों तिनें सांगितलें तें खरें असावें असें तिला वाटलें. साहेबासारखा दिसणारा कुणीतरी किडबिड करीत विश्वेश्वराला कडेवर घेऊन खेळवीत बोलतो आहे, असें तिला दिसून आलें. कमाबसा धीर करून ती खिडकीपाशीं गेली. नुसत्या सावलीवरून सुद्धा तिनें त्याला ओळखलें असतें. पहातांक्षणींच तिला ओळख पटली.––तिचा नवरा—चन्द्रनाथ !

ती आंत गेली आणि गळ्यात पदर घेऊन चंद्रनाथच्या पायावर मस्तक ठेवून तिनें प्रणाम केला.

ती उठून उभी राहिली.

चंद्रनाथ उद्गारला, “ शरयू ! ”

## १७

पहिल्या भेटीला नवराबायकोचें संभाषण झालें तें एवढेंच.

चंद्रनाथ म्हणाला, “ फार रोडलेली दिसतेस ? ”

त्याच्या तोंडाकडे पाहून शरयू उगीच थोडीशी हंसली. जसें कांहीं तिला म्हणायचें होतें, ‘ यांत कसलं आश्चर्य ? ’

तितक्यांत चंद्रनाथ विशूला घेऊन खेळण्यात बराच गुंतला होता. शरयूनें त्याच्या बुटाचे बंद सोडले, अंगातला कोट शर्ट, एकेक काढून घेतले, भिजलेला पंचा घेऊन त्याचे पाय पुसले आणि पंखा घेऊन ती त्याला वारा घालूं लागली. या साऱ्या कांहीं गोष्टी तिनें अशा रीतीनें केल्या कीं जणूं काय हा तिचा सरायच होता—रोजच तसें चालू होतें.

या जन्मांत पुनः ज्याची भेट व्हायची आशासुद्धां नव्हती—आज अकस्मात किती तरी दिवसानीं तो आला तेव्हां किती आंसवें गळतील. किती सुस्कारे सुटतील, असें तिला वाटलें होतें.—पण तसें कांहीं झालें नाहीं. जसा कांहीं तिचा हा नवरा पूर्वी रोज येत होता तसाच आज आपला जरा थोडासा उशीरां आला, जरा बराच उशीर लागला, अशाच कल्पनेनें शरयू वागत होती.

पण चंद्रनाथची वागणूक मात्र अगदींच विलक्षण झाली होती. तो विशूबरोबरच बोलत राहिला होता. घरांत दुसरें कुणीच नाहीं असा समज करून घेऊन चुकवाचुकवी करीत होता. बाळबुद्धि विश्वेश्वराखेरीज घरांत जसें कांहीं दुसरें कुणीच नाहीं—असलें तरी त्याची दखलगिरी घ्यायची नाहीं—असेंच जणूं कांहीं त्यानें ठरवलें होतें. आपण आतां पकडला गेलों आहें हें कुणाच्या ध्यानीं येऊं नये म्हणून जीव तोडून तो मुलालाच घेऊन खेळवीत राहिला होता.

शरयू म्हणाली, " बाळ, तिकडे जाऊन खेळ पाहूं."

खाटेवरून विशू खालीं पडणार होता. चंद्रनाथनें त्याला एकदम सांवरून खालीं उतरलें. त्याच्या आईनें चंद्रनाथला नमस्कार केल्याचें त्यानें पाहिलें होतें, म्हणून खालीं उतरल्याबरोबर बापाच्या पायांवर पट्कन डोकें ठेवून नमस्कार करून तो पळून गेला. त्याला पकडण्यासाठीं चंद्रनाथनें हात पुढें केला पण तितक्यांत तो त्याच्या आटोक्याबाहेर गेला होता.

त्याच्या वक्षस्थलावर हात ठेवून शरयू म्हणाली, " असं काय झाल हें ? आजारी होतां का ? "

" नाहीं. आजारी नव्हतों. "

" तर काय विवंचना करीत बसलां होतां ! "

तिच्या तोंडाकडे पहात चंद्रनाथ म्हणाला, " तुला काय वाटतं ? "

शरयूनें या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. विषयांतर करून ती म्हणाली, "उशीर झाला. आतां आंघोळीला चला."

चंद्रनाथनें विचारलें, "धरधनी कुठ आहेत?"

"ते देवळांत गेले आहेत पूजेला. मला वाटतं, संध्याकाळीं येतील."

"तूं काय म्हणतेस त्यांना?"

"पूर्वी आजोबा म्हणत असें—आतांही तेंच म्हणतें."

यावर चंद्रनाथनें दुसरें कांहीं विचारलें नाहीं.

शरयूनें विचारलें, "बरोबर कोण आलंय?"

"हरी नी मधु आलेयत. ते गेले आहेत डाक बंगल्यावर."

"त्यांना इथं आणायचा धीर झाला नाहीं?"

चंद्रनाथनें या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं.

चन्द्रनाथ जेवायला बसला त्यावेळीं समोर एक थाळी पुऱ्या ठेवलेल्या पाहून आश्चर्यचकित झाला. वाकडें तोंड करून थाळी दूर लोटून तो म्हणाला, "हें आणखी काय? ही काय थट्टा लावली आहेस?"

शरयू बिचारी ओशाळली. एवढेंसें तोंड करून म्हणाली, "नको आहेत?"

शरयूच्या तोंडाकडे क्षणभर पाहून चंद्रनाथ म्हणाला, "दुपारच्या वेळीं मी कधीं पुऱ्या खाल्ल्या होत्या का?"

काय उत्तर द्यावें हें न सुचल्यामुळें शरयू उगीच राहिली.

चन्द्रनाथ म्हणाला, "आज कांहीं तूं मला पहील्यानंच वाढीत नाहींस! मला काय आवडतं—काय संवय आहे माझी—तें सुद्धां विसरलीस वाटतं!"

शरयूच्या डोळ्यांत आसवें आली. आतां ते दिवस कुठें राहिले होते? ती म्हणाली, "भात वाढूं? पण—"

"पण काय? थंड झालाय?"

"नाहीं, तसं नव्हे—इथं जेवण मी रांधतें."

"घरींसुद्धां तूंच रांधीत होतीस की!"

थोडावेळ थांबून शरयू म्हणाली, "माझ्या हातचं चालेल?"

आतां चंद्रनाथनें मान खालीं घातली. शरयू आतां आपल्यालेखीं परकी झाली आहे याची त्याला आठवण नव्हती. तिच्या हातचें अन्न खाणें आतां चाललें नसतें. शरयूच्या उद्गारांत केवढी तरी मोठी खोंच होती. तो बराच वेळ स्वस्थ बसला. त्यानंतर हळुच म्हणाला, " शरयू, या दुपारच्या वेळीं माझ्या डोळ्यांतून टिपं गळलेलीं पाहिल्याशिवाय तुझं समाधान होत नाहीं का ? "

शरयू एकदम उठून उभी राहिली आणि म्हणाली, " मग आणतें तर ! "

सैपाकघरांत जातांच तिला भडभडून रडें कोसळलें. तिनें डोळे पुसून घेतले, पाणी घेऊन चांगले धुतले—तरी पुनः आसवें आलीं, पुनः तिनें तीं पुसलीं,— मन आवरणें शरयूला आतां कठीण होऊन गेलें होतें. पण नवरा उपाशीं वाट पहात बसला आहे हें ध्यानीं येतांच भाताची थाळी घेऊन ती बाहेर आली. पूर्वीप्रमाणें जवळ बसून आग्रह करकरून तिनें त्याला जेवूं घातलें. त्याचें जेवण होतांच उष्टें भांडें हातीं घेऊन पुनः एकदां पोटभर रडून घेण्यासाठीं ती सैपाकघरांत परत आली.

दोन वाजले होते. चंद्रनाथच्या कुशीला विश्वेश्वर मोठ्या आरामांत झोपीं गेला होता. शरयू आंत आली.

चंद्रनाथ म्हणाला, " काय ? उरकलं का सारं घरकाम ? "

" नव्हतंच कांहीं काम ! आजोबा अजून आले नाहींत. "

मग शरयूनें घरच्या गोष्टी सुरू केल्या. घरची प्रत्येक खोली, त्या खोलींतला प्रत्येक जिन्नस, मामामामी, दासदासी, सरकार गुमास्ते, सई हरिबाला, शेजारी पाजारी. सर्वांची एकेकाची हकीकत विचारायला तिनें सुरवात केली. हें भाषण चाललें असतांना दोघांपैकीं एकाच्याही हें ध्यानांत आलें नाहीं, की ही सारी चौकशी करण्यांत शरयूला कांहीं लाभ नव्हता, कीं हीं सारीं उत्तरें देण्यांत चंद्रनाथला क्लेश होणार होते. एवढीसुद्धां लाजशरम की ओशाळेपणा— एवढासुद्धां संकोच वाटला पाहिजे—हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं. एकजण मोठ्या आनंदानें प्रश्न करीत होती, दुसरा मोठ्या आनंदानें त्याचें उत्तर देत होता. दोन दोस्त फार दिवस एकमेकांपासून दुरावले होते ते आतां पुनः एकत्र आले होते.

मधेंच शरयूनें प्रश्न केला, " लग्न कुठं झालं ? "

ही तर उघड उघड थट्टा होती !

चंद्रनाथ म्हणाला, " पश्चिमेला. "

" कशी काय आहे नवरी ? "

" तुझ्यासारखी. "

तें ऐकून शरयूच्या हृदयाला एकदम बाण बसला---तें दुःख तिला सोसता आलें नाहीं.---ती बसली होती तिथेंच आडवी पडली --चेहरा एकदम गोरामोरा झाला.

चंद्रनाथनें घाबऱ्याघाबऱ्या खाटेवरून खालीं उडी मारली आणि जवळ येऊन हातानें धरून तिला उठवायचा प्रयत्न केला. पण शरयूला उठायची ताकद नव्हती. चंद्रनाथ खालीं बसला आणि तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन रडकुंडीला येऊन त्यानें हांक मारली, " शरयू ! "

शरयूनें डोळे उघडले, एक क्षणभरच नवऱ्याच्या तोंडाकडे पाहिलें आणि पुन: डोळे मिटले. तिचे ओठ थरथर कांपत होते. ती कांहींतरी अस्पष्ट बोलली असावी --पण काय तें कळलें नाहीं.

चंद्रनाथ फार घाबरला. पाणी घेऊन येण्यासाठीं तो ओरडला तेव्हा लखियाची आई जवळच होती ती पाणी घेऊन खोलींत आली. ती तितकीशी घाबरली नाहीं. ती म्हणाली " बाबू , आतां बरं वाटेल तिला. मधून मधून तिला हें असं होतं. "

त्यानें तिच्या तोंडावर पाण्याचा शिटकाव केला आणि पंखा घेऊन तो तिला वारा घालूं लागला. विशू आला आणि तिच्या केसांच्या बटा धरून ओढून ओरडला, " आई ! "

शरयू शुद्धीवर आली. लाजून माथ्यावरचा पदर पुढें ओढून ती उठून बसली. लखियाची आई आपल्या कामाला निघून गेली. भीतीनें चंद्रनाथचा चेहरा काळवंडून गेला होता.

शरयू हंसली---अगदीं क्षीण, अगदीं एवढीशी, गोड गोड हंसून ती म्हणाली, " घाबरलांत ? "

चंद्रनाथचे डोळे आसवांनीं डंवरले होते, त्यांतून टपाटप टिपें खालीं पडूं लागलीं. हातानें डोळे पुसून तो म्हणाला, " मला वाटलं, सारं कांहीं आटोपलं ! "

शरयूला वाटलें, ' तुमच्या मांडीवर डोकं होतं. या हतभागिनीच्या नशिबीं एवढं कुठलं भाग्य ? ' ती उघड म्हणाली, " असंच होतं मधून मधून. "

" तें कळलं आतां—पण तेव्हां होत नव्हतं ! आतां होतं, हेंही आतां कळलं ! " असें म्हणून चंद्रनाथ कितीतरी वेळ मुकाट्यानें ताठरल्यासारखा बसला होता.

खिशातून किल्ल्यांचा जुडगा बाहेर काढून शरयूच्या पदराच्या टोंकाला बांधीत तो म्हणाला, " ही तुझी किल्ल्यांची रिंग—तूं माझ्याकडे ठेवायला देऊन आली होतीस—आज ती तुला पुनः देतोंय. एकदां पाहून घे,—या वापरल्यायत कधीं असं वाटतं तुला ? "

शरयूनें पाहिलें, तिच्या आवडत्या किल्ल्यांच्या रिंगवर ताव दाटली होती. त्या हातीं घेऊन ती म्हणाली, " तिच्याकडे कां दिल्या नाहींत ? "

चंद्रनाथचा उतरलेला चेहरा एकदम मोकळेपणानें हंसरा झाला. प्रेमाची चंचल छटा त्याच्या दोन्ही डोळ्यात नाचूं लागली—तरीही मन आवरून तो म्हणाला, " तिलाच तर दिल्या शरयू ! "

शरयूला नीटसें कळलें नाहीं. संदिग्धपणें नवऱ्याच्या तोंडाकडे दृष्टि भिडवून ती हळूच म्हणाली, " मी नव्या नवरीची गोष्ट बोलतेंय. तुमची दुसरी बायको—तिच्याकडे कां दिल्या नाहींत या ? "

आतां मन आवरणें चंद्रनाथला कठीण गेलें. एकदम दोन्हीं हात पुढें करून शरयूचा चेहरा आपल्या हृदयाशीं कवटाळून तो गहिंवरून म्हणाला, " तिलाच दिल्या—शरयू , तिलाच दिल्या. दुसरी बायको कुठली ?—आहे ही एकच आहे. पण ती केव्हांच जुनीपुराणी व्हायची नाहीं—अगदीं आहे तशी नवी नवरी आहे. विश्वेश्वराच्या प्रसादी फुलासारखी पहिल्यानें एकदां या काशींतून हृदयाशीं धरून घेऊन गेलों, तशीच्या तशीच, अगदीं नवी नवरी आहे. आज पुनः विश्वेश्वराच्या पायांपाशीं पडलेली उचलून घेऊन जातों आहें, ती देखील तशीच नवीच्या नवी ! "

सांजवात केल्यावर मुलाला मांडीवर घेऊन शरयू नवऱ्याच्या पायथ्याशी बसली होती. ती म्हणाली, " आजोबांना भेटल्याशिवाय तुम्हाला जातां यायचं नाहीं. आज रात्रीं इथं राहायला हवं. "

चन्द्रनाथ म्हणाला, " मला सुद्धां तसंच वाटतंय. आज कांहीं जाणं होत नाहीं. "

केव्हांपासून एक प्रश्न विचारावा असें शरयूच्या मनांत येत होतें. पण तिला लाज वाटत होती—तशीच संधीही सांपडली नव्हती. आतां तिनें विचारलें, " तुमच्याकडे कसलं लाजायचं ?—"

शरयूच्या तोंडाकडे पहात चंद्रनाथ उगीच बसला होता. शरयू म्हणाली, " एक पत्र लिहावं असं एकदां मनांत आलं होतं.—"

" मग का लिहिलं नाहींस ? मी काहीं नको म्हटलं नव्हतं तुला. "

क्षणभर विचार करून शरयू म्हणाली, " तुम्हांला राग येईल म्हणून भीति वाटत होती मला—आतां पुनः केव्हां येणार ? "

" जेव्हां ये म्हणशील तेव्हां येईन ! "

एव्हांच काय तें बोलून टाकावें असें शरयूला वाटलें होतें. पण पुनः तिला वाटलें, माणसाचा विश्वास कुणी सांगावा ? याचवेळीं सांगून टाकलें नाहीं तर पुढें कदाचित् सांगायची संधि मिळणार नाहीं. चंद्रनाथ पुनः येईलही. पण तोंवर जळून पिचून आपली राखरांगोळी होऊन जाणार नाहीं कशावरून ? मनाचा निश्चय करून ती म्हणाली, " तुमच्याकडे आतां कसली लाज बाळगायची ? "—

" तें सांगून झालं. आतां पुढं बोल ना. "

क्षणभर थांबून शरयू म्हणाली, " यापुढं जगायची इच्छा नाहीं—अशा रीतीनं जगणं कांहीं मला मानवत नाहीं—"

चंद्रनाथला वाटलें, हें भाषण कांहीं थट्टेसारखें दिसत नाहीं. त्यानें तिच्याकडे निरखून पाहिलें. तिचा चेहरा गोरामोरा झाला होता. तो घाबरून म्हणाला, " शरयू, कसल्यातरी दुखण्यानं पछाडलं नाहीं ना तुला ? "

केविलवाणें हंसून शरयू म्हणाली, " तें कांहीं सांगतां येत नाहीं. छातींत केव्हां केव्हां कळा मारल्यासारख्या वाटतात—"

चंद्रनाथ म्हणाला, " आणि ही मूर्च्छा ? "

शरयू हंसली, " त्यांत कांहीं विशेष नाहीं. "

चंद्रनाथ आपल्याशींच म्हणाला, ' जें व्हायचें तें होऊन गेलं. आतां सारं सर्वस्व खर्ची घालून तुला हिंडतीफिरती करीन. '

शरयू म्हणाली, " तुमच्यापाशीं एक मागणं आहे—द्याल का ? "

" काय पाहिजे ? "

" माझ्यासाठीं काहीं नको. मी मेल्याचं तुम्हांला कळलं म्हणजे मग हवंय मला तें —" मुलाला मांडीवरून उचलून त्याच्या पायाजवळ बसवून ती म्हणाली, "—तेव्हां येऊन या माझ्या बाळाला घेऊन जा—"

चंद्रनाथनें मोठ्या उल्हासानें विश्वेश्वरला उचलून उराशीं कवटाळलें आणि त्याचा मुका घेतात. तितक्यांत बाहेरून कैलासचंद्राची हांक आली, " दादा, विशू ! "

बापाच्या मांडीवरून धडपडून खालीं उतरून विश्वेश्वर म्हणाला, " दादू, दातो ! "

शरयू उठून उभी राहिली आणि कैलासकाकाला म्हणाली, " हे आले आहेत. "

थोड्या वेळानें विश्वेश्वरला कडेवर घेऊन कैलासचंद्र अंगणांत येऊन उभा राहिला. चंद्रनाथही बाहेर आला. कैलासचंद्रनें यापूर्वी चंद्रनाथला कधीं पाहिलें नव्हतें—पाहिलें असतें तरी ओळखलें नसतें. तो त्याच्याकडे पहात राहिला. मुलानें ओळख करून दिली. त्याच्याकडे बोट करून विशू म्हणाला, " ओतो बाबा ! "

चंद्रनाथनें त्याला प्रणाम केला आणि तो उठून उभा राहिला. त्याला आशीर्वाद देऊन कैलासचंद्र म्हणाला, " ये बाबा, ये ! "

## १८

चंद्रनाथनें ज्यावेळीं म्हाताऱ्याला उद्देशून सांगितलें, कीं उद्यां मी यांना घेऊन जाणार आहें, त्यावेळीं कैलासचंद्राच्या हृदयाच्या पिंजऱ्यांत एकदम शंभर तोफा डागल्याचा आवाज उठल्यागत शब्द झाला. त्यावर तो काय म्हणाला तें त्याचें त्यालाच ऐकूं आलें नाहीं—पण तें चंद्रनाथला ऐकूं आलें —अस्पष्ट रडण्याच्या आवाजासारख्या आवाजांत कुणीतरी म्हटलें, " यापेक्षां आणखी दुसरी कुठली आनंदाची बातमी आहे ? "

तें ऐकून शरयूला आनंद झाला नाहीं. तिच्या दोन्ही डोळयांतून आसवें पाझरत होतीं. नवऱ्याच्या पायावर डोकें टेंकून ती म्हणाली, " ही एवढी पायधूळ द्या---मला अभागिनीला इथंच ठेवून जा—तिकडे नेऊं नका."

चंद्रनाथ म्हणाला, " कां ? "

शरयूला उत्तर देववेना. ती रडूं लागली. म्हाताऱ्या कैलासचंद्राची केविलवाणी मुद्रा तिच्या डोळयासमोर सारखी नाचूं लागली.

कांहीं वेळ थांबून चंद्रनाथ म्हणाला, " मी तुझा नवरा, मी तुला घेऊन जायला निघालों, नि तूं नाहीं म्हटलंस तर कोण ऐकणार तुझं ? आतां विशूखेरीज रहाणं मला शक्य नाहीं. "

आतां बोलायला तोंडच राहिलें नव्हतें असें शरयूला वाटलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळपासून कैलासचंद्र विश्वेश्वरचा कबजा घेऊन बसला होता. बुद्धिबळांची पिशवी हातीं घेऊन तो मिश्राच्या घरीं आला. त्याला हांक मारून म्हणाला, " मिश्रजी, आज मोठा आनंदाचा दिवस आहे माझा ! विशूदादा आज आपल्या घरीं जाणार. आतां तो मोठा झालाय कीं नाहीं—माझ्या छोट्या घरांत आतां ठेवतां यायचं नाहीं त्याला. "

मिश्रजीनीं देखील आनंद प्रदर्शित केला.

बुद्धिबळांचा पट मांडून कैलासचंद्र बसला आणि म्हणाला, " आज आनंदाचा दिवस आहे. या दोन डाव टाकून जाऊं. "

खेळाच्या सुरवातीपासूनच कैलासचंद्राला एकामागून एक सारखी हार घ्यावी लागत होती. घोडा चालवायच्या ऐवजीं उंट, उंट चालवायच्या ऐवजीं घोडा, असा तो कांहीं तरी गोंधळ करीत होता. मिश्रजी म्हणाले, " बाबूजी, आज तुमची मिजाज ठीक नाहीं. फार गलती होतेय. "

एकामागून एक दोन डाव हरल्यावर कैलासचंद्र बुद्धिबळें गुंडाळून घेऊं लागला. पण लाल वजीर त्यानें आंत बांधला नाहीं. विशूच्या हातीं तो देऊन तो म्हणाला, " दादा, हा वजीर तुला दिला. आतां पुनः मागायचा नाहीं. "

रस्त्यांत जो भेटेल त्याला ती आनंदाची खबर म्हातारा सुनवीत होता.

आज प्रत्येक बाबतींत म्हाताऱ्याला मोठा उत्साह वाटत होता. पण काम करायच्या वेळीं मात्र त्याची पीछेहाट होत होती. बुद्धिबळ खेळतांना जशी भूलचूक होत होती तसेंच घरकामांतही होत होतें. दिवस जसजसा वर येऊं

लागला तसतशी भूलचूकही वाढत जाऊं लागली, तें पाहून शरयू आड राहून शेंकडों वेळ डोळे पुसूं लागली.

पण म्हाताऱ्याच्या मुद्रेवरचा उत्साह कांहीं ओसरत नव्हता. शरयूनें त्याला एका बाजूला बोलावून त्याच्या पायावर मस्तक ठेवलें. ती रडूं लागली. त्यावेळीं डोळ्यांत येणारीं आसवें आवरून तो हंसत आशीर्वाद देऊन म्हणाला, "माझे पोरी, रडूं नकोस. या तुझ्या म्हाताऱ्या आजोबाच्या आशीर्वादानं तूं राजाची राणी म्हणून मिरवशील ! पुनः केव्हां या बाजूला आलीस तर ही छोटी झोंपडी विसरून दुसऱ्या कुठं जाऊं नकोस."

शरयूला आणखी रडें कोमळलें. निराधार होऊन रस्त्यावरच्या भिकारणी-सारखी ती ज्या दिवशीं काशीला आली होती, त्या दिवशींची हकिकत आठवून तिला हुदक्यांवर हुंदके येऊं लागले. आणि आज !

शरयू म्हणाली, "आजोबा, मला टाकून कसे रहाणार तुम्हीं —"

कैलासचंद्र म्हणाला, "असे आणखी किती दिवस आहेत पोरी !"—पण मनांतल्या मनांत तो म्हणत होता, 'आतां बोलावणं आलंय. हा पोळलेला जीव इतक्या दिवसांनीं शांत होणार आहे !'

डोळे पुशीत पुशीत शरयू व्याकुळ होऊन म्हणाली, "मी अगदीं निर्दय झालेंय — "

म्हातारा एकदम म्हणाला, "पोरी, असं बोलूं नये. मी तुला चांगला ओळखतों."

रात्रीं दहा वाजायच्या सुमारास सारी मंडळी स्टेशनवर येऊन पोहोंचली. गाडी येण्याची वेळ जवळ येत चालली होती.

विश्वेश्वर झोंपी गेला होता खरा पण लाल वजीर त्यानें उराशीं कवटाळून धरला होता. म्हाताऱ्यानें त्याला हालवून जागें केलें. भर झोंपेंतून उठल्यामुळें पहिल्यानें त्यानें रडायला सुरवात केली. पण त्याच्या तोंडाजवळ तोंड नेऊन म्हाताऱ्यानें ज्यावेळीं म्हटलें, "विशू, दादा,—" तेव्हां तो एकदम हसूं लागला आणि म्हणाला, "दादू !"

"दादा. मेरा भय्या, कुठं निघालास ?"

विशू म्हणाला, "दातो." हातचा वजीर त्याला दाखवून म्हणाला, "वजील !"

कैलासचंद्र म्हणाला, " हो दादा, वजीर कुठं हरवूं नकोस. "

हस्तीदंताची बनवलेली आणि तांबड्या रंगानें माखलेली ही वस्तू त्यानें हरवूं नये म्हणून कैलासचंद्र यापूर्वी सुद्धां अनेक वार बजावीत आला होता. मान हालवून बिशूही म्हणाला. " हलवूं नको—वजील ! "

गाडी आल्यावर शरयूनें पुन: एकदां त्याला नमस्कार केला. ती गाडींत बसली. ओंठ थरथर कांपूं लागल्यामुळें म्हाताऱ्याचा आंतरिक आशीर्वाद त्याच्या ओंठाबाहेर पडला नाहीं. आतल्या आंतच राहिला.

गाडी सुटायला आतां अवधी राहिलेला नाहीं असें पाहून कैलासचंद्रानें विश्वेश्वरला चंद्रनाथच्या हातीं दिलें आणि म्हटलें, " दादू. "

" दादू. "

" वजीर. "

वजीर दाखवून तो हंसत म्हणाला, " दादू —वजील ! "

" हरवूं नकोस — "

" नाई. "

म्हाताऱ्याच्या कोरड्या डोळ्यांत आता एकदम पाणी आलें. गाडी चालू झाली तेव्हां शरयूच्या खिडकीकडे येऊन तो म्हणाला, "पोरी, आतां येतों–" पुन: एकदा जोर करून तो ओरडला, " दादू—"

गाडीच्या घडघडाटांत आणि लोकांच्या गजबजाटांत ती हांक विश्वेश्वरच्या कानीं गेली नाहीं. गाडीचा आवाज ऐकूं येईनासा होईपर्यंत तो तिथून एक पाऊल सुद्धां हलला नाहीं.

त्यानंतर हळुहळु तो परत फिरला.

# १९

चंद्रनाथला जी भीति वाटत होती, ती घरीं पोचतांच मणीशंकरकाकांनीं दूर केली. ते म्हणाले, " चंद्रनाथ, पाप घडलं तर प्रायश्चित करायचं. ज्यानं पापच केलं नाहीं त्याला प्रायश्चित कसलं द्यायचं ? सुनबाईच्या आईकडून पाप घडलंच नाहीं. म्हणून निष्कारण प्रायश्चिताची गोष्ट काढून तुम्हीं लोक तिचा उपमर्द करूं नका. "

मणीशंकरच्या तोंडचे हे उद्गार अगदीं अनपेक्षित होते. आश्चर्यचकित होऊन चंद्रनाथ नुसता पहात राहिला.

ते पुढें म्हणाले, "—हा असा म्हातारा झालोंय, आजवर पुष्कळ पाहिलंय, प्रत्येक कुटुंबांत कांहीं ना कांहीं चुका घडताहेत. माणसाच्या भल्या मोठ्या आयुष्यांत त्याला केवढी तरी मोठी पाऊलवाट चालायची असते. या मार्गांत कुठं चिखल असतो, तर कुठं घसरट असते, कुठं उंच सखल रस्ताही असतो, म्हणूनच माणसाचं पाऊल केव्हां केव्हां तेढं पडतं. जो तो स्वतःबद्दल बोलत नाहीं, केवळ दुसऱ्याला नांवं ठेवतो. दुसऱ्याचे दोष, दुसऱ्याच्या चुका, मोठ-मोठ्यानं ओरडून सांगतो, तो केवळ आपल्या दोषांवर पांघरूण घालण्यासाठीं. दुसऱ्याच्या गडबडींत स्वतःचे दोष झांकून पडायची त्याला आशा असते—" चंद्रनाथ मुकाट्यानें ऐकत होता. क्षणभर थांबून मणीशंकर पुनः बोलूं लागला, "—आणखी एक नवी गोष्ट शिकलोंय मी—असं शिकलोंय, कीं परक्याला जसा आपला करतां येतं तसाच दुरावतांही येतं. पण जो आपला आहे त्याला परका ठरवून कधीं दूर करतां येतं का ? आजवर मी आंधळा होतों. पण विशूनं मला नवी दृष्टी दिली. त्याच्या पुण्याईनं सारं कांहीं पवित्र झालं. आज द्वादशी. पूर्णिमेच्या दिवशीं साऱ्या गांवाला तुझ्या घरीं आमंत्रण दिलंय. दादा हयात होते त्यावेळीं हें सारं काम ते करीत होते. हें कधीं कांहीं करायची संधि मला मिळाली नव्हती. तेव्हां असं म्हणतोंय, विशूचं पुनः एकदा उद्यावण करावं."

चंद्रनाथ काळजींत पडला. तो म्हणाला, "पण लोक ?"

मणीशंकर हंसले आणि म्हणाले, "लोक मी—लोक तूं—या गांवांत कुणी नाहीं दुसरं. ज्याच्याकडे दौलत आहे तो या लोकांचा लोकनायक. मनांत आणलं तर मी तुला वाळींत टाकीन—तूं मनांत आणलंस तर मला वाळींत टाकतां येईल तुला. लोकांना भ्यायचं कांहीं कारण नाहीं. आणखी एक सांगतों, आजवर तुला सांगितलं नव्हतं—कदाचित् कधीं सांगितलंच नसतं—पण आतां वाटतंय, कीं तुला ही गोष्ट उघड करून सांगितली तर कांहीं बिघडायचं नाहीं. राखालदास भट्टाचार्यांची गोष्ट तुला माहीत आहे ?"

"हो. हरिदयाळ ठाकूरच्या पत्रांत होती त्याची हकिकत."

"आमच्या कुटुंबाची बदनामी करण्याचा पुरावा त्याच्या हातीं होता. पण आतां त्याला कांहीं करतां येणार नाहीं. मी त्याला तुरुंगांत डांबलं होतं. थोड्या दिवसांपूर्वी शिक्षा भोगून तो बाहेर आला पण लगेच कुठं चालता झाला. आता यापुढं तो इकडे फिरकायचासुद्धां नाहीं."

मणीशंकरनें झालेली सर्व हकिकत त्याला तपशिलवार सांगितली. ती ऐकली तेव्हां चंद्रनाथचे दोन्ही डोळे भरून आले.

पौर्णिमेच्या दिवशीं गांवजेवणाचा बेत मोठ्या थाटांत झाला. गांवांतला कुणी माणूस कांहींसुद्धां बोलला नाहीं. या उत्सवांत प्रत्यक्ष मणीशंकर भाग घेताहेत असें पाहून त्यांचा संशय दूर झाला. तो आरोप खोटा होता असें त्यांना वाटलें,—कदाचित् जमीदारीच्या व्यवहारांतली ही एक उलाढाल असावी असाच सर्वांचा समज झाला.

हरकाली वेगळें जेवण करून जेवली. आतां या गांवीं राहायचें नाहीं, आपल्या घरीं जायचें, असें त्यांनीं ठरवलें होतें. हरकाली म्हणाली, "जीव गेला तरी बेहत्तर पण मी धर्म कधीं सोडायची नाहीं."

गोष्ट आनंदाची असो कीं दुःखाची असो, त्यांना पन्नासच्या ऐवजीं दरमहा शंभर रुपये तनखा देण्याची चंद्रनाथनें यापुढें व्यवस्था करून टाकली.

उत्सवाच्या अखेरच्या रात्रीं नाचगाणें बंद झाल्यावर चंद्रनाथ आपल्या खोलींत येऊन पहातो, तों नखशिखांत अलंकार घालून शरयू झोपीं गेलेल्या मुलाला जवळ घेऊन नवऱ्याची वाट पहात राजराजेश्वरीसारखी जागत बसली होती.

आज पूर्णिमा.

चंद्रनाथ म्हणाला, "काय हें !"

शरयू हळूच हंसून म्हणाली, "काय करूं ! सई आज मुळीं ऐकेनाच !"

## २०

त्या रात्रीं एकेक पाऊल मोठ्या कष्टानें टाकीत म्हातारा कैलासचंद्र घरीं परत आला. तुळशी वृंदावनाजवळ अजून दिवा तेवत होता पण जिकडे

तिकडे हा भयाण अंधार कसा ! हा वेळपर्यंत सारीं इथं होतीं पण आतां कुणीच नव्हतें. तेवढी छोटी पणती अजूनही मिणमिणत होती. तिचें आयुष्य संपत आलें होतें. इतक्यांत ती विझून जाईल ! जातेवेळीं शरयूनें स्वतःच्या हातानें ती पणती पेटवली होती.

तो येऊन बिछान्यावर पडला. त्याच्या डोळ्यावर झांपड आली होती. पण घरीं आल्यापासून त्याच्या कानापाशीं कुणीतरी मधून मधून हांक मारल्याचा भास त्याला होत होता.

'दादू !' स्वप्नांत त्याच्या दिसलें. राजा भरत त्याच्या हृदयावर आरली मृत्युशय्या आंथरून क्षीणवाणीनें कांपत म्हणतो आहे, "ये. ये. मागं ये. परतून ये."

सकाळींच तो बिछान्यावरून उठला. नित्याच्या संवयीप्रमाणें बाहेर येऊन त्यानें हांक मारली, 'विशू !' तेव्हां कुठें त्याला आठवलं—विशू नाहीं—तीं सारीं निघून गेलीं होतीं !

बुद्धिबळांची पिशवी हातीं घेऊन तो शंभु मिश्रांच्या घरीं आला. त्यांना हांक मारून म्हणाला, "मिश्रजी, आमचा दादाभाई काल आपल्या गांवीं गेला."

दादाभाईवर सर्वांचेंच प्रेम होतें. मिश्रजीलाही वाईट वाटलें. बुद्धिबळाचा पट मांडला तेव्हां मिश्रजी म्हणाले, "बाबूजी, यांतला वजीर काय झाला !"

एक मोठा सुस्कारा टाकून कैलासचंद्र म्हणाला, "तेंच ना मिश्रजी, त्यानं नेला ना तो ! त्या लाल वजीरावर त्याचं मोठं प्रेम होतं. मुलाची जात—ऐकेच ना कांहीं केल्या."

प्राणापेक्षां प्रिय असलेला आपला मोहऱ्यांचा जोड आपण आपखुषीनें बिघडवला हें सांगायला त्याला लाज वाटली.

मिश्रजी म्हणाले, "तर मग दुसरीं मोहरीं मांडतों."

"मांडा."

खेळतांना कैलासचंद्र हरला. इतके दिवस शंभू मिश्र त्याच्याबरोबर खेळत होता पण त्याला हार घ्यायला लावायचें भाग्य त्यांना कधींच लाभलें नव्हतें. हरायचें कारण त्यांना आपोआप कळलें. ते म्हणाले, "बाबूजी, तुमचा सारा इलम बाळ आपल्यासाथ घेऊन गेला."

बाबूजीच्या चेहऱ्यावर कोरड्या हसण्याची रेषा उमटून गेली. तो म्हणाला, " या. आणखी एक डाव खेळूं "

" बहोत अच्छा. "

खेळत असतांना शह दिला त्यावेळीं कैलासचंद्र ओरडला " विशू ! "

शंभू मिश्र हंसत सुटले. त्याची चूक त्यांना कळली होती. ते म्हणाले," " बाबूजी, शह !—शह म्हणा, विशू नव्हे. "

दोघेही हसूं लागले.

शंभू मिश्र शह देऊन म्हणाले, " बाबूजी. यावेळीं तुमचीं दोन प्यादीं गेलीं."

कैलासचंद्र कावराबावरा होऊन म्हणाला, " दादा, ये ना लवकर. "

तो कांहीं वेळ त्याची वाट पहात बसला. ते चिमुकले गुलगुलित हात एकदम येऊन त्याच्या पाठीवर पडतील असें त्याला वाटलें होतें. त्याला वेळ लागतो आहे असें पाहून शंभु मिश्र म्हणाले, " आतां प्यादें बचावणें अशक्य आहे बाबूजी. "

म्हातारा भानावर आला आणि म्हणाला, " खरेंच कीं ! दोन मोहरीं मारलीं गेलीं की ! "

त्यानंतर खेळ संपला. मिश्रजी विजयी झाले पण त्यांना आनंद झाला नाहीं. मोहरीं बाजूला लोटून ते म्हणाले, " बाबुजी, पुनः उद्यां खेळायला या. आज आपली तबियत बहोत बेदुरुस्त आहे. मिजाज एकदम बिघडला आहे. "

घरीं परत जायला त्याला दुपार झाली. त्याला वाटत होतें, विशू नाहीं, मग जायची घाई कशाला ?

घरीं आला आणि पहातों तों सैंपाकघरांत लखीयाची आई एकटीच सैंपाकाची तयारी करीत होती. आज त्यांना स्वतःच चूल फुंकावी लागणार होती.—स्वतःच वाढून घ्यावें लागणार होतें—एकटेंच बसून जेवणें भाग होतें. वाटलें तर खावें, वाटलें तर खाऊं नये.—कुणाचा आग्रह नाहीं, कीं कुणाची पीडापीडही नाहीं. विश्वेश्वरच्या उपद्रवाची भीति नाहीं. अगदीं पूर्णपणें स्वतंत्र.

पण तें कांहीं त्याला बरें वाटलें नाहीं. सैंपाकघरांत येऊन पाहिलें, तर तिथें मुठभर तांदूळ, दोन बटाटे, दोन पटोल आणि थोडीशी डाळ होती.

त्याचे डोळे फाटून पाणी आलें. दोन वर्षांपूर्वीची गोष्ट आठवली. त्यावेळीं असेंच स्वत:साठीं स्वत: जेवण रांधावें लागत होतें. लखियाची आई अशीच तयारी करून देत होती. त्यावेळीं विशू आला नव्हता कीं गेलाही नव्हता.

फणसतळ्यावर त्याचें छोटेसें खेळातलें घर अजूनही उभें होतें. दोन फुटकीं मडकीं, एक हातपाय तुटलेली मातीची बाहुली, दोन पैशांचा एक फुटका अलगुज—अगदीं पोराप्रमाणेंच म्हाताऱ्या कैलासनें तीं सारीं गुंडाळून घेऊन आपल्या झोंपायच्या खोलींत आणून ठेवलीं.

दुपारीं गंगा पांडेच्या घरीं पट मांडून तो बसत होता. संध्याकाळीं मुकुंद घोषच्या बैठकखान्यांत लोक तसेच जमत होते. पण पट्टीचा खेळाडू म्हणून आतां कैलासचंद्राला कुणी मान देत नव्हता. त्यावेळीं तो दिग्विजयी होता. आतां खेळायचें म्हणून खेळत होता. ज्यांना हाताशीं धरून त्यानें खेळायला शिकवलें होतें तेच आतां त्याच्यावर मात करीत होते. एका मोहऱ्यालाही हात लावूं न देता ज्याच्याबरोबर तो यापूर्वी खेळत होता, ते आज छाती पुढें काढून पहिल्या फटक्याला त्याचा उंट मारून खेळ सुरू करूं लागले होते.

पूर्वीप्रमाणेंच त्याला खेळायचा नाद होता—पण आता ताकद नव्हती. पूर्वीच्या सारखे डावाला प्रतिडाव टाकायची केव्हा केव्हां त्याला आठवण होई पण सरळ खेळताना तो आतां केवढ्या तरी मोठया चुका करी. बुद्धिबळें खेळायचा यापूर्वी त्याला मोठा अभिमान होता —आतां नुसती शरम वाटत होती.

तरीसुद्धां शंभू मिश्र अजून त्याला मानानें वागावी. त्याच्याशीं खेळतांना तेढीला येत नसे. जरूर पडली तर त्याला सुचवायलासुद्धां कमी करीत नसे.

आजकाल त्याच्या घरीं भयंकर घोटाळा माजला होता. लखियाची आई जेव्हांतेव्हां रागाला येऊं लागली होती. एकदोन वेळ डोळे पुशीत असतांना सुद्धां कुणाकुणाला तो दिसून आला होता. ती म्हणे, “ बाबू , खाणंपिणं अगदीं टाकलंतच का अलीकडे ! एकदां आरशांत चेहरा तरी पाहून घ्या ! ”

कैलासचंद्र हंसे आणि म्हणे, “ बेटी, रांधावाढायला विसरून गेलीं आहें मी. चुलीकडे जाणं कठीण जातंय मला. ”

ती जुनीपुराणी नोकर होती. जा म्हटलें तरी जात नव्हती. आरडाओरडा करून कसाबसा मूठभर तांदळाचा भात त्याच्याकडून करून घेई.

अशा प्रकारें एक महिना गेला.

तीनचार दिवस कैलासकाका कुणाच्या दृष्टीस पडला नव्हता. ही गोष्ट पहिल्यानें शंभू मित्राच्या लक्षांत आली. तो चौकशीसाठीं आला. त्यानें हांक मारली "बाबूजी !"

लखियाच्या आईनें त्यांच्या हांकेला उत्तर दिलें. ती म्हणाली, "बाबूजींना बुखार आला आहे."

खोलींत येऊन मिश्रजी त्याच्या बिछान्याजवळ बसले आणि म्हणाले, "बुखार आला आहे का बाबूजी ?"

कैलास हंसून म्हणाला, "हो मिश्रजी. बोलावणं आलं आहे---तेव्हां इळुहळू जायला निघालों आहें."

मिश्रजी म्हणाले, "छे, छे ! राम राम ! आराम हो जायगा."

"आतां आराम व्हायचं वय राहिलं नाहीं ठाकूर. आतां रवाना होणार आम्हीं !"

"कविराजाला ( वैद्याला ) बोलावलं होतं ?"

कैलासचंद्र पुन: हंसला आणि म्हणाला, "अठ्ठावन्नाव्या वर्षी कविराज येऊन काय करणार आहे मिश्रजी ?"

"अठ्ठावन्नाव्या वर्षी ? बाबूजी, आणखी अठ्ठावन वर्षे जगतात ना माणसं ?"

त्या प्रश्नाचें उत्तर न देतां कैलासचंद्र म्हणाला, "असं पहा मिश्रजी, आमच्या दादाभाईनं पत्र लिहिलंय—अग ये लखियाची आई, ती खिडकी उघड पाहूं. मिश्रजींना पत्र वाचून दाखवतों."

उशीखालचें एक पत्र काढून त्यानें मोठ्या कष्टानें तें साद्यंत वाचून दाखवलें. हिंदुस्थानी शंभु मिश्राला त्यांतला कांहीं भाग कळला, तर कांहीं कळला नाहीं.

रात्रीं शंभू मिश्रांनीं वैद्याला बोलावून आणलें. कविराज बंगाली होते. कैलासचंद्राची आणि त्याची ओळख होती. त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचीं उत्तरें दिल्यावर म्हातारा म्हणाला, "कविराजमहाशय, दादाभाईनं पत्र लिहिलंय. वाचून दाखवतों. ऐका हं."

कविराज महाशय दादाभाईला ओळखत नव्हते. त्यांनीं विचारलें, "कुणाचं पत्र ?"

"दादूचं—विशूचं! अग ए लखियाची आई. दिवा जरा इकडे घे पाहूं—"

त्यानें सारें पत्र त्याला वाचून दाखवलें. कविराजला तें कळलें कीं नाहीं याची कैलासचंद्राला पर्वा नव्हती. विशूचें पत्र—शरयूनें लिहिलेलें—यांतच म्हाताऱ्याला समाधान वाटत होतें. तेंच त्याचें सुखाचें साधन!

औषध देऊन कविराजमहाशय निघून गेले. शंभू मिश्राला जवळ बोलावून कैलासकाका विश्वेश्वराच्या रूपाचें, गुणाचें, बुद्धीचें वर्णन करूं लागला.

दोन आठवडे गेले तरी त्याचा ताप हटला नाहीं. शेजारच्या एका मुलाला बोलावून म्हाताऱ्यानें त्याच्याकडून विशूला पत्र लिहून घेतलें. सारांश एवढाच, कीं आपण खुशाल आहें,—तरीपण सध्यां प्रकृति तितकीशी बरी नाहीं,—तरीही काळजी करण्याचें कारण नाहीं.

कैलासकाका आतां अगदीं थकत चालला आहे असें कळल्यामुळें हरिदयाळ त्याला पहायला आला. चारदोन शब्द बोलला न बोलला तोंच कैलासनें उशीखालचें पत्र काढून त्याच्या हातीं दिलें आणि म्हटलें, "बाबाजी, वाच."

पत्र अगदीं मळून गेलें होतें. एक दोन ठिकाणीं फाटलेलें असल्यामुळें चांगलेंसें वाचतां येत नव्हतें. जेवढें वाचतां आलें तेवढें हरिदयाळनीं वाचून दाखवलें. ते म्हणाले, "शरयूनं लिहिलंय वाटतं?"

"लिहिलंय तिनं. पण पत्र आहे माझ्या दादाचं."

"खालीं त्याची सही आहे खरी."

त्याचे उद्गार म्हाताऱ्याला आवडले नाहींत. तो म्हणाला, "नांव त्याचं—पत्र त्याचं—शरयूनं नुसतं ल्याहायचं काम केलं. आतां तो ल्याहायला शिकला, कीं स्वतःच पत्र लिहील मला."

हरिदयाळनीं मान तुकावली. मोठ्या खुषींत येऊन कैलासचंद्र बोलूं लागला, "वाचलत ना बाबाजी? केव्हांही रात्रीं आमचा विशू 'दादू दादू' म्हणत रडत ओरडत उठायचा—तो काय असा विसरतोय मला?" त्याचवेळीं त्याच्या गालावरून ओघळलेलीं दोन आसवें उशीवर पडलीं.

लखियाची आई जवळच होती. दयाळठाकूरनां खूण करून बाहेर बोलावून ती म्हणाली, "तुम्हीं आतां जा ठाकूर. तुम्ही बसलांत कीं सारा दिवस त्यांच्या याच गोष्टी सुरू होतील."

आणखी चारपांच दिवस गेले. आतां तो अगदींच थकत आला होता. आजकाल शंभू मिश्र रात्रंदिवस त्याच्या बिछान्याजवळ बसलेला असे. मधून मधून कविराज येऊन प्रकृति पाहून जात.

आज साग दिवस तो शुद्धीवर नव्हता ! संध्याकाळीं तो थोडासा भानावर आला. त्यानंतर केव्हां शुद्धींत तर केव्हां बेहोष होऊन तो पडून राहिला होता.

मध्यान्ह रात्रीं तो बोलूं लागला, "विशू दादा, माझा वजीर दे आतां. नाहीं तर मात होईल माझ्यावर !"

शंभू मिश्र जवळ येऊन म्हणाला, "काय म्हणतां बाबूजी ?"

कैलासचंद्रानें एकदां त्याच्याकडे पाहिलें. घाबऱ्याघुबऱ्या त्यानें उशीच्या खालीं हात घातला. तिथलें कांहीं तरी हरवलें, हवें तेव्हां हाताशीं मिळत नाहीं—असें त्याला वाटलें असावें. त्यानंतर हताशपणें तो कुशीवर वळला आणि पुटपुटूं लागला, "विशू, विश्वेश्वर, माझा वजीर दे भय्या ! वजीर टाकून कसं खेळूं—सांग ना ?"

या जगाच्या बुद्धिबळांच्या खेळांत कैलासचंद्राचा वजीर हरवला होता. विश्वपतीकडे काकुळतवाणीनं तो वजीर मागत होता.

शंभू मिश्र जवळ येऊन उभा राहिला—लखियाच्या आईनं दिवा आणून समोर धरला. म्हाताऱ्याचे डोळे वर गेले होते—नुसते ओंठ थरथर कांपत होते. त्या ओठांवाटे थरथरत शब्द बाहेर पडत होते, "विश्वेश्वर ! वजीरावांचून कसा रे खेळूं ? दे भाई, दे—माझा वजीर दे !"

दुसऱ्या दिवशीं दयाळ ठाकूरनीं चंद्रनाथला पत्र लिहिलें—काल रात्रीं कैलासचंद्र कैलासवासी झाला.



# दर्पचूर्ण

## १

संध्याकाळ झाल्यावर इंदुमति जरा विशेष थाटमाट करून नवऱ्याच्या खोलींत येऊन म्हणाली, " काय चाललंय ? "

नरेंद्र एक बंगाली मासिक पुस्तक वाचीत होता. नजर वर करून त्यानें एक शब्दसुद्धां न बोलतां तिच्या तोंडाकडे पाहिलें आणि हातचें पुस्तक तिच्या हातीं दिलें.

उघडलेल्या पानावर नजर फिरवून कपाळाला आठ्या घालून इंदू आश्चर्याच्या स्वरानें म्हणाली, " इश्श ! ही कविता आहे वाटतं ? छान ! छान ! बैठेसे बेगार भली. कुठलं मासिक हें पाहूं ? 'सरस्वती !' 'स्वप्रकाश'नं छापली नाहीं वाटतं ? "

तें मनाला लागल्यामुळें नरेंद्रची शांत दृष्टि म्लान झाल्यासारखी दिसली.

इंदूनें पुनः प्रश्न केला, " 'स्वप्रकाश'नं परत केली वाटतं ? "

" पाठवली नव्हतीच त्याच्याकडे. "

" पाठवून एकदां कां पाहिलं नाहीं ? 'स्वप्रकाश' म्हणजे कांहीं 'सरस्वती' नव्हे. त्यांना थोडी पारख आहे. तेवढ्यासाठींच तर मी वाटेल तें मासिक कधीं वाचीत नाहीं. " थोडेसें हंसून इंदू म्हणाली, "—बर बरं ! स्वतःचं लेखन स्वतःच इतकं मन लावून वाचीत होतां वाटतं ? छान छान ! आज शनिवार आहे—मी त्या घरच्या माझ्या मैत्रिणीबरोबर सिनेमाला जाणार आहें. कमला झोंपी गेली आहे. कवितेच्या धुंदींत मुलीकडे पहायला विसरूं नका. मी चाललें. "

मासिक पुस्तक बंद करून नरेंद्रनें तें टेबलावर टेवलें आणि म्हटलें, " जा. "

इंदू जायला लागली होती. तितक्यांत एक मोठा सुस्कारा कानीं आल्यामुळें ती फिरून उभी राहिली आणि म्हणाली, " वा: ! मी कांहीं तरी करायचं मनांत आणलं कीं तुम्ही असे हे सुस्कारे कां सोडता तें सांगाल का ? एवढं जर तुमचं काळिज पोळतं तर तोंड उघडून बोला ना—बाबांना पत्र पाठवतें अन् काय करायचं तें पहातें. "

क्षणभर इंदुकडे पहात नरेंद्र स्वस्थ राहिला होता. तो कांहींतरी बोलेल असें वाटत होतें. पण तो कांहीं बोलला नाहीं—मुकाट्यानें त्यानें मान खालीं घातली.

नरेंद्रची मामेबहीण विमला ही इंदूची मैत्रीण होती. पलीकडल्या रस्त्याच्या वळणावरच तिचें घर होतें. तिच्या दारांत गाडी थांबवून इंदू घरांत आली आणि पहातांच आश्चर्यचकित झाली. रागारागानें ती म्हणाली, " हें काय वन्सं ! कपडे बदलले नाहींत वाटतं ? निरोप नाहीं का मिळाला ? "

विमला हंसत म्हणाली, " मिळाला. तरी पण मला थोडा वेळ होईल बाई. आतांच हे बाहेर फिरायला गेले आहेत. ते आल्याशिवाय मला येतां यायचं नाहीं. "

इंदू मनांतल्या मनांत संतापली. तिनें खोंचून प्रश्न केला, " प्रभूंचा हुकूम मिळाला नाहीं वाटतं ? "

विमलेचा सुंदर चेहरा गोडशा हंसण्यानें अधिकच गोड दिसूं लागला. तिची ही खोंच तिनें खिलाडू वृत्तीनें ऐकून घेतली. ती म्हणाली, " नाहीं. दासीची अर्जी अजून पेश केली नाहीं. पेश केली असती तर नामंजूर झाली नसती अशी दासीला खात्री आहे. "

इंदू अधिकच संतापली. तिनें विचारलें, " मग कां पेश केली नाहींस ? मी वेळींच तुला सांगून ठेवलं होतं ! "

" तेव्हां धीर झाला नाहीं वहिनी. आफिसांतून आल्याबरोबर ते म्हणाले, कीं डोकं दुखतंय. म्हटलं थोडा फराळ करून थंडी चक्कर मारून येऊं देत. मन जरा प्रसन्न झालं कीं सांगेन. अजून जायला वेळ आहे. जरा थांब ना. त्यांना येऊं दे ना परत. "

" वसं तुला हसूं येतं वन्सं, तेंच मला कळत नाहीं. मी असतें तर शरमून मरून गेलें असतें. घरीं बाईला किंवा शिपायाला सांगून गेलं तर नाहीं का चालायचं ? "

विमला घाबरून म्हणाली, " बाप रे ! एकदम घरांतून घालवून देतील कीं ! पुनः या जन्मीं तोंड पहायचे नाहींत."

इंदू चकित झाली. संतापानें तिला बोलायलाही सुचेना. ती म्हणाली, " घालवून देतील ? कोणत्या कायद्याच्या आधारें ? कोणत्या अधिकाराच्या जोरावर—सांग ना ? "

विमलेनें अगदीं संथपणें उत्तर दिलें, " त्यांत कसली अडचण वहिनी ! ते मालक—मी नुसती पायाची दासी. त्यांनीं घालवलं तर कोण त्यांना नको म्हणणार ? "

" नको म्हणणार सरकार ! नको म्हणणार कायदा ! तें गेलं चुलींत – पण असं पहा वन्सं, स्वतःच्या तोंडानं स्वतः दासी म्हणून कबूल करायला तुला एवढीसुद्धां लाज वाटत नाहीं ? नवरा म्हणजे काय मोगल बादशहा ? आणि बायको म्हणजे काय त्याची विकत घेतलेली बांदी ? स्वतःला असा कमीपणा घेणं—असं तुच्छ लेखणं—हें गौरवाचं लक्षण का ? "

तिला राग आलेला पाहून विमलेला मोठी गम्मत वाटली. ती म्हणाली, "तुम्ही वन्सं आहे आपली खुळीभोळी बायको माणूस—बरं का वहिनी, म्हणून तिला नवऱ्याची दासी म्हणून घ्यायला अभिमान वाटतो. बरं, मी असं विचारतें वहिनी, तूं जी एवढी बोलते आहेस ती दादाची परवानगी घेऊन का घरांतून बाहेर निघाली आहेस ? "

" परवानगी ? कां ? कशासाठीं ? ते बाहेर जातात तेव्हां माझ्या परवानगीची वाट पहातात का ? ' मी चाललें ' एवढंच त्यांना सांगितलं आणि निघून आलें. " एक क्षणभर उगीच राहून ती एकदम उसळून म्हणाली, " तरीपण माझ्या नवऱ्यासारखा गुणी नवरा फारच थोड्या बायकांच्या भाग्यानं लाभला असेल, असं मी अगदीं स्वच्छ म्हणेन. ते कधींसुद्धां मला विरोध करीत नाहींत. पण त्यांनीं असं केलं नसतं, सदान्‌कदा अडवलं असतं, तरीही तुला सांगतें वन्सं, मी माझा स्वाभिमान सोळा आणे टिकवून धरला असता. मी संगिनी आहें, सहधर्मिणी आहें. त्यांची बांदी नव्हे. तुझ्यासारखे

उद्गार मी कधींच काढले नसते. माहीत आहे वन्सं, अशाच रीतीनं आमच्या देशांतल्या साऱ्या बायका, पुरुषाच्या पायतळीं डोकें देऊन अशा तुच्छ, अशा खेळांतल्या बाहुल्या होऊन बसल्या आहेत. स्वतःचा मान जर स्वतः राखला नाहीं तर नुसता मागून तो कुणी देईल का वन्सं? सांग ना? माझा नवरा इतका चांगला आहे---पण तो प्रभु अन् मी त्याची बायको म्हणजे त्याची बांदी, असं वाटूं द्यायला मी कधींसुद्धां जागा देत नाहीं. माझ्या या स्त्रीदेहांतसुद्धां भगवान वास करतोय, ही गोष्ट मी स्वतः विसरत नाहीं कीं त्यालाही विसरूं देत नाहीं."

विमला मुकाट्यानें ऐकत होती तिचें भाषण संपल्यावर तिनें एक सुस्कारा सोडला. पण त्यांत पश्चात्तापाचा अंश नव्हता. ती म्हणाली, "स्वाभिमान राखणं म्हणजे काय तें मला कांहीं माहित नाहीं वहिनी---स्वाभिमान म्हणजे त्याच्यापायीं आत्मार्पण वाटतं!---हे पहा ते आले. जरा थांब, मी आतांच त्यांची परवानगी घेऊन येतें." असें म्हणून गालांतल्या गालांत हंसत ती घाईघाईनें निघून गेली.

इंदूनें तें पाहिलें. तिच्या सर्वांगाचा भडका उडाला.

सिनेमाहून परत येतांना वाटेंत इंदू एकाएकीं म्हणाली, "वन्सं, परवानगी मिळाली नसती तर तूं आली नसतीस का?"

रस्त्याकडे पहात विमला दुसऱ्याच कांहींतरी गोष्टीचा विचार करीत असावी ती दचकून म्हणाली, "नाहीं!"

"तर मग मला वाटतं वन्सं, जेव्हां जेव्हां मी येतें आणि तुला ओढून घेऊन जातें, तेव्हां तेव्हां तुझा नवरा तुझ्यावर रागावत असेल?"

तोंड फिरवून विमला म्हणाली, "मग मी स्वतःच कशी आलें असतें वहिनी? उलट मलाच वाटतं, कीं तूं ही अशी येतेस म्हणून कदाचित् दादाचाच माझ्यावर राग होत असेल."

इंदू दिमाखानें म्हणाली, "तुझ्या दादाचा तसा स्वभावच नाहीं मुळीं. आधीं ते कधीं आपल्या अधिकाराच्या मर्यादेपलीकडे जात नाहींत---शिवाय मला पक्कं माहीत आहे, कीं माझ्यावर राग करण्याइतकी स्पर्धा त्यांच्या स्वप्नांतही यायची नाहीं."

विमलेनें एक मोठा सुस्कारा सोडला. मिनिटभर थांबून ती हळूच म्हणाली, " वहिनी, दादाचं तुझ्यावरचं प्रेम केवढं मोठं आहे! पण तूं मात्र—"

आतां कुठें इंदूच्या तोंडावर हंसण्याची रेषा उमटली. ती म्हणाली, " मी कांहीं त्यांच्या शब्दाबाहेर जात नाहीं—पण माझ्याबद्दल तुला हा असा संशय आला कशामुळं ? "

" काय सांगूं वहिनी ? पण मला असं वाटतं, कीं तूं—"

" तुला असं कां वाटतं वन्सं, माहीत आहे ? माझं प्रेम तुझ्यासारखं असं पायावर लोटांगणं घेणारं नाहीं म्हणून ! ईश्वर करो आणि माझं प्रेम स्त्रीजातीची मर्यादा ओलांडून उलटून माझ्या माथीं न बसो. माझ्या स्वातंत्र्यावर अतिक्रमण करणारं प्रेम मला नको आहे. तसल्या प्रेमाची मला चीड आहे. "

विमला आंतल्या आंत शहारली.

क्षणभर थांबून इंदू म्हणाली, " बोलतशी नाहींस वन्सं ? कसला विचार करतेयस ? "

" कांहीं नाहीं. दादाचं प्रेम असंच चिरकाल राहो अशी प्रार्थना करतेंय मी. कांहीं जरी म्हटलंस तरी नवऱ्याच्या प्रेमापेक्षां या तीन त्रिभुवनांत बायकांच्या जातीला दुसरं मोठं कांहीं नाहीं—" क्षणभर थांबून विमला पुनः म्हणाली, " तुझी स्त्रीजातीची मर्यादा म्हणजे काय आणि तुझी स्वातंत्र्याची कल्पना तरी काय—कोण जाणे ! मी माझं सर्वस्व त्यांच्या पायीं विसंबून स्वस्थ राहिलें आहें. खरं सांगतें वहिनी, माझी अशी दशा झाली आहे, कीं स्वतःचं म्हणायला माझं असं कांहीं राहिलेलंच नाहीं. त्यांची इच्छा म्हणजे—"

" छे छे ! गप्प बैस ! गप्प बैस !— "

विमला दचकून उगीच राहिली. इंदु चिडून म्हणाली, " आमच्या देशांतल्या स्त्रिया म्हणजे काय मातीच्या बाहुल्या आहेत ? जिव नाहीं—आत्मा नाहीं—कांहींच नाहीं ?—बरं—मी असं विचारतें, असं करून तुला मिळालंय काय ? माझ्यापेक्षां प्रेमाचा जास्त वांटा का तुला मिळालाय ? वन्सं, प्रेमाचं मोजमाप करायचं यंत्र नाहीं, नाहींतर तुला पटवून दिलं असतं—जाऊं दे तें ! पण मी असं कां म्हणतें माहित आहे ? तुझ्यासारखी मी कंगाल वृत्ति माथीं घेऊन बसलेली नाहीं. मला मोठं वाईट वाटतं वन्सं, ते एवढे शांत कां ! एवढे सहनशील कां ? कधींसुद्धां एक तेढा बोल बोलत नाहींत. तसे बोलले

असते तर त्यांना पटवून दिलं असतं, कीं जिला तुम्ही हिशेबांत घेत नाहीं ती व्यक्तिही माणुसच आहे—तिलासुद्धां गैरहिशेबी वागतां येतं.—स्वाभिमान सोडून प्रेम नको असतं तिला!—हें आणखी काय? तोंड फिरवून हंसतेयसशी?"

विमलेनें कसेंबसें आपलें हंसें दाबून म्हटलें, "काय? कुठं काय! कांहीं नाहीं."

"नाहीं कां? आत्तांच तुझ्या तोंडावर हसूं आलेलं स्पष्ट दिसत होतं मला."

आतां उघडपणें हंसून विमला म्हणाली, "तुझं भाषण ऐकून मला हंसायला येत होतं. अग वहिनी, एवढं लाभलंय म्हणूनच तूं एवढी बडबडतेयस!"

संतापून इंदूनें विचारलें, "अन् लाभलं नसतं तर?"

"असं बोलली नसतीस!"

"खोटं—साफ खोटं! वन्सं, सारींच कांहीं तुझ्यासारखीं नाहींत—सारींच कांहीं भीक मागत हिंडत नाहींत. आत्मगौरवाची कल्पना असलेल्या बायकासुद्धां या जगांत आहेत."

आतां मात्र विमलेच्या चेहऱ्यावरचें हसूं हळुहळु वितळत गेलें. ती म्हणाली, "तें मला माहित आहे."

"माहित असतं तर अशी बोलली नसतीस. कसंही असो, पण यापुढं ध्यानांत ठेव,—भीक मागत नाहींत, स्वतःच्या सामर्थ्यानं हवं तें मिळवतात, अशीहीं माणसं या जगांत आहेत."

विमला खिन्नपणें म्हणाली, "बरं बरं!—हें पहा आपलं घर आलं. येतेस का जरा?"

"नाहीं. मीही जातें घरीं. गाडीवाला, या गल्लीच्या तोंडावर—"

"दादाला माझा प्रणाम सांग वहिनी—"

"सांगेन. ए गाडीवाला चलो—"

## २

"आतां पुरे झालं—संसारखर्चासाठीं तरी कांहीं पैसा द्यायला हवा ना!"

बायकोच्या या मागणीचें नरेंद्रला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "इतक्यांत दोनशें रुपये संपले?"

" नाहीं संपले तर काय खोटं बोलतेंय ! कीं लपवून ठेवतेंय ? "

नरेंद्रच्या चेहऱ्यावर एकदम घाबरल्याची छाया दिसूं लागली. कुठें आहेत पैसे ? कसे मिळवायचे ?

त्याच्या मुद्रेवरची छाया इंदूनें पाहिली खरी पण ती भलत्या नजरेनें पाहिली. ती म्हणाली, " खरं वाटत नसेल तर यापुढं एक खातेवही द्या, मी हिशेब लिहून ठेवीन. किंवा असं करा ना—खर्चाचे पैसे तुमच्याकडेसच ठेवा. मग मलाही भीति नको अन् तुमच्या संशयाखालीं मला लाजेनं मरायलाही नको. "

तीव्र दृष्टीनें तिनें त्याच्याकडे पाहिलें त्यावेळीं त्याच्या मुद्रेवरची भेसूर छाया अधिक भेसूर झाली. नरेंद्र संथपणें म्हणाला, " खोटं म्हणत नाहीं—पण—"

" पण काय ? खरं वाटत नाहीं ? हेंच ना ? ठीक आहे. आतांच जातें नि आठवेल तेवढा हिशेब लिहून आणतें. अं: ! काय सुखाचा घरसंसार चाललाय हा आमचा ! " असें म्हणून रागारागानें ती खोलीबाहेर पडली.

पण लगेच मागें फिरून येऊन ती म्हणाली, " तसं काय म्हणून ? काय म्हणून मी हिशेब लिहून देऊं ? मी काय खोटं बोलतेंय ? माझ्या मामेबहिणीच्या लग्नासाठीं कपडे केले, त्याला लागले रुपये पन्नासांवर. कमलेच्या कपड्यांचे झाले बारा रुपये. त्या दिवशीं सिनेमाला गेलों त्यावेळीं दहा बारा लागले. पहा ना हिशेब करून किती झाले ते ? त्यानंतर हा आज दहा पंधरा दिवसांचा घरखर्च झाला तो का एवढा मोठा झाला ? कां कपाळशूळ उठला तुमचा ? आमच्या दादाच्या संसाराला महिना सातआठशें सुद्धां पुरत नाहींत. खरं सांगतें, असं केलंत तर इथं कांहीं माझा निभाव लागायचा नाहीं. त्यापेक्षां अगदीं उघडच सांगा ना—दादाची बदली झालीय आतां मेदिनीपूरला—मी मुलीला घेऊन जातें तिकडे—तुम्हींही सुटाल, मीही सुटेन. "

कितीतरी वेळ नरेंद्र मान खालीं घालून बसला होता. तशीच मान वर करून तो म्हणाला, " यावेळीं कांहीं शक्य दिसत नाहीं. थोड्या दिवसांत काय जमतं तें पहातों. "

" म्हणजे ? नाहीं जमलं तर उपास का करायचे ? हें पहा, मी उद्यां आपली मेदिनीपूरलाच जातें. अन् तुम्हींही एक काम करा. हा दलालीचा

धंदा सोडून द्या अन् दादाच्या वशिल्यानं कुठं तरी एक नोकरी पत्करा, म्हणजे तेवढा तरी पुढं निश्चितपणा येईल. जें आपल्याला जमत नाहीं त्याला हात घालून स्वतः फसूं नका अन् माझंही नुकसान करूं नका."

नरेंद्रनें उत्तर दिलें नाहीं. इंदू आणखी कांहींतरी बोलणार होती पण तितक्यांत गड्यानें शंभूबाबू आल्याचें सांगितलें आणि त्या मागोमागच बाहेरून बुटाचा आवाज ऐकूं आला. जवळच्या दरवाजानें आंत जाऊन इंदू पडद्याआड उभी राहिली."

शंभूबाबू एक 'महाजन' होते. मरायच्यापूर्वी नरेंद्रच्या बापानें बरेंचसें कर्ज करून ठेवलें होतें, त्या देण्याबद्दल मुलाजवळ तगादा करण्यासाठीं शंभूबाबू वारंवार येत असत. आजही ते तसेच आले होते. त्यांची वाणी भलतीकडे गोड होती. आल्याबरोबर त्यांनीं अशा कांहीं रीतीनें बोलायला सुरवात केली, कीं त्यांचें भाषण पुनः ऐकायच्यापूर्वीच स्वतःचें डोकें कापून विकून त्यांची भरपाई करावी पण हटूं नये — असें ऐकणाराला वाटावें.

शंभूबाबू निघून गेल्यावर इंदू पुनः समोर येऊन उभी राहिली आणि म्हणाली, "कोण हे ?"

"शंभूबाबू."

"बरं मग ?"

"वसुलीसाठीं आले होते."

"तें कळलं मला. पण हें कर्ज केलंत कशाला ?"

या प्रश्नाचें उत्तर देतांना नरेंद्रनें जरा तेढी वाट काढली. तो म्हणाला, "बाबा अचानक वारले—त्यामुळं—"

अतिशय संतापून इंदू म्हणाली, "तुमचे बाबा काय पृथ्वीच्या पाठीवरच्या प्रत्येक माणसाचं ऋण काढून ठेवून गेले ? कोण फेडणार हें ? तुम्हीं कसे फेडणार ? सांगा ना ?"

एवढ्या प्रश्नांचें उत्तर एका दमांत देणें शक्य नव्हतें. इंदूनेंही स्वतः तशी अपेक्षा केली नव्हती. उत्तर यायच्यापूर्वींच ती म्हणाली, "—बरं, तुमचे बाबा एकाएकीं वारले पण तुम्हीं तर एकाएकीं लग्न केलं नाहीं ? ही सारी भानगड माझ्या बाबांना तुम्हीं कळवायला हवी होती. माझ्याकडून लपवून ठेवलीत हें तरी बरं केलं का ? लोक म्हणतात, तुम्हीं मोठे धर्मभीरू आहांत !—मी

म्हणनें, हेंच का तें तुमचं धर्मशास्त्र ? असंच लिहिलंय का तुमच्या धर्मशास्त्रांत ?" असें म्हणून युद्धघोषणा करण्याच्या आवेशानें तिनें नवऱ्याच्या तोंडाकडे पाहिलें; पण ज्या माणसावर तीक्ष्ण बाणांचा एवढा हा वर्षाव निष्ठुरपणें करण्यांत आला होता, त्या माणसाला देवानें अगदीं निरस्त्र, अगदीं असहाय करून या जगांत सोडून दिलेलें होतें. कुणावरही उलटून आघात करणें त्याच्यालेखीं शक्यच नव्हतें —शक्य होतें सहन करणें ! आघाताचे सारे फटके त्याच्यावर बसले कीं ते वितळून जात आणि अगदीं थोडक्याच वेळांत तो स्तब्ध होऊन जाई.

पण आज तो थोडका वेळसुद्धां त्याला मिळाला नाहीं. शंभूबाबूची कठोर भाषा ऐकून झालेला त्रास क्षणभर ओसरतो न ओसरतो तोंच इंदूनेंही त्याच्यावर एवढा मोठा भडिमार करायला सुरवात केली, कीं त्या असह्य माऱ्यामुळें बेभान होऊन उत्तरादाखल चार कठोर शब्द बोलावे असेंही त्याला वाटलें. पण शेवटीं तें कांहीं त्याला साधलें नाहीं. स्वाभाविक अक्षमतेचें निष्फळ अवडंबर माथीं घेऊन तो चेंगरून कोसळून पडला. मरतुकड्या आवाजांत तो म्हणाला, " बाबांच्या बाबतींत तूं असं बोलावं हें योग्य का ? "

" नाहीं—योग्य नव्हे. पण माझ्या बाबतींत योग्य काय आणि अयोग्य काय याची मीमांसा करायला कांहीं मी तुम्हांला सांगितलं नव्हतं. या साऱ्या भानगडी तुम्हीं माझ्या बाबांना उघड करून कां सांगितल्या नाहींत ? "

" मी काहींच लपवलं नव्हतं इंदू . शिवाय तुझे बाबा आणि माझे बाबा बालमित्र -- त्यांना सारं कांहीं माहीत होत. "

" तर मग असंच तुमचं म्हणणं, कीं कळून सवरून माझ्या बाबांनीं मला असं विहिरींत लोटलं ? "

त्याला तें असह्य झालें. तो आश्चर्यचकित झाला. स्तंभित होऊन त्यानें मान खालीं घातली. बायको खरीच रागावली होती, कीं तें नुसतें प्रेमकलहाचें ढोंग होतें हेंच त्याला उमजेना.

मूळ काय झालें तें इथं सांगणें अवश्य आहे. पुष्कळ वर्षेंपर्यंत हीं दोन कुटुंबें शेजारींशेजारीं रहात होतीं. या दोघांचें लग्न एकप्रकारें ठरून गेलें होतें. पण एकाएकीं इंदूच्या बापाचें मन बदललें. कांहीं वर्षें लग्न करायचें थांबवून मुलीला पुढला अभ्यास करण्यासाठीं अविवाहित ठेवावें असें तिच्या बापानें

ठरवल्यामुळें जमलेली सोयरीक तेवढ्यापुरती मोडली. इंदू अठरा वर्षांची झाल्यानंतर ज्यावेळीं तिच्या लग्नाची गोष्ट निघाली त्यावेळीं कलकत्त्याला आल्यावर तिच्या बापाला कळून आलें, कीं नरेंद्रचा बाप कैलासवासी झाला होता. त्यावेळीं नरेंद्रची सांपत्तिक स्थिति कोणत्या प्रकारची आहे याजबद्दल इंदूच्या आईबापांनीं भरपूर विचक्षणा केली होती. इथें संबंध जुळावा असेंसुद्धां त्यांना वाटत नव्हतें. पण आपल्या प्रौढ आणि सुशिक्षित मुलीच्या इच्छेबाहेर जाणें त्यांना अशक्य झालें आणि त्यांनीं शेवटीं संमती दिली.

या साऱ्या गोष्टी इंदू खरोखरच विसरून गेली होती, कीं रागानें बेफाम होऊन स्वतःची फसवणूक करण्यासाठीं ती अशाप्रकारें त्याला वारंवार सतावून सोडीत होती, याचें निराकरण करतां न आल्यामुळें नरेंद्र मुकाट्यानें मान खालीं घालून स्वस्थ बसून राहिला.

मुकाट्यानें खालीं मान घालून बसलेल्या त्या आपल्या नवऱ्याच्या तोंडाकडे एक कटाक्ष फेंकून एक शब्दसुद्धां न बोलतां इंदू रागारागानें तिथून निघून गेली.

ती न बोलतां गेली खरी—यापूर्वीं कितीतरी वेळां ती अशी गेली होती—पण अकस्मात नरेंद्राला वाटलें, कीं तिनें बुद्धिपुरस्सर आज आपल्या हृदयांतल्या क्षतावर क्षार टाकला होता. क्षणभर मान वर करून रागारागानें जात असलेल्या आपल्या स्त्रीकडे त्यानें पाहिलें. ती नजरेआड झाली तेव्हां एक मोठा—अतिशय मोठा सुस्कारा सोडून तो त्याच ठिकाणीं निर्जीवासारखा कोसळून पडला. आज सहसा त्याच्या मनांत प्रथमच असा विचार उत्पन्न झाला, "सारं खोटं!—सारी भूल!—" हें घरदार, स्त्रीपुत्र, स्नेह, प्रेम सारं कांहीं त्याला आज एका क्षणांत मरुभूमींतील मरिचिकेसारखें दिसूं लागलें.

## ३

"दादा!"

"कोण तें? विमल का? ये ताई, ये!" असें म्हणून नरेंद्र उठून बिछान्यावर बसला. त्याच्या चेहऱ्यावर जी दुःखाची छाया दिसत होती ती विमलेच्या नजरेला आल्यावांचून राहिली नाहीं.

" फार दिवस भेटली नाहींस ताई. खुशाल आहेस ना ? "

विमलेचे दोन्हीं डोळे पाण्यानें भरून आले. ती संथपणें येऊन त्याच्या बिछान्याजवळ बसली आणि म्हणाली, " हें काय दादा—आजारी पडलायस अन् मला कळवलं नाहींस अजूनपर्यंत. "

" तसा कांहीं आजारी नाहीं मी ताई. ही छातींतली दु:खी जरा—"

डोळयांतलें एक टिप आपल्या हातानें पुसून ती म्हणाली, " जरा म्हणजे काय रे ? उठून सुद्धां बसवत नाहीं !—डॉक्टर काय म्हणतो ? "

" डॉक्टर ? डॉक्टर कशाला हवा ? बरं होईल आपोआप. "

" अं ! डॉक्टरसुद्धां बोलावला नाहींस ? किती दिवस झाले ? "

हंसायचा प्रयत्न करीत नरेंद्र म्हणाला, " किती दिवस होय ? त्या दिवसा-पासून ग —होतील सातआठ दिवस. "

" सात दिवस ? म्हणजे सारं कांहीं पाहून वहिनी निघून गेली ? "

" नाहीं नाहीं. पाहून गेली नाहीं—मला वाटतं, मी तसा आजारी आहे तें तिला नीटसं कळलं नसावं. ती गेली त्या दिवशीं सुद्धां मी बाहेर जाऊन बसलों होतों ना ? नाहीं, नाहीं ! हजार प्रकारें राग आला, तरी तुम्हीं बायका काय कधीं असं करणार आहांत ताई ? "

" म्हणजे रागावून गेली आहे का वहिनी ? "

" नाहीं. राग नाहीं—इथं त्रास होत होता. अडचणी होत्या बऱ्याचशा ना ? असे क्लेश काढायची तिला संवय नाहीं. तिची प्रकृतिदेखील भारी खराब झालीय–नाहींतर आजारीपणा पाहूनसुद्धां बायको माणूस कधी राग करतं का ?"

डोळयांत येणारीं आंसवें आंवरीत ती मन घट्ट करून म्हणाली, " करतं तर दादा ! आम्हां बायकांना अशक्य असं कांहीं नाहीं ! नाहींतर तुम्हीं बिछान्यावर पडेपर्यंत कांहीं कळतसुद्धां नाहीं आम्हांला. भोला, मेणा आला का रे ? "

" आणायला पाठवलाय आईसाहेब. "

" इतक्यांतच जायचं का ताई ? अजून दिवस मावळला नाहीं. जरा थोडी बस ना. "

" नाहीं दादा, संध्याकाळ झाली कीं थंडी लागेल. भोला, मेणा एकदम आंतच घे हं. "

" आंत कशाला विमल ? "

" आंतच आणायला हवा दादा. ही अशी छातींतली दुःखी असतांना बाहेर चालत जायला त्रास होईल. "

" म्हणजे ? मला घेऊन जाणार आहेस वाटतं ? काय वेडी आहेस ! एवढा गोंधळ घालण्याजोगं असं काय झालंय मला ? मदोदित मला असं होतं — अन् तसंच आपोआप बरं वाटत. "

" तें राहूं दे दादा. मला कांहीं आणखी एक भाऊ नाहीं, हा गेला तर तो आहे म्हणायला ! हा पहा मेणा आला. हें रॅपर चांगलं गुंडाळून घे अंगाभोवतीं. भोला, जरा आणखी पुढं आण पाहूं मेणा. नाहीं दादा, यावेळीं तुला अगदीं नजरेसमोर ठेवल्याशिवाय मला एवढंसुद्धां बरं वाटायचं नाहीं. "

"मला असा घेऊन जाशील असं वाटलं असतं, तर तुला कळवलंसुद्धां नसतं."

त्याच्या तोंडाकडे पहात विमला म्हणाली, " तुझ्या अडचणी तुझ्याकडेच राहू देत दादा. मला कांहीं सुनावूं नकोस. असं कसं बोलवलें तुला ? तुझी ही अशी अवस्था असतांना तुला एकटा टाकून जाववेल का मला ? अगदीं खरं खर सांग ? "

एक सुस्कारा सोडून नरेंद्र म्हणाला. " मग चल तर. "

" दादा. "

" काय ग ? "

" आज रात्रींच वहिनीला एक तार करतें. उद्यांच्या उद्यां येऊं दे ती ! "

नरेंद्र अस्वस्थ होऊन म्हणाला, " नको-नको-तिला कळवूं नको. "

" कां कळवूं नको ? मेदिनीपूर कांहीं इतकं लाब नाहीं. एकदां येईल, वाटलं तर पुनः निघून जाईल. "

" नाहीं ग विमल, नाहीं. खरोखरच तिची प्रकृति बरी नाहीं. जाऊं दे आणखी दोन दिवस. "

थोडा वेळ थांबून तो म्हणाला, " विमल, तुझ्या हातीं पडल्यावर जर मी बरा झालों नाहीं तर कोण दुसरं मला बरं करणार ? काय ग, मी येणार तें गगनबाबूंना माहीत आहे ना ? "

थक होऊन विमलनें विचारलें, " म्हणजे ? "

" गगनबाबूंना कळल्याशिवाय—"

" असं कांहीं बोललास तर डोकं आपटून प्राण देईन दादा. एका घरांत कधीं दोन मतं असतात का ? असा अपमान करूं नको माझा."

"अपमान कसा करीन ? त्यांचं मत वेगळं नाहीं याची खात्री आहे ना तुला ?"

जरूर तेवढे कपडेलत्ते गुंडाळून घेत असतांना लाजेनें मान हालवून ती उद्गारली, " हो तर !

" आज तेवढी दु:खी जाणवत नाहीं ना दादा ? "

" मुळींच नाहीं. या आठ दिवसांत किती त्रास झाला तुला ! आतां मला निरोप दे ताई मला जाऊं दे."

" कुणाकडे जाणार ? हें पहा दादा, या सोळासतरा दिवसांत वहिनीनं बोटभर चिठीसुद्धा कशी पाठवली नाहीं ? "

" नाहीं पाठवली झालं. पोंचल्याचं पत्र आलं होतं—त्यानंतर कालसुद्धां एक आलं होतं. माझ्याकडूनच गेलं नाहीं उत्तर."

साशंक मुद्रेनें विमला नुसती पहात राहिली. नरेंद्र थोडासा शरमला होता. तो म्हणाला, " —तिकडे जाईपर्यंत तिची प्रकृति बरी नव्हती. सर्दी, खोकला—परवां थोडासा ताप आला होता वाटतं—तरीसुद्धा तिनं तें पत्र लिहिलं —"

" म्हणूनच पैसे पाठवून दिलेस वाटतं ने ? "

नरेंद्र आणखी शरमला. तो म्हणाला, " तिच्या हातीं कांहीं सुद्धां नव्हतं. घराशेजारींच मेळा भरलाय—तिनं लिहिलं आहे, कीं तो संपला कीं येणार आहे ती. तिनं तुला कांहीं पत्र लिहिलं नाहीं वाटतं ? "

" लिहिलंय तर. काल मलासुद्धां एक चांगलं चार पानं पत्र आलंय—"

" असं होय ? असेल—लिहिलं असेल. त्याचं उत्तर—"

" भिऊं नकोस दादा. तुझ्या आजारपणाबद्दल त्यांत कांहीं लिहिणार नाहीं मी. एवढा वेळ खर्ची घालायला मलाही नाहीं सवड !—" असें म्हणून विमला एकदम तिथून निघून गेली.

संध्याकाळ पडायच्या वेळेला वरच्या कोमेजलेल्या आकाशाकडे उघड्या खिडकींतून पहात नरेंद्र स्तब्धपणें बसून राहिला होता. विमला आंत येऊन म्हणाली, " उगीच बसून कसला विचार करतोयस दादा ? "

तिच्याकडे वळून नरेंद्र म्हणाला, "कांहींसुद्धां विचार करीत नाहीं ताई. तुझे दिवस असेच सुखांत जावोत, असा मनांतल्या मनांत आशीर्वाद देत बसलोंय."

त्याच्याजवळ येऊन त्याच्या पायाला हात लावून नमस्कार करून विमला एक खुर्ची ओढून घेऊन बसली.

"बरं—दुपारीं अशी रागारागानं गेलीस कां ? सांग ना ?"

"मला अन्याय सहन होत नाहीं. कां तूं असा—"

"असा काय सांग ना ? इंदूच्या दृष्टीनं एकदां तूं पहा—तिला सुखासमाधानांत ठेवणं कांहीं मला शक्य झालं नाहीं."

"सुखासमाधानानं राहायची ताकद हवी माणसाच्या अंगीं. तिचं भाग्य असं किती जणांना लाभलंय ? पण भाग्य लाभलं तरी तें पचवतां आलं पाहिजे—नाहींतर—" तें वाक्य पुरं करण्यापूर्वीच विमला लाजेनें मान खालीं घालून बसली.

आपल्या प्रेमाच्या ओलावलेल्या दृष्टीनें नरेंद्रानें या आपल्या लाडक्या बहिणीला अभिषेक केला. क्षणभऱ्यानें तो म्हणाला, "विमला, लाजूं नकोस ताई,—खरं बोल, तूं कधीं भांडत नाहींस ?"

"त्यांनीं सांगितलं वाटतं ? ते म्हणणारच तसं."

हळूच हसून नरेंद्र म्हणाला, "नाहीं. गगनबाबूंनीं कांहींच सांगितलं नाहीं. मी तुला विचारतोंय."

लाजेनें लाली आलेला चेहरा वर करून ती म्हणाली, "तुम्हां पुरुषांबरोबर झगडा करायची ताकद आहे कुणाला ? शेवटीं हातींपायीं पडून—कोण तिथं तें ?"

"मी—मी गगनबाबू. थांबलीस कां ? बोलून टाक ना ? भांडण केलं कीं कुणाच्या हातींपायीं पडावं लागतं, तें सांगून टाक ना एकदां."

"चला ! आडून लपून चोरून ऐकणाऱ्या माणसाच्या प्रश्नाला मी उत्तर देत नसतें." असें म्हणून रागाचा आव आणलेला दाखवून, तोंड फिरवून विमला हंसली आणि तशीच घाईघाईनें निघून गेली. एक मोठा सुस्कारा टाकून नरेंद्र तक्याला टेकून पडला. गगनबाबूंनें विचारलें, "आज कसं काय वाटतंय ?"

" साफ बरा झालोंय मी आतां. आतां निरोप द्या मला."

" निरोप ? एवढी घाई कसली ?—दोन दिवस जाऊं देत कीं. तुझ्या या बहिणीच्या सहवासांत जितके दिवस जातील, तितकीं वर्षं आयुष्य वाढतं, तें माहीत आहे का तुला ?"

" माहीत नाहीं—पण मला पटतंय."

गगनबाबूनें त्याच्याकडे रोखून पाहून म्हटलें, " पटायचं कसलं, प्रत्यक्ष पुराव्याची गोष्ट आहे ही. खरं पाहिलं नरेंद्रबाबू, तर या जगांत असलं रत्न लाभणं विरळा भाग्य! भाग्य! भाग्यम् फलंति—असं कायसंसं म्हणतात ना ? नाहीं तर माझ्या सारख्या दळभद्र्याला असली चीज स्वप्नांतसुद्धां मिळाली नसती. ही माझी बायको—नाहीं रे बाबा—जाऊंदे तें! दोन दिवस—असला हा संसार टाकून स्वर्गात देखील आराम मिळायचा नाहीं. तुला सांगून ठेवतों भय्या."

विमला दूर गेली नव्हती. पडद्याआड राहून कान देऊन ऐकत होती. डोळे पुसून तिनें डोकावून पाहिलें,—त्या दिवेलावणीच्या उजेडांत तिला अगदीं स्पष्ट दिसून आलें, तिच्या नवऱ्याचें भाषण ऐकून नरेंद्रचा चेहरा क्षणभर एकदम उजळून उठला आणि लगेच पांढरा फटक पडला.

सुमारें पंधरा दिवसानीं दुपारच्या गाडीनें मुलीला घेऊन इंदु मेदिनीपूरहून परत आली. बायकोची आणि मुलीची प्रकृति चांगली सुधारली आहे असें पाहून नरेंद्रचा कोमेजलेला चेहरा एकदम उजळून उठला. झोंपलेल्या मुलीला ओढून आपल्या जवळ घेऊन त्यानें विचारलें, " खुशाल आहेस ना इंदु ?"

" खुशाल आहें ? कां ?"

" तुला तापबीप कांहीं आला असं कळलं, म्हणून काळजींत होतों. आतां सर्दी बरी झाली ?"

" नाहींतर डॉक्टरला बोलवणार आहांत वाटतं ?"

नरेंद्रचा हंसरा चेहरा कोमेजला. तो म्हणाला, " नाहीं. म्हणूनच विचारतोंय."

" कशाला विचारायला हवं ? इकडे नुसते पन्नास रुपये पाठवले अन् पत्रांवर पत्रं येताहेत, कशी आहेस ? कशी आहेस ? काळजी घे—काळजी घे ! मी काय कुकुलं बाळ होतें ? कीं माझ्या दादाला पन्नास रुपये देतां आले नसते

मला ? असं कांहीं तरी पाठवून चारचौघांसमक्ष मला मान खालीं घालायचा प्रसंग आणायची काय जरूरी होती ? सर्वांच्या दृष्टीनं मी हास्यास्पद ठरलें."

नरेंद्रचा कोमेजलेला चेहरा आणखी कोमेजला. तो काचरत काचरत म्हणाला, " त्यापेक्षां जास्त मिळाले नाहींत."

" मग पाठवायचे नव्हते ! तसं नुसतं लिहूनच कां कळवलं नाहीं ? अं: ! पुन: तेंच रोजचं– 'नाहीं नाहीं'—'द्या द्या'—बरी तिकडे होतें इतके दिवस. श्रीमंताघरची मुलगी गरीबाघरीं पडण्यासारखं महत्पाप नाहीं या जगांत ! " हा अनादि सिद्धांत नवऱ्याला ऐकवून इंदू दुसरीकडे निघून गेली.

जवळजवळ एक महिन्यानें नवरा बायकोची ही पहिली भेट.

इंदू बाहेर आली. इकडे तिकडे नजर फेंकल्यावर आपल्या निजायच्या खोलींत गेली तेव्हां ती आश्चर्यचकित झाली. घरांतल्या इतर खोल्यांप्रमाणें ही खोलीसुद्धा झाडून झडपून साफसूफ केली होती.

तिनें विचारलें, " ही झाडझूड कां चालली होती ग ? "

नवी मोलकरीण म्हणाली, " आपण येणार म्हणून."

" मी येणार म्हणून ? "

" होय बाईसाहेब. असंच सांगितलं बाबूजींनीं. केरकचरा पडलेला आपल्याला आवडत नाहीं असं ते म्हणाले, म्हणून गेले तीन दिवस ही—"

इंदूला ते उद्गार ऐकून एक प्रकारचा अभिमान वाटला. तरीही ती बेफिकिरीनें म्हणाली, " केरकचरा कधीं कुणाला आवडलाय ? तरीपण हें बरं झालं—

" होय बाईसाहेब, माणसं लावून वरखालीं सारं साफ करून घेतलं."

" बरं —रामटहलला एकदां बोलाव पाहूं. बाजारांतून थोडीं फळंबिळं आणायला हवीं."

" फळं आणून ठेवलीं आहेत बाईसाहेब. आज सकाळीं बाबू स्वत: बाजारांत जाऊन सारं कांहीं घेऊन आले."

" नारळ आहेत ? द्राक्षं—"

"आहेत तर. आत्तां घेऊन येतें—" असें म्हणून मोलकरीण निघून गेली.

इंदूच्या मुद्रेवरची संतापाची छाया पूर्णपणें नाहींशी झाली इतकेंच नव्हे, तर थोड्या वेळापूर्वी दिसलेला नवऱ्याचा तो कोमेजलेला चेहरा हृदयाच्या कुठल्या तरी कोपऱ्यांतून डोकावत असल्यासारखा तिला वाटूं लागला.

घटका दोन घटका विश्रांति घेतल्यावर ती प्रसन्न चेहऱ्यानें नवऱ्याच्या बैठकीच्या खोलींत आली. चष्मा चढवून टेबलावर अगदीं खालीं मान झुकवून नरेंद्र कांहींतरी लिहित होता. ती म्हणाली, " एवढं मन लावून कसलं लिहिणं चाललंय ? कविता ? "

वर पाहून नरेंद्र म्हणाला, " नाहीं. "

" मग काय तर ? "

" तसं कांहीं विशेष नाहीं—" असें म्हणून त्यानें लिहिलेले कागद झांकून ठेवले.

इंदूचा प्रसन्न चेहरा पुनः काळवंडला. ती म्हणाली, " तें जर ' तसं कांहीं नाहीं ' होतं, तर मग त्याच्यावरच एवढं डोकं खुपसून बसण्यापेक्षां संसाराचा भार हलका होईल असं कांहीं करा ना ! दादाच्या हातीं एकदोन जागा देण्याजोग्या आहेत असं कळलं मला—" असें म्हणून तिनें नवऱ्याच्या तोंडाकडे निरखून पाहिलें.

नोकरीची गोष्ट काढली, कीं केव्हांही त्याला पटत नाहीं—वाईट वाटतें—हें तिला निश्चित माहित होतें. पण आज तसें वाईट वाटल्याचें एवढें सुद्धां लक्षण त्याच्या मुद्रेवर दिसून आलें नाहीं, हें पाहून ती आश्चर्यचकित झाली.

नरेंद्र शांतपणें म्हणाला, " त्या जागेवर नोकरी करायला माणसंसुद्धां असतील कीं तिकडे ? "

हें अगदींच अनपेक्षित उत्तर ऐकून इंदू संतापानें भडकून उठली. क्षणभर तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेना. नंतर ती म्हणाली, " तें माहीत आहे मला. तिथं असतील पण इथं तर नाहींत ? बऱ्याची गोष्ट बोलायला गेलं तर अलिकडे तुमचा कपाळशूळ उठतो. घरकोंबड्यासारखं खोलींत बसून कागदांत डोकं खुपसून कविता लिहायला लाज नाहीं वाटत ? " असें म्हणून धुसपुसत धुसपुसत ती खोलींतून बाहेर गेली.

ही दुसरी भेट !

" च्यः ! वहिनी वाटतं ! केव्हां आलीस ? "

" परवां दुपारीं. "

" परवां !—दुपारीं ? तेव्हांच आतां ही घाईघाईनं संध्याकाळची भेटायला आलीयस वाटतं ? नाहीं ग बाई, ही ओढ जरा कमी कर. "

इंदु मान हालवीत म्हणाली, " पत्र लिहिलं तर त्याचं उत्तरसुद्धां येत नाहींस ! एकटी मी कितीशी ओढ धरणार आहे वन्सं ? "

आश्चर्यचकित होऊन विमलेनें विचारलें, " उत्तर मिळालं नाहीं ? "

" नाहींच म्हणायचं. चार पानांचं उत्तर काय चार ओळी ? "

विमला ओशाळून म्हणाली, " त्यावेळीं मला वेळ मिळत नव्हता ग. इकडे दादा बरा होतो न होतो तोंच आमचा तो नवा भाडेकरू अगदीं पंथाला लागला—"

इंदुला त्यांतलें एक अक्षरही कळलें नाहीं. आ वासून ती नुसती पहात राहिली. तिच्याकडे लक्ष न देतां विमल बोलत होती, "--तो मंगळवार मी साऱ्या जन्मांत विसरायची नाहीं. सात दिवसांनीं कळलं तेव्हां दादाला घेऊन आलें. त्यानंतर दोन दिवसांनीं दादाच्या छातींतल्या कळा अशा काहीं भयंकर वाढल्या—तिकडे अंबिकबाबूचं दुखणंही तसंच विकोपाला गेलं.— तुला काय सांगूं वहिनी, शेक देतां देतां—फोमेण्ट करतां करतां घरच्या प्रत्येक माणसाच्या हाताची चामडी पोळून निघाली.—रात्रंदिवस कुणाचं न्हाणंखाणंसुद्धां झालं नाहीं. खरंच सांगतें तुला, सतीसाध्वी आहे ती अंबिकबाबूची बायको. एवढीशी पोर पण किती खपत होती !—किती सेवा करीत होती नवऱ्याची ! या आजारांतून तो उठला तो तिच्या पुण्याईनं—नाहीं तर डॉक्टर वैद्यांनींसुद्धां हात टेकले होते."

" अंबिकबाबू कोण ? "

" कुणाला ठाऊक ! तिकडे घाटलच्या बाजूला त्यांचं घर आहे वाटतं. औषध घ्यायला इथं आलीं तीं माणस—तेव्हां आमचं हें शेजारचं घर त्यांनीं भाड्यानं घेतलं. दुसरं कुणी माणूस नाहीं—हातीं पैसा नाहीं—होती नुसती एक बायको—"

इंदूनें मधेंच विचारलें, " तुझ्या दादाचं दुखणं बरंच विकोपाला गेलं होतं वाटतं ? "

ओंठ चावून विमला म्हणाली, "त्या रात्रीं तर मी खरोखरच घाबरलें होतें. त्या खिडकीवरच्या त्या रिकाम्या बाटल्या पहा ना—तिथे डॉक्टर येत होते—

पण हें सांग वहिनी, दादानं यांतलं कांहीं तुला पत्रांत लिहिलं नाहीं वाटत ?"

विचुकपणें इंदु म्हणाली, " नाहीं."

विमलेनें विचारलें, " इथं आल्यावर कळलं ?"

इंदुनें तसेंच उत्तर दिलें, " हो."

विमला सांगत होती, "पहिल्याच दिवशी मीं तुला तार करावी म्हणत होतें. दोनतीन तासांची वाट—सहज आली असतीस—पण कांहीं केल्या दादा ऐकेना—" ती हंसून म्हणाली, " काय मारून टाकलंयस त्याला तें तुझं तुलाच माहित वहिनी ! तुझी प्रकृति बिघडलेली, तुला त्रास होईल, या भीतीनं कांहीं केल्या तो तुला कळवायला देईना. जाऊं दे—देवाच्या दयेनं आतां बरा झाला —नाहीं तर—"

"नाहीं तर काय झालं असतं वन्सं ! आजारांतून उठल्यावरही त्यांना माझी गरज भासत नाहीं—उठले नसते तरीही गरज भासली नसती—" असें म्हणून इंदू उठली आणि औषधाच्या रिकाम्या आणि अर्ध्या रिकाम्या बाटल्या उलटून पालटून त्यांचीं लेबलें पाहूं लागली.

पण हें काय झालें ? असें कधींच झालें नव्हतें.—आज एकाएकीं तिचे डोळे पाण्यानें भरून आले. एवढा मोठा प्रसंग आलेला, पण तिला नुसतें कळवलें सुद्धां नाहीं ! इतकी का ती परकी झाली होती ! अशी ती स्वतः कितीशी आजारी पडली होती,—कीं आजारी पडल्याचें लिहिलें होतें म्हणून तिला ही खबर देणें कुणाला योग्य वाटलें नाहीं !

बरें वाटल्यावर त्यानें पत्रें लिहिलीं, इकडल्या तिकडल्या पुष्कळ गोष्टी लिहिल्या, पण आपल्या आजाराची बातमी लिहायला मात्र कां विसरला ?—बरं–इथं येऊन तीन दिवस झाले, तरीसुद्धां अजून सांगावंसं कां वाटलं नाहीं ?

इंदुला यावेळीं काय वाटत होतें याची विमलेला कल्पना आली होती. ती मागें फिरून म्हणाली, " शिशा–बाटल्या उलथून पालथून आतां काय होणार आहे वहिनी ? खोटी साक्ष द्यायच्या नाहींत त्या ! चल, तुला आतां थोडा चहा देतें."

'चल' म्हणून तिच्या नजरेआड डोळ्यांतलें पाणी पुसून इंदु तिच्यासमोर येऊन उभी राहिली.

चहा झाला. मुद्दाम तिला जाणवण्याच्या उद्देशानें कीं काय कोण जाणे—विमला म्हणाली, " आतां त्याचं हसूं येतं वहिनी. एका घरांत दोन रोगी—पण दोघांच्या व्यवस्थेंत किती विलक्षण फरक होता ? इकडे, टेकीला आला तरी तुला त्रास होईल म्हणून दादा तुला कळवूं नको म्हणत होता—त्याला तुझ्या प्रकृतीची काळजी वाटत होती—अन् तिकडे, अंबिकबाबू आपल्या बायकोला एक क्षणभर सुद्धां नजरेआड होऊं देत नव्हता. ती दृष्टीआड झाली नि आपला प्राण गेला तर—अशी भीति वाटे त्याला ! इतकंच नव्हे, तर तिच्याखेरीज दुसऱ्या कुणाच्या हातून औषधसुद्धां घ्यायचा धीर होत नव्हता त्याला.—कधीं ऐकलं होतंस असं वहिनी ? आमच्या यांचं नांव घेऊन तुम्हीं सारीं थट्टा करतां, पण अंबिकबाबूनं साऱ्यांनाच मागं टाकलं. सेवाशुश्रूषा करतां करतां बिचारी पोर मढ्यासारखी होऊन गेलीय. "

" हुं ' म्हणून इंदू उठून उभी राहिली. ती म्हणाली, " पुनः केव्हांतरी येऊन तुझ्या या सतीसाध्वी बायकोची एकदां ओळख करून घेईन. आतां गाडी आली आहे—येतें मी. "

" आतां उद्यां ये तर एकदां. तिची ओळख करून घेतलीस तर मोठा आनंद होईल तुला. "

" हो. काहीं शिकतां येतं कीं काय तिच्यापासनं तेही पाहीन ! " असें म्हणून तोंड वांकडें करून ती जाऊन गाडींत बसली. आपल्या नवऱ्याच्या चांगुलपणावर अंबिकबाबूच्या वेडेपणामुळें उडालेली धूळ तिला जाणवत होती. सारा रस्ताभर ती हाच विचार करीत होती.

## ५

एकदोन दिवसांनीं बोलतां बोलतां इंदू एकदम चिडीला आली आणि म्हणाली, " खरं बोललें तर तुला राग येणार नसेल तर बोलतें. ऐक वन्सं,—तुझ्या दादानं लग्न करायला नको होतं तसं अंबिकबाबूनंही करायला नको होतं. "

विमलेनें विचारलें, " कां ? "

" बायको पोसायचं सामर्थ्य नसतां लग्न करणं म्हणजे महापाप. "

तिचें भाषण ऐकून विमलेला फार वाईट वाटलें. इंदूवर तिचा फार लोभ होता. ती म्हणाली, " अंबिकबाबूनं चूक केली असं म्हण हवं तर—पण म्हणून काय त्याच्या बायकोनं आपलं कर्तव्य करूं नये ? मरेपर्यंत नवऱ्याची सेवा केली पाहिजे ना बायकोनं ? "

" काय म्हणून ? त्यानं चूक केली—अधिकार नसतां चूक केली तर कांहीं हरकत नाहीं—अन् त्याचं फळ भोगावं काय आम्हीं ? तू इंग्रजीतलं कांहीं वाचीत नाहींस. चार जाणत्या माणसांत मिसळत नाहींस, नाहींतर तुला पटवून दिलं असतं, कीं कर्तव्याचा प्रश्न कांहीं एकाच बाजूनं पाहायचा नसतो. दोन्ही बाजू हिशेबांत घ्या, नाहींतर कुठलीच घेऊं नका. पुरुष लोक असलं कांहीं आम्हांला कळूं देत नाहींत—ते कळूं देत नाहींत, म्हणून अंबिकबाबूच्या बायकोप्रमाणं काय आम्हीं आपला जीव पणाला लावायचा त्यांच्या सेवेसाठीं ? "

कांहीं वेळ थांबून विमला म्हणाली, " नाहीं तर सेवाच झाली नसती. वहिनी, बायकांच्या जातीला सेवा करणं मोठं कठीण का जातं ? अंबिकबाबूच्या बायकोचे होत असलेले बाहेरून दिसणारे क्लेश नजरेसमोर दिसतात—पण तिला आंतून होणारा आनंद कळतो का तुला ? "

" मला कळायला नको आहे. "

" नवऱ्याचं प्रेमसुद्धां कळायला नको आहे का तुला ? "

" नाहीं वन्सं, आतां शिसारी आली आहे. उलट ते सारं कमी करून कर्तव्याकडे थोडीशी नजर दिली तर जीव खालीं पडेल माझा."

विमला उभी होती ती एक सुस्कारा सोडून खालीं बसली आणि म्हणाली, " अगदीं असंच पूर्वी एकदां म्हणाली होतीस पण तें तेव्हां मला कळलं नव्हतं—आतांही कळत नाहीं. दादा आपलं कर्तव्य करीत नाहीं का ? तें काय तें तुझं तुला माहित. तूं पुष्कळ वाचलं आहेस, अनेक देशांचा इतिहास तुला माहित आहे. तुझ्याबरोबर वाद घालणं मला शोभायचं नाहीं. पण मला अगदीं पक्कं वाटतं,—चूक म्हण कीं बरोबर म्हण—पुरुषाचं प्रेम अग्राह्य करण्याइतकी स्पर्धा कुठल्याच देशांतल्या स्त्रीच्याठायीं नाहीं. तें हरवून बसण्यापेक्षा मरण पत्करेल असं मला वाटतं.—असं कांहीं होऊन जगणं म्हणजे नुसती विटंबना. "

" मला नाहीं तसं वाटत. "

" वाटलंच पाहीजे. " असें म्हणून विमला हंसली. या साऱ्या गोष्टी थट्टेथट्टेनें चालल्या होत्या याची तिला आठवण झाली. बायकांच्या जातीच्या दृष्टीनें हें असें कांहीं बोलणें म्हणजे खरोखरच थट्टा नव्हे तर काय ?

ती म्हणाली, " वहिनी, तोंडाला येतं तें माझ्यासमोर बोलतेयस, पण दादाच्या समोर असं कांहीं करून उगीच शहाणपणा दाखवूं नकोस. तुला सांगून ठेवतें, पुरुष माणूस कितीही बुद्धिमान असेना, बहुधा तो—"

" बहुधा तो काय ? "

" बहुधा तो थट्टा कोणती आणि कोणती नव्हे, हें जाणायला असमर्थ असतो. "

" तें त्यांचं त्यांनीं पहावं. त्याची उठाठेव मला कशाला ? "

" पण ती उठाठेव अवश्य आहे असं मला वाटतं ना वहिनी ? "

बळेंबळें हंसून इंदु म्हणाली, " कां तें सांग ना ? "

क्षणभर विचार करून विमला म्हणाली, " रागावूं नकोस वहिनी पण त्या दुखण्याच्या वेळीं खरोखरच मला वाटे, कीं दादा तुझ्यासाठीं अगदीं वेडा झालाय—तें म्हणतात ना, पायीं कांटा लागला तर ऊर पुढं करायचं—तसा वेडा झाला होता तो, असं वाटत होतं मला. पण आतां वाटतं, तें तसं कांहीं आतां राहिलं नाहीं. "

एकदम इंदूचा चेहरा काळवंडून गेला. बळेंबळें हंसायचा प्रयत्न करीत ती म्हणाली, " तुझ्या दादाला सांग, मला त्याची फिकिर नाहीं. माझं स्वतःचं बरंवाईट पहाण्याची जिथं मलाच पंचाईत होतेय, तिथं दुसऱ्यासाठीं डोकेफोड करीत बसणं मला आवडत नाहीं—हें नीट ध्यानांत ठेव. "

घरीं आल्यानंतर इंदु नवऱ्याच्या खोलींत आली. आल्याबरोबर तिनें विचारलें, " मी मेदिनीपुरला गेलें होतें तेव्हां आजारी पडलां होतां का तुम्ही ? "

लिहित असलेल्या कागदाकडून नजर वर करून तो म्हणाला, " नाहीं. आजार नव्हे, थोडीशी दुःखी होती. "

" खर्चे वांचवायच्यासाठीं वन्सांच्या घरीं जाऊन का पडलां होतां ? "

बायकोचे हे असे कुजकट उद्गार ऐकून त्यानें पुनः लिहायला सुरवात केली. क्षणभर उगीच राहून तो मग हळूच म्हणाला, " विमलच स्वतः येऊन घेऊन गेली होती मला. "

" पण मला कळलं असतं तर मीं सांगितलं असतं, आजारी माणसासाठीं हॉस्पिटलं आहेत. उगीच दुसऱ्यावर भार टाकण्यापेक्षां सरळ हॉस्पिटलांत जाणं जास्त बरं."

नरेंद्रनें नजर वर केली नाहीं—कीं तोंडांतून एक शब्दही काढला नाहीं.

रागारागानें दारावरचा पडदा ओढून ती बाहेर निघून गेली. तो धक्का लागून जवळच एक छोटें टिपॉय कोसळून पडलें पण तिकडे तिनें मागें वळून सुद्धां पाहिलें नाहीं.

चारपांच मिनिटांनीं तसाच पडदा सरकावून ती पुन्हां आंत आली आणि म्हणाली, " वन्संनीं मला कळवायचं म्हटलं, त्यावेळीं तुम्हीं तिला कां कळवूं दिलं नाहीं ? मी आलें असतें, तर औषधांतून विष पाजलं असतं का तुम्हांला ? "

वर नजर करून नरेंद्र म्हणाला, " छे, छे. असं कसं वाटेल मला ! तुझीच प्रकृति बरी नव्हती—"

" चांगली होती माझी प्रकृति ! कळवलं असतं कुणी तर आलें नसतें हें मात्र खरं. पण मी तिथं आंथरूण धरून मरायला टेंकलें होतें असं कांहीं मी लिहिलं नव्हतं तुम्हांला पत्रांत. निष्कारण कांहींतरी बनाव बनवून वन्संना पत्र लिहूं नको म्हणण्यांत कांहीं अर्थ नव्हता. " असें म्हणून ती जशी आली होती तशीच निघून गेली. नरेंद्रसुद्धां तसाच टेबलावर झुकून लिहित राहिला. पण जें कांहीं लिहिलें होतें तें त्याच्या नजरेला आतां सारें पुसून सारवल्यासारखें दिसत होतें.

पडद्याआडून समोर येऊन इंदू डॉक्टरला म्हणाली, " गगनबाबूंच्या घरीं आपणच का माझ्या नवऱ्याला औषध देत होतां ? "

म्हाताऱ्या डॉक्टरनें वर पाहिलें. इंदूच्या उद्वेगपूर्ण मुद्रेकडे पाहून त्यानें नुसता मानेनें होकार दिला.

इंदू म्हणाली, " पण त्यांची प्रकृति साफ बरी झाली आहे असं मला वाटत नाहीं. हे आपल्या 'फी'चे पैसे. पुनः एकदां येऊन कृपा करून त्यांची प्रकृति पाहून जाल तर मोठे उपकार होतील. "

डॉक्टरला आश्चर्य वाटलें. त्यांची समजूत घालून इंदू म्हणाली, " औषध घेणं त्यांना आवडत नाहीं. औषधाचं प्रिस्क्रिप्शन आपण त्यांच्या नकळत माझ्याकडे द्या. अन् त्यांची एकदां समजूत घालून पहा. "

तसें करायची कबुली देऊन डॉक्टर निघून गेले. रामटहलनें येऊन वर्दी दिली, " माईजी, वल्लभ सोनार आलाय. "

" आलाय ? इथं बोलाव त्याला. "

" वल्लभशेट, मुद्दाम तुम्हांला बोलावलं—तें तसंच एक काम आहे. तुम्हीं आमचे विश्वासू माणूस—या एवढया बांगड्या विकायच्या आहेत. ही फॅशन आतां जुनी झाली आहे—आतां बऱ्या नाहीं दिसत या. या विकून दुसऱ्या घ्यायच्या असं मी ठरवलंय. "

" ठीक आहे बाईसाहेब. तें मी करतों. "

" ताजवा आणलाय का ! जरा वजन करून पहा पाहूं. पैसे मात्र मला उद्यांच हवेत. यापेक्षां वेळ लावून चालायचा नाहीं. "

" ठीक आहे. "

बांगड्या हातीं घेऊन वल्लभ म्हणाला, " या डांक लावलेल्या बांगड्या आहेत आईसाहेब. विकायला गेलं तर थोडसं नुकसान होईल. "

" कांहीं हरकत नाहीं वल्लभशेट. यांची घडण मला पसंत नाहीं.—आणखी असं पहा, या बाबतींत बाबूंकडे काहीं बोलायचं नाहीं. "

बाबूलोकांच्या नकळत बायकोचे दागिने खरेदीविक्री करायचा इतिहास वल्लभशेटला कांहीं अगदींच अपरिचित नव्हता. हळूच हंसत तो बांगड्या घेऊन निघून गेला.

## ६

" डॉक्टरबाबू, पांचसहा बाटल्या घेतल्या पण अजून छातींतली दुःखी कांहीं बरी होत नाहीं. "

" नाहीं ! ते तर कांहीं असं सांगत नाहींत ! "

" त्यांचा स्वभाव माहित आहे ना तुम्हाला ? मला तें कळतंय. अजून दुःखी आहे—शिवाय प्रकृतिही तितकीशी दुरुस्त झालेली दिसत नाहीं. "

जरा विचार करून डॉक्टर म्हणाले, " असं पहा, मला वाटतं नुसत्या औषधानं कांहीं व्हायचं नाहीं. हवाबदल केला पाहिजे."

" तसं कां सांगत नाहीं तुम्हीं त्यांना ? "

" एकदां बोललों होतों. पण त्यांना तें कांहीं पटत नाहीं."

इंदु रागारागानें म्हणाली, " त्यांना पटत नाहीं म्हणजे काय ? आपण डॉक्टर, रोग्यानं आपला हुकूम मानायचा—असंच ना ? "

बिचारा म्हातारा डॉक्टर थोडासा हंसला.

स्वतःच्या फाजिल काळजीमुळें इंदु शरमली आणि म्हणाली, " असं पहा, माझा मोठा नाइलाज झाला आहे. तुम्हीं जरा त्यांना थोडं घाबरवून सोडा."

मान हालवून डॉक्टर म्हणाले, " असल्या या केसमधें भीति तर असतेच—"

इंदूचा चेहरा गोरामोरा झाला. ती म्हणाली, " खरंच का ? " तिच्या चेहऱ्याकडे पाहिल्यावर एकाएकीं उत्तर देणें डॉक्टरला कठीण गेलें.

इंदूचे डोळे एकदम भरून आले. ती म्हणाली, " डॉक्टरबाबू, मी आपल्या मुलीसारखी, माझ्याकडे कांहीं लपवूं नका, काय झालंय तें मला उघडउघड सांगा."

काय झालें होतें तें स्वतः डॉक्टरला तरी कुठें अजून उमगलें होतें ? त्यांनीं आडव्यातिडव्या भाषेंत जें कांहीं सांगितलें, तें ऐकलें तेव्हां ती रडूं लागली.

तिसऱ्या प्रहरीं हातांतली लेखणी खालीं ठेवून नरेंद्र उघड्या खिडकींतून बाहेर पहात राहिला होता. इंदू आंत आली आणि एक खुर्ची ओढून घेऊन जवळच बसली. मान वळवून नरेंद्रनें एकदां तिच्याकडे पाहिलें.

आज बरेच दिवस इंदूनें पैशांची मागणी केली नव्हती—आज तेवढ्या-साठींच ती आली असावी अशी कल्पना करून घेतल्यामुळें त्याच्या हृदयांत धडकी भरली.

इंदूनें पैसे मागितले नाहींत. ती म्हणाली, " डॉक्टर म्हणतात, कीं औषधानं हें दुखणं ज्याअर्थी अजून बरं होत नाहीं, त्याअर्थी हवाबदल करणं अवश्य आहे. कुठं तरी एकदां जाऊन या ना."

खरोखरच नरेंद्र चकित झाला. कित्येक दिवस दृष्टिआड झालेला मोलाचा ठेवा कुठें नाहींसा झाला होता, त्याचा पत्ता लागल्यासारखा त्याला वाटलें. आज ऐकूं आलेला इंदूच्या आवाजांतला गोडवा यापूर्वी तो विसरून गेला

होता. म्हणूनच हतबुद्ध होऊन तोंड फिरवून तो किती तरी वेळ आपल्या मनाचे कोपरे धुंडाळूं लागला.

इंदू म्हणाली, "ऐकलं का ? मीं म्हणतें, उद्यांच जायचा बेत करावा. फार दूर जायला नको—वैद्यनाथला जाऊं आपण—आपण दोघं, कमला अन् एक मोलकरीण. रामटहल जुना माणूस आहे, त्याच्यावर घर टाकून जायला कांहीं हरकत नाहीं. वैद्यनाथला एक लहानसं घर घेतलं कीं झालं. मग ? आतांच सामानसुमानाची बांधाबांध करायला सांगूं का ?"

खर्चाचा प्रश्न आला कीं नरेंद्रच्या काळजांत धडकी भरे. या असल्या खर्चीक प्रस्तावामुळें त्याची तब्येत एकदम बिघडली. त्यानें विचारलें, "या डॉक्टरला इथं यायला सांगितलं कुणी ?"

इंदूनें उत्तर द्यायच्यापूर्वींच तो म्हणाला, "—विमलेला म्हणावं, असा माझ्यापाठीं डॉक्टर लावून देऊन मेहरबानी करून माझा छळ करूं नकोस. कांहींसुद्धां झालेलं नाहीं मला."

म्हणजे विमला आड राहून डॉक्टरला पाठवते ? काळजी काय ती विमलेला ? इंदूला धक्का बसला—तो सांवरून ती म्हणाली, "पण खरोखरच तुमची प्रकृति बरी नाहीं. अजून दुःखी बरी झाली नाहीं."

"झाली बरी."

"मग अजून तब्येत सुधारत नाहीं कशी ! कांहीं का असेना, जरा कुठं बाहेर जाऊन आलं तर त्यांत कांहीं बिघडायचं नाहीं."

नरेंद्र आतां अंतर्बाह्य सहनशक्तीच्या मर्यादेपलीकडे गेला होता. मिळालेला धक्का सांवरून तो म्हणाला, "हवाबदल करायला जायचं मला सामर्थ्य नाहीं."

हट्टाला पेटून इंदू म्हणाली, "तें चालायचं नाहीं. जीव तर जगवला पाहिजे !"

ही हट्टाची पद्धति इंदूच्या बाबतींत अगदीं पहिल्यानेंच दिसून आल्यामुळें नरेंद्रनें भलताच समज करून घेतला. कांहींतरी करून सतावण्यासाठींच तिनें हा उपाय काढला आहे असेंच त्याला वाटलें. इतके दिवसपर्यंत ज्या धीरानें तो सर्व कांहीं सहन करीत होता, तें बंधन एका क्षणांत तुटून गेलें. तो एकदम ओरडून म्हणाला, "कोण म्हणतो जीव जगवला पाहिजे ? नाहीं. कांहीं नको—शंभर वेळ मी म्हणतों, कीं कांहीं नको जीव जगवायला. तुझ्या पाया पडतों इंदू, मला अशी छळूं नकोस. सुखानं राहूंदे मला."

नवऱ्याच्या तोंडून करडे बोल ऐकून घ्यायची इंदूची अपेक्षा नव्हती. ती हतबुद्ध झाली—कावरीबावरी झाली. पण नरेंद्रच्या तें ध्यानीं आलें नाहीं. तो तसाच बोलत होता, "—कोणत्या संकटांत सध्यां मी सांपडलों आहें, कशा रीतीनं दिवस काढतों आहें—तें तुला चांगलं माहित आहे. सारं कांहीं कळून सवरून केवळ मला सतावण्यासाठीं तूं रात्रंदिवस ही टोंचणी सुरू केली आहेस ? कां ? मी काय केलंय तुझं ? काय हवंय तुला ?"

इंदूच्या तोंडचें पाणी पळालें. तिच्या तोंडून एकही शब्द बाहेर निघेना. चिडून आरडाओरड करणें नरेंद्रच्या बाबतींत अगदींच अस्वाभाविक होतें हें तिला माहीत होतें. त्याच्याही तें आतां ध्यानीं आलें. आवाज खालीं आणून तो म्हणाला, "बरं बरं—मी कबूल करतों, कीं हवाबदल केली पाहिजे. पण कसं करायचं ? पैसे कुठं आहेत ? रोजचा खर्च भागवतांनाच माझ्या नाकीं नव येताहेत."

सहनशक्तीची इंदूला कधीं ओळख नव्हती. पड खाणें तिच्यापक्षीं अशक्य होतें. पण यावेळीं मात्र ती घाबरली. नम्रपणें म्हणाली, "पैसे नाहींत खरे, पण दागिने तर आहेत माझे—"

"आहेत. पण ते माझे नव्हत—तुझे आहेत—तुझ्या बाबांनीं दिले आहेत—तुला दिले आहेत. ते घ्यायचा मला एवढासुद्धां अधिकार नाहीं. माझ्यापेक्षां हें तुलाच कळलं पाहिजे होतं."

"बरं—ते नका घेऊं—मी रोख पैसे देतें"

कुठं मिळाले ? घरखर्चांतून वांचवलेस ?"

बांगड्या विकून आलेले ते पैसे होते. एकाएकीं खोटें बोलणें इंदूला साधलें नसतें. खोटें बोलण्यापेक्षां खरें सांगणें बरें असें ठरवून तिनें सारी हकिकत सांगितली. ती ऐकून नरेंद्रची मुद्रा भयंकर झाली. तो म्हणाला, "तर मग ते राहूं देत. पुन्हां दागिने घडव त्याचे. माझ्या देहांतलं रक्त आटवून जें मी घडवलं होतं तें अशा रीतीनं नाश व्हायला नको. इंदू , आजवर मी कधीं तुला टाकून बोललों नाहीं—मुकाट्यानं नुसतं तुझं बोलणं ऐकत आलोंय, पण तूं त्या दिवशीं दिमाखानं बोलली होतीस कीं 'मी कधीं खोटं बोलत नाहीं.' तें आठवतं का तुला ! छेः !—"

पडद्याच्या फटींतून हांक मारून कमला म्हणाली, "आई, आत्त्या आली आहे."

" काय चाललंय ग वहिनी ? " असें म्हणत म्हणत विमला आंत आली. इंदूनें मुलीला आंत ओढलें. तिच्या गळ्यांतला हार दोन्ही हातानीं धरून ओढून तोडून नवऱ्याच्यासमोर फेंकून म्हणाली, " मी कधीं खोटं बोलत नव्हतें. तुमच्याकडेच शिकलें खोटं बोलायला. तरीपण अजूनही पितळेला सोनं म्हणून चालवायला शिकलें नव्हतें. स्वतःच्या बायकोला—पोटच्या पोरीला फसवायला ज्याला कांहीं वाटत नाहीं त्याच्याबद्दल काय बोलायचं ? दुसऱ्यावर खोटं बोलण्याचा आरोप कां करावा त्यानं ? "

तुटलेला हार हातीं घेऊन नरेंद्रनें विचारलें, " तुला कसं कळलं ही पितळ म्हणून ? चौकशी केलीस ? "

" आपल्या बहिणीला सांगा चौकशी करायला ! " असें म्हणून डोळे वटारून तिनें विमलेकडे पाहिलें.

दोन पावलें मागें हटून विमला म्हणाली, " असलीं कामं मी करीत नाहीं वहिनी. दादानं दिलेला दागिना सोनाराकडे नेऊन कसाला लावून पाहून खात्री करून घ्यायचा प्रयत्न करण्याइतकी हलकट नाहीं मी. "

नरेंद्र म्हणाला, " इंदू , तुलासुद्धां मी एकदोन दागिने दिले आहेत—त्यांचा कस लावून पाहिला होतास का ? "

" नाहीं. पण आतां पाहिला पाहिजे. "

" पहाच—ते मात्र पितळेचे नाहींत." बहिणीकडे वळून हार दाखवून तो म्हणाला, "ताई, हें सोनं नव्हे, पितळच आहे. प्रत्यक्ष मी या मुलीचा बाप—तिच्या वाढदिवशीं कां मी असं तिला फसवलं, तें तुला कळेल. मुलीला फसवलं खरं पण बायकोला फसवायचा मला धीर झाला नाहीं. "

## ७

" माझं ऐक वहिनी, एकदां जाऊन त्याच्या पायाला हात लावून क्षमा माग. "

" कां ? काय अडलंय माझं ? माझं डोकं कापलं तरी तें होणं नाहीं."

" कां होणं नाहीं ? नवऱ्याच्या पायापाशीं क्षमा मागायला लाज कसली ? तुझी चूक नसेलही कदाचित—पण त्याला बरं वाटेल असं कांहीं करणं जास्त महत्त्वाचं नाहीं का ? "

“ नाहीं—माझ्यालेखी नाहीं. देवाच्या घरीं बिनडांक राहाणं मात्र मला कशापेक्षांही मोठं वाटतं. देवाघरीं पाप केलं नाहीं तोंपर्यंत मला कुणाचीही पर्वा नाहीं. ”

रागाला येऊन विमल म्हणाली, “ वहिनी, या शहाणपणाच्या गोष्टी मलाही कळतात—पण वेळ येईल त्यावेळीं हा शहाणपणा उपयोगी पडायचा नाहीं बरं ! डोळे झांकून संकट टाळतां येत नाहीं वहिनी. खरोखरच दादाचं मन आतां तुझ्याबद्दल विटलं आहे. ”

उदासपणानें इंदु म्हणाली, “ मर्जी त्यांची. ”

मनांतल्या मनांत विमलेचा जळफळाट झाला. पण ती उघड म्हणाली, “ ती त्यांची मर्जी ज्या दिवशीं कळून येईल, त्याच दिवशीं सत्यानाश होईल ! तुझा दादा जितका सहनशील आहे तितकाच कठोर आहे. त्याची एक बाजू तूं पाहिली आहेस—दुसरी अजून पाहायची आहे—म्हणून मी तुला बजावतेंय.”

“ बरं बरं. ती दिसली कीं येईन तुला सांगायला. ”

विमला यावर कांहीं बोलली नाहीं. ती कांहीं वेळ उगीच राहिली होती. एक मोठा सुस्कारा सोडून ती शांतपणें म्हणाली, “ खरंच तें, नवऱ्यापासून आपण दुरावेन हें अजून तुला पटत नाहीं. पण दादा त्यांतला माणूस नव्हे. तो आजारी होता इथं, त्यावेळीं त्याची ओळख पटलीय मला. त्याच्या हृदयाचं दार एकदां बंद झालं तर तें पुन: उघडणं अशक्य होईल. ”

आतां इंदुची मुद्रा गंभीर झाली ती म्हणाली, “ उघडं नसलं तर बाहेरच राहीन. उघडायला सांगायसाठीं त्यांचे पाय धरायला जायची नाहीं, कीं शिफारस करण्यासाठीं तुलाही हांक मारायची नाहीं !—हें काय ? रागावून चाललीस वाटतं ? ”

विमला थांबली आणि म्हणाली, “ रागावून नव्हे—वाईट वाटून ! वहिनी, बहिणीपेक्षांही तुझा लोभ वाटतो मला, म्हणून माझा जीव असा कासावीस होतोय. प्रत्यक्ष मी कानांनीं ऐकलं नसतं, तर दादा केव्हां असं कांहीं बोलेल असं मला खरंच वाटलं नसतं. ”

मधेंच हंसून इंदू म्हणाली, “ त्यांच्या तोंडचं असलं व्याख्यान कधीं ऐकलं नव्हतंस वाटतं ? ”

“ अन् तूंसुद्धां कांहीं कमी व्याख्यान दिलं नाहींस वहिनी ! पण यानंतर मात्र तो असं कांहीं करील असं मला वाटत नाहीं. एकच गोष्ट शंभरदां बोलून दाखवणारा माणूस तो नव्हे. ”

पुन: हंसून इंदू म्हणाली, " खरं ग तें—तरी पण आणखीही एक मोठं कारण झालंय. यापुढं स्वप्नांतसुद्धां माझ्यावर डोळे वटारायची त्यांची छाती व्हायची नाहीं. माझ्या बाबांचं पत्र आलंय. त्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत दहा हजार रुपये माझ्या नांवें ठेवलेयत. आतां सांग वन्सं, अजूनही त्यांचे पाय मी धरले पाहिजेत असं वाटतं का तुला ?"

विमलेची मुद्रा जास्तच काळवंडून गेली. ती म्हणाली, " यापूर्वी तरी त्यानं कुठं तुझ्यावर डोळे वटारले होते वहिनी ? तूं कशा प्रकारें मेदिनीपुरला गेलीस तें मला कळलंय—तरीसुद्धां एकाही शब्दानं त्यानं तुला नांव ठेवलं नाहीं. हंसतमुखानं त्यानं माझ्याकडे तुझ्या दोषांवर पांघरूण घातलं—तें काय तुझ्या पैशाच्या लोभानं ? वहिनी, श्रद्धा असल्याशिवाय प्रेम टिकत नाहीं. अभिमानाच्या भरीला पडून हेटाळणीनं जी वस्तु तूं हरवूं पाहते आहेस, ती खरोखरच हरवली म्हणजे तुला तिची किंमत कळून येईल. माझं एवढंच सांगणं ध्यानांत ठेव वहिनी, माझा दादा असा अधम नाहीं ! पुरे झालं. संध्याकाळ झाली. आतां मी जातें. उद्यांपरवां सवड झाली. तर एकदां ये आमच्याकडे."

" ठीक आहे. " असें म्हणून इंदू तिच्याबरोबर सदर दरवाजापर्यंत आली. ती मागोमाग येत होती याची विमलेनें मुळींच दखलगिरी घेतली नाहीं, तें तिच्या ध्यानीं आलें. आजपर्यंत गाडींत बसल्याबरोबर या दोघी मैत्रिणी एकमेकींकडे डोकावून पहात, एकमेकींना आमंत्रणें देत, हंसत हंसत गाडीचा दरवाजा बंद करीत—पण आज गाडींत पाऊल ठेवतांच विमलेनें गाडीचें दार एकदम बंद करून घेतलें.

घरांत येतांच इंदूनें कमलेला ओढून आपल्या जवळ घेतलें आणि ती बिछान्यावर आडवी झाली.

विमला निघून गेली—पण तिच्या कठोर शब्दांनीं दिलेले डाग मात्र गेले नाहींत. त्या डागांचा भडका कसा होता याची इंदूला आतां कल्पना आली. त्या भडक्यामुळें तिच्या अभिमानाचा गगनभेदी हिमालय जसाजसा वितळूं लागला, तसतशी तिला एकामागून एक नवीनवी दृष्टि येऊं लागली. इतकी चिखलमाती, इतका केरकचरा, सहज बोचणारे इतके कठीण दगडधोंडे, त्या वितळणाऱ्या बर्फाखालीं कसे झांकले गेले होते याची अजून तिला कल्पनाही आली नव्हती. तिच्या अंतरंगांतून कुणीतरी तिला प्रश्न करीत होतें, ' त्यानं

जर तुला टाकलं इंदू, तर काय होईल ? तूं जवळ गेलीस आणि त्यानं शिसारून तोंड फिरवलं—तर ? '

तिच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला.

कमला म्हणाली, " काय झालं आई ! "

तिला हृदयाशीं घट्ट कवटाळून घेऊन तिचा मुका घेऊन इंदु म्हणाली, " तुझ्या आत्त्यानं मोठी भीति दाखवली मला. "

" कसली भीति आई ! "

तिचा आणखी एक मुका घेऊन इंदु म्हणाली, " कांहीं नाहीं बाळ. सारं खोटं—सारं खोटं ! जा बरं बाळ, पहा पाहूं तुझे बाबा काय करताहेत तें ! "

मुलगी पळतच गेली.

आज दोन दिवस नवराबायकोंत अबोला आला होता.

कमला आली आणि म्हणाली, " बाबा उगीच आडवे पडले आहेत. "

" उगीच ! थांब अं. तूं इथंच निजून रहा. मी पाहून येतें." असें म्हणून इंदु स्वतःच निघाली. पडद्याच्या फटींतून तिनें पाहिलें,—खरंच तर! वर डोळे लावून तो कोचावर निजला होता. चार पांच मिनिटें उभें राहून त्याच्याकडे पाहिल्यावर इंदु परत आली. आंत जायचा तिला धीर झाला नाहीं. तिचें तिलाच आश्चर्य वाटलें.

" कमला ! "

" काय आई ! "

" तुझ्या बाबांचं डोकं दुखतंय वाटतं. जा बाळ, बसल्या बसल्या त्यांच्या डोक्यावरून जरा हात फिरव जा. "

तिनें मुलीला त्याच्याकडे पाठवून दिली. स्वतः आड राहून ती कान देऊन दोघांचें भाषण ऐकूं लागली.

मुलीनें विचारलें, " तुमचं डोकं का दुखतंय बाबा ? "

बापानें उत्तर दिलें, " छट् ! कोण म्हणतो दुखतंय म्हणून ? "

मुलीनें पुनः विचारलें, " आई म्हणाली, खूप डोकं दुखतंय म्हणून. "

कांहीं वेळ मुलीच्या तोंडाकडे पाहिल्यावर बाप म्हणाला, " तुझ्या आईला कांहीं कळत नाहीं. "

पडदा दूर करून इंदू अगदीं सहज आंत आली. टेबलावरचा दिवा बारिक करून ती म्हणाली, " अशी थकलेली प्रकृति,—श्रम कसे सोसतील !

जा पाहूं बाळ कमल, त्या खोलींतली कोलनवाटरची बाटली घेऊन ये अन् रामटहलला म्हणावं, थोडा बर्फ घेऊन ये बाजारांतून."

मुलीला घालवून देऊन इंदू त्याच्या उशापाशीं येऊन बसली. त्याच्या केसांतून हात फिरवीत ती म्हणाली, "आग उठलीय जशी कांहीं !"

नरेंद्र डोळे झांकून पडला होता. तो कांहीं बोलला नाहीं. इंदू मुकाट्यानें त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत असतांना हळूच खालीं वांकून म्हणाली, "आज छातींतली दुःखी कशी आहे ?"

"तशीच."

"मग ? आजारी असतांना औषध घेतलं नाहीं—दुखणं वाढलं तर काय होईल ?"

डोळे उघडून तिच्याकडे पाहून नरेंद्र थकल्या आवाजांत उद्गारला, "मला बरं वाटत नाहीं—मला जरा स्वस्थ पडूं दे इंदू."

या प्रश्नाचें हें उत्तर !

इंदू ताड्कन् उठून उभी राहिली आणि म्हणाली, "मग पडा तर. झक् मारली न् तुमच्या खोलींत आलें."

दरवाजापाशीं थांबून ती म्हणाली, "असं जिवावर उदार होऊन मला शिक्षा देऊं पहातां—पण तें व्हायचं नाहीं. हें पत्र वाचून पहा, बाबांनीं मला दहा हजार रुपये ठेवलेयत आपल्या मृत्युपत्रांत." असें म्हणून डाव्या हातानें पत्र कोचाकडे फेंकून ती बाहेर येऊन उभी राहिली. ओंठाशीं आलेलें रडूं आवरण्यासाठीं पदराचा बोळा तोंडांत धरून ती आपल्या खोलींत येऊन दार बंद करून बिछान्यावर पडली.

सहन करायला ती कधीं शिकलीच नव्हती—पुष्कळ बायकांना ती खोड आहे—आज मनांत ठरवलेले तिचे सारे संकल्प एकदम फुकट गेले. एक करतांना ती भलतेंच करून बसली.



"हें काय वन्सं ? रडतांहां वाटतं ? डोळे तांबडे लाल झालेयत ?"

अंबिकाबाबूची बायको ऐकत होती आणि विमला बिछान्यावर उपडी पडून एक पुस्तक वाचीत होती.

धडपडत उठून बसून डोळे पुसून ती हंसली आणि म्हणाली, " अं: ! दुर्गामणीची दशा पाहिली कीं काळीज फाटतं वहिनी. "

इंदूनें विचारलें, " कुठली दुर्गामणी ? "

" असं वेड पांघरूं नकोस वहिनी. दुर्गामणी माहित नाहीं तुला ? आज प्रत्येकाच्या तोंडीं तिचं नांव झालंय. "

इंदू कांहीं बोलली नाहीं. कांहींतरी पुस्तकांतली गोष्ट असावी असं तिला वाटलें. हात पुढें करून ती म्हणाली, " पाहूं तें पुस्तक. "

पुस्तक हातीं घेऊन पहातांच वरच तिला ग्रंथकाराचें नांव दिसलें. तिच्या नवऱ्याचें नांव. पहिलेंच पान उलटून पाहिलें—पुस्तक अर्पण केलें होतें विमलेला.

इकडून तिकडून पुस्तक उलटून पालटून तिनें बाजूला ठेवलें. लिहून झालें, छापून झालें, देऊन झालें— पण तिला थांगपत्ता सुद्धां लागूं दिला नाहीं !

तिची मुद्रा पहातांच विमलेला तिला पुढें कांहीं विचारवेना. इंदू स्वतःच म्हणाली, " नाटक नॉव्हेल वाचणं मला आवडत नाहीं—बरंही वाटत नाहीं. कसं का असेना, पुस्तक बरं झालंय हें ऐकून मला आनंद झाला. "

अंबिकाबाबूंचा नोकर येऊन त्याच्या बायकोला उद्देशून म्हणाला, " बाबू विचारताहेत—आज म्युझियम पाहायला जायचं ठरलं होतं—जायचं का ?"

ती नवी नवरी होती—सर्वांपेक्षां लहान होती. लाजून मान खालीं घालून ती हळूच म्हणाली, " नाहीं. अजून प्रकृति तितकीशी बरी झाली नाहीं— आज जायचं नाहीं. "

नोकर निघून गेला तेव्हां इंदू आ वासून नुसती पहात राहिली. असला विलक्षण प्रकार तिनें उभ्या आयुष्यांत कधीं पाहिला नव्हता.

भोला आला आणि विमलेला विचारूं लागला, " आफिसांतून बाबूंकडून माणूस आलाय— त्यांनीं विचारलंय, लिलावांत एक मोठं कपाट मिळतंय— दिवाणखान्यासाठीं घ्यायचं का ? "

विमला म्हणाली, " नाहीं. घ्यायची कांहीं जरूर नाहीं म्हणावं. लहानशी बुक्केस घेतली कीं काम भागेल. "

भोला निघून गेला. अत्यंत आश्चर्यचकित होऊन इंदू नुसती पहात राहिली. विमलेच्या नवऱ्याकडून आलेल्या या निरोपांत मालकीचा दिमाख नव्हता,— आणि या दोन्हीं बायकांनीं दिलेल्या उत्तरांत ' दासी'पणाचा हलकेपणा नव्हता.

तिच्या मनाला ती गोष्ट एक प्रकारें लागून राहिली. या दोघांच्या पुढें आपला दर्जा हलका झाला आहे असें तिला वाटूं लागलें.

ती जायला निघाली त्यावेळीं विमलेनें तिला एके बाजूला घेऊन हळूच विचारलें, " वहिनी, खरं सांग, दादाच्या या पुस्तकाची बातमी खरोखरीच का तुला कळली नव्हती ? "

बेफिकिरपणें इंदू म्हणाली, " नाहीं. असल्या भलत्या उठाठेवी करून मी डोकं पिकवून घेत नाहीं. सारा दिवस बसून कांहीं तरी लिहित असत—कोण कशाला त्याची कदर करतंय ?—बरं—वन्सं, मी उद्यां माहेरी जातेंय. "

उद्विग्न होऊन विमला म्हणाली, " नाहीं वहिनी, जायचं नाहीं ! "

" कां ? "

" कां तें तुला सांगायला का हवं वहिनी ? स्वतःच्या बऱ्याचा किंवा वाईटाचा कोणताही भार दादा तुझ्यावर टाकीत नाहीं, तें तूं स्वतःच पहातेयस ना ? नवऱ्याचं प्रेम हरवून बसतेयस—तें अजून नाहीं का तुला कळत ? "

एकदम रागाला येऊन इंदू म्हणाली, " किती वेळ सांगितलं तुला,—मला जरूर नाहीं—जरूर नाहीं—जरूर नाहीं ! मी माझ्या दादाकडे जाऊन सुखानं राहीन. त्यांनीं मला आणायसाठीं तिकडे येऊं नये अन् उगीच मला त्रासही देऊं नये. "

आतां विमलाही एकदम चिडीला आली. ती म्हणाली, " ही सारी बढाई पुरुष माणसाला सांग ! मी बायको माणूस आहें. माझ्याकडे हें पचायचं नाहीं. तुझं माहेर चांगलं गडगंज आहे—त्यांनीं तुझी चांगली सोय करून ठेवली आहे—त्याचा अभिमान झालाय का तुला ? ठीक ! जायचं असलं तर खुशाल जा–पण ज्यावेळीं डोळे उघडतील, त्यावेळीं हातचं घालवलं तें पृथ्वीमोलाचं होतं असं कळून येईल तुला. वहिनी, फारच थोड्या बायकांना तुझ्यासारखं भाग्य लाभतं. पण तूं जो त्याचा अपव्यय करतेयस—तसाच करीत राहिलीस तर कुबेरालासुद्धां भीक लागेल. मला वाटतं, तें भाग्य गेलंसुद्धां असेल खर्चून."

तें पुस्तक विमलेच्या हातांतच होतें. त्याच्याकडे नजर जातांच इंदूच्या हृदयांत बाण बसल्यासारखें झालें. ती म्हणाली, " तसंच कांहीं असल्याशिवाय कोण कांहीं अभिमान बाळगीत नाहीं. माझा सत्यानाश व्हायचा असला तर होऊं दे. त्यासाठीं वन्सं, तुम्हीं कशाला डोकं पिकवून घेतां ? अन् मी तरी

कशाला ऐकत उभी राहूं ? यापुढं इथं राहायची माझी इच्छा नाहीं. मी रहाणार नाहीं. काय व्हायचं असेल तें होईल. मला कुणाचा सल्ला नको, कीं कुणाशीं झगडाही नको ! ”

विमला उगीच राहिली. तिला काय वाटत होतें तें एक ईश्वरालाच माहीत. पण गोष्टी एवढ्या थराला गेल्यावर तिच्याशीं कांहीं बोलावें असें तिला वाटेना. इंदु जायला निघाली त्यावेळीं तिला थांबवून ती म्हणाली, “ थांब वहिनी, नात्यानं तूं मला वडील आहेस—एकदां नमस्कार करूं दे तुला ! ”

## ९

त्या दिवशीं संध्याकाळीं आकाशांत ढग जमून आले होते. पाऊस पडूं लागला होता. मुलीला जवळ घेऊन इंदु बिछान्यावर आडवी पडली होती. आज तिचा धाकटा मेहुणा आला होता. शेजारच्या खोलींतून त्यांची कुजबूज, गडबड, खाणेंपीणें, खेळणें बागडणें—अशा चाललेल्या प्रकारचे ओझरते आवाज जसजसे तिच्या कानीं येऊं लागले होते तसतसा तिचा जीव शरमेनें व्याकुळ होऊं लागला होता.

मेदिनीपुरला येऊन तिला आतां तीन महिने झाले होते. तिची धाकटी बहीणही आतां आली होती. ती आल्यापासूनच्या दोन महिन्यांत शांतीपुराहून तिचा नवरा कमींत कमी पांच सहा वेळ तरी येऊन गेला होता. नरेंद्र एकदां सुद्धां आला नाहीं, कीं त्यानें एक बोटभर पत्रही पाठवलें नाहीं.

ही गोष्ट सर्वांच्याच ध्यानीं आली होती आणि सारेच त्याबद्दल चर्चा करीत होते. धाकट्या मेहुण्याच्या समोर ही गोष्ट कुणी काढील या भीतीनें इंदु मधूनच निघून आपल्या खोलींत आली होती.

तिचा नवरा तिची चौकशी करीत नव्हता !—या त्याच्या हेटाळणीमुळें होणाऱ्या वेदना किती भयंकर होत्या तें इंदूचें इंदूलाच माहीत. तें जाऊंदे ! पण चारचौघांत ती गोष्ट किती शरमेची होऊन बसली होती याची कल्पना यापूर्वी तिला कधींच झाली नव्हती. भ्रूणहत्त्या, नरहत्येप्रमाणेंच ही चोरून ठेवायची गोष्ट होती. आपल्या नवऱ्याचें आपल्यावर प्रेम नाहीं हें उघड-उघड कबूल करणें मरणप्राय होतें.

आजवर नवऱ्याच्या खोलींत, नवऱ्याच्या शेजारीं बसून, ओढून ताणून, त्याला टाकून बोलून स्वतःचा बडेजाव वाढवून घेण्यांतच तिनें आपली शक्ति खर्ची घातली होती. आतां ती दुसऱ्याच्या घरीं होती—नजरेआड जें कांहीं भंगून कोसळून पडलें होतें, तें आतां कसें उभें राहाणार होतें ?

तिचा मेहुणा आल्यापासून जो कुणी तिच्याकडे पाही त्याला तिची दया येई. कमलेला कुणी तिच्या बापाबद्दल विचारलें तर इंदूच्या हृदयाला बाण लागे. घरीं केव्हां जाणार असा प्रश्न केला तर लाजेनें मरायला होई.

इकडे यायच्यापूर्वी ती नवऱ्याला तोडून टाकून बोलली होती—बायको पोसायचें सामर्थ्य आलें, कीं आपल्याला बोलवायला या—असें तिनें त्याला सांगितलें होतें.

आज एकाएकीं तिचा तो भ्रम दूर झाला. ती म्हणाली, " कमल, कां रडतेस ग ? "

कमला स्फुंदत म्हणाली, " बाबांची आठवण येतेय—कसंसंच वाटतंय ! "

हृदयावर कुणीतरी घणाचे घाव मारल्यासारखें तिला वाटलें. ऊर भरून येऊन तिनें मुलीला हृदयाशीं कडकडून कवटाळलें आणि ती फुलून फुलून रडूं लागली. बाहेर पाऊस पडत होता म्हणूनच तिची अब्रू बचावली. हा तिच्या रडण्याचा आवाज तिच्या मुलीखेरीज दुसऱ्या कुणी ऐकला नाहीं.

इंदूच्या आईनें शिकवलें होतें कीं काय कोण जाणे, दुसऱ्या दिवसापासून कमला बापाजवळ जायचा हट्ट घेऊन बसली. पहिल्यानें इंदूनें आदळआपट करून पाहिलें—शेवटीं दादाकडे येऊन ती म्हणाली, " कमला कांहीं ऐकत नाहीं. कलकत्याला जायचं म्हणते. "

दादा म्हणाला, " एवढा वेळ वाट कां पाहिलीस ताई ? उद्यां सकाळींच तिला घेऊन जा. कसा काय आहे नरेंद्र ? तो कांहीं मला पत्र पाठवीत नाहीं. तुला लिहीलंय ना त्यानं. "

मान खालीं घालून इंदु म्हणाली, " हो. "

" खुशाल आहे ना ? "

इंदूनें तसेंच उत्तर दिलें, " खुशाल आहे. "

विमला आश्चर्यचकित झाली. " केव्हां आलीस वहिनी ? "

" ही आतांच ! "

गाडींतून इंदूची ट्रंक घेऊन नोकर आंत आला. मनाला जें काय वाटत होतें तें बाहेर दिसूं न देतां विमला म्हणाली, " घरीं गेली नाहींस ? "

" नाहीं. कमलला तिथं उतरून टाकली नि मी इकडे आलें. तिच्यासाठीं यावं लागलं—नाहीं तर आलें नसतें. "

एक सुस्कारा सोडून विमला म्हणाली, " आली नसतीस तर बरं झालं असतं वहिनी. आतां तुला तिथं जागा नाहीं. "

इंदूच्या हृदयांत एकदम धडकी भरली ती म्हणाली, " कां वन्सं ? "

गंभीर होऊन विमल म्हणाली, " तें मग सागेन. आधीं हातपाय धुवून कपडे बदलून घे. जें व्हायचं तें होऊन गेलंय—तें आतां ऐकलंस काय नि दोन दिवसांनीं ऐकलंस काय—सारखंच. "

इंदुनें बसकण मारली. तिचा चेहरा काळानिळा झाला होता. ती म्हणाली, " तें चालायचं नाहीं वन्सं ! काय झालंय तें कळल्याशिवाय मी पाण्याचा थेंबसुद्धां तोंडांत घालायची नाहीं. त्यांना मी पाहिलं—ते आहेत हें कळलं—मग मला तिथं जायला जागा नाहीं असं कां म्हणतेस ? "

क्षणभर थांबून एक मोठा सुस्कारा सोडून ती म्हणाली, " खरोखरच त्या घरीं आतां तुला जागा नाहीं. आतां तुझ्यालेखीं इथं रहाणं नि माहेरी रहाणं दोन्हींही सारखींच. त्या घरीं मात्र तुला जातां यायचं नाहीं. "

येत असलेलें रडें आंवरून इंदू म्हणाली, " आतां माझ्यानं नाहीं रहावत. वन्सं, काय झालंय ते मला एकदांच सांगून टाका. लग्न केलंय का त्यांनीं ? "

" असं वाटतं तुला ? "

" नाहीं—मुळींच नाहीं. माझा गुन्हा केवढाही झालेला असो—पण त्यांच्या हातून खास तसं कांहीं व्हायचं नाहीं. तरीपण मला तिथं जागा नाहीं कां ? तें कां सांगत नाहींस ? " बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून आसवांची झरणी सुरू झाली.

विमलेचेही डोळे ओलावले पण पाझरले नाहींत. ती म्हणाली, " वहिनी, तुला कसं सांगावं याचीच मला पंचाईत पडली आहे.—शंभूबाबूनं दादाला तुरुंगात घातलं होतं.—"

इंदुच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला.

" मग पुढं ? "

विमला म्हणाली, " आम्हीं तेव्हां काशीला होतों. पैशाची तजवीज करण्यासाठीं शंभूबाबूनं दोन दिवसांची मुदत दिली होती. चार हजार रुपये तितक्यांत उभे करणं कांहीं जमलं नाहीं. दादाला पकडून नेल्यावर भोला काशीला आमच्याकडे आला. पण तितक्यांत आम्ही प्रयागला गेलों होतों. तो येत होता—जात होता—पुन्हां येत होता—अशा प्रकारें दहा दिवस फुकट गेले. त्यानंतर मी आलें. माझ्याकडे रोख पैसा नव्हता. दागिने गहाण ठेवून पैसे उभे केले आणि अकराव्या दिवशीं दादाला सोडवून घेऊन आलें. तुझ्या अंगावर चार पांच हजारांचे दागिने आहेत, मेदीनीपुरही कांहीं दूर नाहीं, तुला कळवलं असतं तर हें संकट आलं नसतं ! दहा दिवस तुरुंगांत राहिला पण दादानं तुझ्याकडे कांहीं हात पसरला नाहीं ! कळलं ना ? आतां कशाला जाणार आहेस त्याच्याकडे ? आजवर खूप सुख दिलंस त्याला ! पुरे झालं. आतां एकदां त्याला मोकळा कर. तो सुखी होईल अन् तूंही सुखी होशील ! "

मान खालीं घालून इंदू बराच वेळ बसून राहिली होती. त्यानंतर तिनें अंगावरचा एकेक दागिना काढून सारे दागिने विमलेच्या पायाजवळ ठेवले आणि म्हटलें, " हे दागिने घ्या वन्सं, आणखी तुमचे दागिने सोडवून आणा. मी निघालें त्यांच्याकडे. तुम्हीं म्हणतां, मला तिथं जागा नाहीं--पण मी म्हणतें, कधीं मला त्यांच्याकडे जागा मिळायची असेल तर ती याचवेळीं. आजवर मी त्यांच्यापासून ज्यामुळं दुरावलें होतें, तें हें माझं वैभव तुझ्या पायाशीं फेंकून मी माझी जागा घ्यायला चाललें. उद्यां एकदां ये ताई. एकदां तुझ्या दादाला आणि वहिनीला भेटून जा. मी चाललें. " असें म्हणून गाडीची सुद्धां वाट न पहातां ती एकदम चालती झाली.

" अरे भोला, जा तिच्याबरोबर ! " असें म्हणून विमला डोळे पुशीत पुशीत तिच्या मागोमाग येऊन दरवाजांत उभी राहिली.



# हेमांगिनी

## ( मेजोदिदि )

## १

कृष्णाच्या आईनें चणेकुरमुरे भाजून पोट भरीत, हालअपेष्टांत दिवस काढीत, कृष्णाला चवदा वर्षांपर्यंत वाढवलें. त्यानंतर ती मरून गेली. बिचाऱ्याला डोकें टेंकायला साऱ्या गांवांत जागा राहिली नाहीं. त्याची सावत्र बहिण कादंबिनी हिची गृहस्थिति चांगली होती. सर्वांनीं सांगितलें, " जा रे कृष्णा, आपल्या आक्काच्या घरीं जाऊन रहा. ती मोठी माणूस आहे. बरं चालेल तिथं तुझं. जा. "

आईच्या मृत्युमुळें रडूनकढून दिवस काढल्यामुळें कृष्णाला ताप आला. बरा झाला तेव्हां त्यानें भिक्षा मागून श्राद्ध केलें. त्यानंतर तो उघड्या डोक्यानें एक छोटें बोचकें हातीं घेऊन राजहाट गांवीं आक्काच्या घरीं येऊन उपस्थित झाला.

त्याच्या आक्कानें यापूर्वी त्याला पाहिलें नव्हतें. त्यानें ओळख दिली आणि येण्याचा उद्देश सांगितला तेव्हां ती एकदम भडकून उठली. आपल्या परीनें मुलेंबाळें घेऊन ती घरसंसार थाटून बसली होती—अकस्मात हें काय संकट ! गांवचा जो म्हातारा कृष्णाला वाट दाखवायला त्याच्याबरोबर आला होता त्याला कादंबिनीनें चार चांगले करडे बोल सुनावले आणि म्हटलें, " बरा मावशीच्या पोराला आणलात इथं भात भकणायला !—" सावत्र आईला उद्देशून ती म्हणाली, "—मेली हलकट बया—जिवंत असतांना एक दिवस एका शब्दानं माझी चौकशीसुद्धां केली नाहीं अन् आतां मेली तेव्हां माझ्या

गळ्यांत बांधायला आपलं पोर पाठवून दिलं. परक्याचं मूल. तुम्हीं कशाला आणलंत बाबा ! आणलंत याला तसे घेऊन जा. हा असला झंजाट गळ्यांत बांधून घ्यायची मला ताकद नाहीं."

म्हातारा जातीचा न्हावी होता. कृष्णाच्या आईवर त्याची फार श्रद्धा होती. तो तिला 'आई' म्हणून हांक मारीत असे. म्हणूनच तें सारें कुजकें भाषण त्यानें ऐकून घेतलें. काकुळती विनवणी करीत तो म्हणाला, "हें पहा आक्कासाहेब, तुमच्या घरीं लक्ष्मीचं भांडार आहे. किती दासदासी, गोसावी बैरागी, कुत्रेमांजरं, तुमच्या घरचं अन्न खाऊन वाढलीं आहेत. एवढंसं पोर हें—दोन घांस खाऊन पडून राहिलं तर कुणाला कळायचंसुद्धां नाहीं. मुलगा अगदीं भोळाभाबडा आहे बरं आक्का. भाऊ म्हणून नव्हे — पण संकटांत पडलेलं एक ब्राह्मणाचं मूल म्हणून घराच्या एकाद्या कोंपऱ्यांत त्याला आसरा द्या."

स्तुति केली तर पोलिसचा फौजदार देखील वितळतो, मग कादंबिनी तर एक बायको माणूस. तेवढ्या वेळापुरती ती उगी राहिली. म्हाताऱ्यानें कृष्णाला बाजूला घेतलें, कसें वागावें याबद्दल चार शब्द सांगितले आणि डोळे पुशीत तो निघून गेला.

कृष्णाला आसरा मिळाला. कादंबिनीचा नवरा नवीन मुखर्जी याचें डाळ-तांदळाचें दुकान होतें. बारा वाजतां तो घरीं आला तेव्हां वांकड्या नजरेनें कृष्णाकडे पाहून त्यानें विचारलें, "कोण हा ?"

एवढं लांब तोंड करून कादंबिनी म्हणाली, "तुमचा मेहुणा हो, तुमचा मेहुणा. घ्या त्याला ताब्यांत. खायला प्यायला घाला—लहानाचा मोटा करा—स्वर्गांत तुमची कीर्ती होईल."

सावत्र सासू मेल्याचें नवीनला कळलें होतें. सारा प्रकार त्याच्या ध्यानीं आला. तो म्हणाला, "असं का ! बरा लठ्ठ गुटगुटीत दिसतो."

बायको म्हणाली, "कां गुटगुटीत असायचा नाहीं ? माझ्या बापानं मरतांना जें कांहीं ठेवलं होतं तें सारं त्या बयेनं रिचवलंय ना याच्या पोटांत ? मला त्यांतली एक कवडीसुद्धां काहीं मिळाली नाहीं !" हें 'सारं कांहीं' म्हणजे एक दगडमातीचें घर आणि दारांत असलेलें एक लिंबाचें झाड एवढेंच होतें. बिचारी विधवा घरांत नुसती छपराखालीं राही आणि लिंबाचीं लिंबें विकून मुलाच्या शाळेची फी भरी.

राग गिळून नवीन म्हणाला, " फार उत्तम."

कादंबिनी म्हणाली, " उत्तमच तर काय ! अहो तुमचा पाहुणा आहे तो ! तशाच मानानं वागवलं पाहिजे त्याला. माझ्या पोराबाळांच्या नशिबीं सकाळीं असलं अन् संध्याकाळीं नसलं तरी चालेल पण याचं कांहीं चुकलं तर जगभर अपकीर्ति होईल. "—असें म्हणून उघड्या खिडकींतून शेजारच्या घरांतून दिसणाऱ्या दुमजली घराकडे तिनें आपली जळजळती नजर फेंकली. ' सारें जग ' म्हणजे हेंच तें—तिची जाऊ हेमांगिनी हिचें घर.

बिचारा कृष्णा ओटीच्या एका कोंपऱ्याला बसून खालीं मान घालून विचार करीत होता. त्याला मरणप्राय दुःख झालें होतें. कादंबिनी कोठींत गेली आणि नारळाच्या करवंटींतून तेल आणून त्याच्या हातीं देऊन म्हणाली, " आतां हें रडायचं ढोंग पुरे झालं बाबा. जा. तळयावर जाऊन दोन बुचकळ्या मारून ये. फुलेलबिलेल डोक्यावर घालायची संवय तर नाहीं ना तुला ?—" नवऱ्याला उद्देशून ती ओरडून म्हणाली, "—आंघोळीला जाल त्यावेळीं या बाबूंना बरोबर घेऊन जा हो !—बुडून मेला कदाचित तर घरच्या साऱ्या माणसांच्या हातांत हातकड्या पडतील. "

कृष्णा जेवायला बसला. रोज त्याला भात थोडा जास्त लागे. काल दुपार-पासून तो जेवला नव्हता, आज एवढी मजल पायीं पायीं चालत आलेला—दुपारही उलटून गेली होती—पानांत वाढलेला भात पहातांपहातां संपून गेला तरी त्याची भूक निवाली नाहीं. नवीन जवळच जेवायला बसला होता. त्याच्या तें लक्षांत आलें तेव्हां तो बायकोला म्हणाला, " कृष्णाला थोडा भात वाढ ना ग. "

" वाढतें ! " असें म्हणून कादंबिनी आंत जाऊन एक थाळीभर भात घेऊन आली आणि सारा भात त्याच्या पानांत ओतून मोठ्यानें हंसून म्हणाली, " आतां तरी पुरेल ? हें हत्तीचं पिलूं पोसतांपोसतां आमचं दुकान खालीं होणारसं दिसतंय. आतां गेलां दुकानीं, कीं एक मण जाडे तांदूळ पाठवून द्या. नाहींतर दिवाळं वाजायची पाळी येईल—सांगून ठेवलेंय ! "

कृष्णाला मरणांतिक दुःख झालें. तो आईचा एकुलता एक मुलगा होता. बिचाऱ्या आईच्या प्रपंचांत बारके तांदूळ मिळत होते कीं नाहीं तें सांगतां आलें नसतें, पण पोटभर भात खायच्या अपराधापायीं लाजेनें मान खालीं

घालायचा प्रसंग यापूर्वी त्याला आला नव्हता. केव्हांही जास्त जेवलें तरी आईचें समाधान होत नसे, याची त्याला आठवण झाली. पैज लावून पैसे मिळवण्यापायीं एकदां त्यानें भातावर चांगला ताव मारला होता त्याचीही त्याला आठवण झाली.

त्याच्या डोळयाच्या कोंपऱ्यांतून एवढालीं मोठीं टिपें भाताच्या थाळीवर टपाटप गळत होतीं. मान खालीं घालून तो भाताचे घास तोंडीं घालीत होता. डाव्या हातानें डोळे पुसण्याइतकासुद्धां धीर त्याला होत नव्हता. आक्कानें पाहिलें तर ! जातांजातां नुकतीच त्याला रडण्याबद्दल जरब मिळाली होती. मातृवियोगाचें दुःखसुद्धां त्या जरबेखालीं दडपून गेलें होतें.

## २

वडिलोपार्जित घर दोन्ही भावांनीं वांटून घेतलें होतें. शेजारचें दुमजली घर मधला भाऊ विपिन याच्या वांट्याला आलें होतें. बऱ्याच दिवसांपूर्वी धाकटा भाऊ मरून गेला होता.

विपिनचें देखील किराणामालाचेंच दुकान होतें. त्याची सुस्थिति असली तरी वडिल भाऊ नवीन, याच्याइतका तो संपन्न नव्हता. तरीपण त्याचें घर दुमजली होतें. त्याची बायको हेमांगिनी शहरांत वाढलेली होती. नोकरचाकर बाळगून घरीं चार पाहुण्यारावळ्यांना खायला घालीत, ती थोड्याशा थाटमाटांत रहात असे. पैसा सांठवायचा असला म्हणजे असली रहाणी पटत नाहीं, त्यामुळें गेल्या चार वर्षांपूर्वी दोन्ही जावांचें भांडण होऊन दोघे भाऊ विभक्त झाले. तेव्हांपासून बऱ्याच वेळां उघड भांडणें झालीं, बऱ्याच वेळां तीं मिटलीं, पण उभयतांच्या मनांत उत्पन्न झालेला बिघाड कांहीं नाहींसा झाला नाहीं.

पण याला कारण होती ती एकटी मोठी जाऊ कादंबिनीच. ती मोठी पक्की होती. फुटलेलें भांडें सांधत नाहीं हें तिला माहीत होतें. पण मधली जाऊ इतकी पक्की नव्हती. तिच्या ध्यानांत कांहीं तें आलें नाहीं. पहिल्यानें भांडण तिच्याकडूनच सुरू होत असे खरें पण तें मिटवण्यासाठीं, पुनः बोलण्यासाठीं, पुनः जेवणखाण सुरू करण्यासाठीं, तिचा जीव खालींवर होई आणि तीच आपण होऊन पुनः वडिल जाऊजवळ येऊन बसे. शेवटीं हातींपायीं पडून,

रडून ओरडून शपथा घेऊन मोठ्या जावेला स्वतःच्या घरीं घेऊन जाऊन समजूत घाली.

अशा प्रकारें दोन्ही जावांचा संसार बरेच दिवस चालला होता. आज तीन साडेतीन वाजायच्या सुमाराला हेमांगिनी या घरीं आली. विहिरीच्या जवळच्या सिमीटाच्या डोणीवर बसून भर उन्हांत तापत कृष्णा बरेचसे कपडे साबण लावून धूत होता. जवळच उभी राहून कादंबिनी त्याला कसें धुवावें तें शिकवीत होती. थोडासा साबण आणि बराचसा मनगटांतला जोर, कपडे धुण्यासाठीं कसा खर्ची घालायचा तें ती त्याला दाखवीत होती. जाऊ आलेली पहातांच ती एकदम उद्गारली. "अग आई ग, पोरानं कसले गलिच्छ कपडे आणले होते हे!"

तें खरें होतें. तांबड्या कांठाचें धोतर नेसून, कांठाचें उपरणें अंगावर घेऊन कृष्णा मेहुण्याच्या घरीं आला नव्हता. त्याचीं दोन्हींही वस्त्रें धुतलीं पाहिजे होतीं खरीं—पण त्याहीपेक्षां पांचुगोपाळचें आणि त्याच्या बापाचें धोतर-उपरणें परटाच्या अभावीं धुऊन घेणें अवश्य होतें. कृष्णा त्यावेळीं जें काम करीत होता तें हें.

नजर टाकतांच कपडे कुणाचे होते तें हेमांगिनीनें ओळखलें पण त्याचा उल्लेख न करतां तिनें विचारलें, "हा कोण मुलगा जाऊबाई?"

आड राहून तिनें सारी हकिकत यापूर्वी आपल्या घरांतून ऐकली होती. जाऊ उत्तर द्यायचें टाळते आहे असें पाहून तिनें पुनः विचारलें, "छान दिसतो मुलगा. चेहरा अगदीं तुमच्याचसारखा दिसतो जाऊबाई! कुणी माहेरचा आहे वाटतं?"

कादंबिनीला राग आला होता. तरीही ती गंभीर चेहरा करून म्हणाली, "हो, माझा सावत्र भाऊ. अरे कृष्णा, या तुझ्या ताईला प्रणाम कर ना रे! काय तरी गांवढळ मुलगा हा! वडिलांना नमस्कार केला पाहिजे एवढंसुद्धां त्या बयेनं—त्या तुझ्या आईनं मरायच्यापूर्वी तुला शिकवलं नाहीं वाटतं?"

कृष्णा कावराबावरा झाला. त्यानें येऊन कादंबिनीलाच नमस्कार केला तेव्हां त्याला धमकावून ती म्हणाली, "आतां काय मेल्याला सांगावं? कुणाला नमस्कार करतोयस?"

आल्या घटकेपासून त्याला जी भाषा ऐकावी लागत होती, अपमानाचे जे फटके खावे लागत होते, त्यामुळें त्याचें माथें बिघडून गेलें होतें.

आतां शुद्धीवर येऊन—पुनः कावराबावरा होऊन त्यानें हेमांगिनीजवळ येऊन नमस्कार करण्यासाठीं मान वांकवली, तोंच तिनें त्याचा हात धरला, त्याच्या हनुवटीला हात लावला आणि आशीर्वाद दिला, "राहुंदे राहुंदे. पोंचला बरं नमस्कार. चिरंजीव हो!"

कृष्णा वेडयासारखा तिच्या तोंडाकडे पहात राहिला. असली भाषा बोलणारीं माणसें या गावांत असतील याची त्याला कल्पनासुद्धां नव्हती.

त्याची ती बिचकती, घाबरती, थरथरती, असहाय मुद्रा पाहून हेमांगिनीच्या काळजाला पीळ पडला. तिला एकदम रडूं कोसळलें. मन आवरणें अशक्य झाल्यामुळें त्या हतभागी अनाथ मुलाला तिनें आपल्या हृदयाशीं कवटाळलें. थकून भागून घामाघूम झालेला त्याचा चेहरा तिनें आपल्या पदरानें पुसला आणि आपल्या जावेला म्हटलें, "हें काय? याच्याकडनं का कपडे धुवून घ्यायचे जाऊबाई? नोकराला कां नाहीं सांगितलंत?"

कादंबिनीची एकदम दांतखीळ बसली. तिच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. लगेच भानावर येऊन ती रागारागानें म्हणाली, "दहावीस नोकरचाकर ठेवायला मी तुझ्यासारखी बडी माणूस का आहें? आमचं गृहस्थाचं घर—"

तिचें वाक्य पुरें होण्याच्या पूर्वींच हेमांगिनीनें आपल्या घराकडे पाहून मुलीला हांक मारली, "उमा, शिवाला इकडे या घरीं पाठवून दे बरं बाळ. मोठे भावजी अन् पांचूचे हे कपडे तळयावरून धुऊन आणून वाळत टाक म्हणावं!—" जावेकडे पाहून ती म्हणाली, "—आतां कृष्णा आणि पांचू-गोपाळ दोघांनाही जेवायला येऊं दे माझ्याकडे. पांचू शाळेंतून आला, कीं त्याला पाठवून द्या—तोंवर मी याला घेऊन जातें." ती कृष्णाला म्हणाली, "—मी देखील हिच्यासारखीच तुझी बहीण बरं. ही अक्का—मी ताई! चल माझ्याबरोबर—" असें म्हणून त्याचा हात धरून ती त्याला आपल्या घरीं घेऊन गेली.

कादंबिनीनें नको म्हटलें नाहीं—एवढेंच नव्हे, तर हेमांगिनीनें हाणलेला एवढा मोठा टोला तिनें मुकाट्यानें सहन केला. जिनें हा टोला हाणला तिनेंच या बाबतींतला खर्चाचा बोजा उचलला होता म्हणूनच तिनें तें सहन केलें. या जगांत कादंबिनीला पैशापलीकडे दुसरें कांहीं मोठें वाटत नसे, म्हणूनच दूध देण्याऱ्या गाईनें लाथ मारली तरी ती सहन करी.

# ३

संध्याकाळच्या वेळीं कादंबिनीनें विचारलें, " काय खाऊन आलास रे कृष्णा ? "

लाजून मान खालीं घालून कृष्णा म्हणाला, " पुऱ्या. "

" बरोबर काय होतं ? "

कृष्णा तसाच म्हणाला, " रांवशीची आमटी, संदेश, रसगुल्ला—"

" इश्श ! अगबाई ! कुणाच्या पानांत वाढले रे तिनं हे जिन्नस ? "

या विलक्षण प्रश्नामुळें कृष्णाचा चेहरा गोरामोरा झाला. दोरीनें बांधलेल्या जनावराला मारायला काढलें म्हणजे त्याची जशी स्थिति होते त्याचप्रमाणें कृष्णाच्या काळजांत कालवाकालव सुरू झाली. तो उत्तर देत नाहीं असें पाहून कादंबिनीनें पुनः विचारलें, " तुझ्याच पानांत वाटतं ? "

एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें कृष्णानें मान खालीं घातली. जवळच बसून नवीन गुडगुडी ओढीत होता त्याला उद्देशून कादंबिनी म्हणाली, " म्हटलं ऐकलं का ? "

नुसतें ' हुं ' म्हणून त्यानें गुडगुडीचा आणखी एक दम मारला.

कादंबिनी उबळून येऊन म्हणाली, " मेली आपली म्हणून म्हणायची पण लक्षण तर पहा ! माझ्या पांचुगोपाळनं जशी कांहीं रांवशी कधीं बघितलीच नाहीं ! त्याच्या पानांत वाढायच्या ऐवजीं या कावळ्यासमोर मोती वाढणाराची अक्कल तर पहा. काय रे कृष्णा, संदेश रसगुल्ले अगदीं पोट भरभरून खाल्लेस ना ? सात जन्मांत कधीं बघितलेच नव्हतेस वाटतं ?—" नवऱ्याकडे वळून ती म्हणाली, "—दोन घांस भात खाल्ला कीं ज्याचं पोट भरतं त्याला ही शिरापुरी कशाला ? पण मी तुम्हांला सांगून ठेवतें, या तुमच्या भावाच्या बायकोनंच या पोराला जर नाहीं बिघडवलं तर कुत्री म्हणा मला ! "

नवीन कांहीं बोलला नाहीं. ही आपली बायको हजर असतां आपली भावजय त्याला बिघडवायला समर्थ होईल असें त्याला कधींच वाटलें नसतें.

पण कादंबिनीचा स्वतःवरच विश्वास नव्हता. नवऱ्याच्या बाबतींतही ती अस्वस्थ असे. कुणीतरी त्याला फसवील म्हणून ती डोळ्यांत तेल घालून

नजर ठेवी. एवढ्याचसाठीं आपला धाकटा भाऊ कृष्णा याच्या मानसिक उन्नति आणि अवनतीकडे करडी नजर राखणें अवश्य आहे असें तिला वाटूं लागलें.

दुसऱ्या दिवसापासून घरच्या दोन नोकरांतल्या एकाला रजा दिली. नवीनच्या किराणा मालाच्या दुकानावर कृष्णा काम करूं लागला. तिथें तो माल वजन करी, विक्री करी, चारपांच कोस पायपीट करीत धान्याचे नमुने घेऊन येई, दुपारच्या वेळीं नवीन घरीं जेवून येईपर्यंत दुकान संभाळी, वामकुक्षी करून तो दुकानावर परत गेला म्हणजे कृष्णा घरीं जेवायला येई त्यावेळीं तीन वाजून जात असत.

तळयावरून आंघोळ करून कृष्णा घरीं आला आणि पहातो तों त्याची आक्का झोंपी गेली होती. भुकेनें त्याच्या पोटांत एवढा मोठा कहर केला होता कीं वाघाच्या तोंडचा घांससुद्धां त्यानें काढून घेतला असता. पण आक्काला हाक मारण्याचें धैर्य कांहीं त्याला झालें नाहीं.

सैंपाकघराच्या चौथऱ्यावर आक्काला जाग केव्हां येते याची वाट पहात तो मुकाट्यानें बसला होता तोंच त्याच्या कानीं हांक आली, " कृष्णा ! "

किती गोड लागली त्याच्या कानाला ती हाक ! त्यानें वर पाहिलें. हेमांगिनी आपल्या घरच्या दुसऱ्या मजल्याच्या खिडकींत उभी होती. त्यानें एकदां तिच्याकडे पाहिलें आणि पुनः मान खालीं घातली. थोड्या वेळानें हेमांगिनी त्याच्यासमोर येऊन उभी राहिली आणि म्हणाली, " किती दिवस दिसला नाहींस रे कुठं ? काय रे कृष्णा, इथं उगी उगी कां बसलायस ? "

आधींच भुकेनें तो रडकुंडीला आला होता—त्यांत ही अशी प्रेमाची हांक —त्याच्या दोन्ही डोळयांतून आसवांच्या धारा सुरू झाल्या. कांहींसुद्धां उत्तर न देतां मान खालीं घालून तो बसून राहिला.

मधल्या काकूवर साऱ्या मुलाबाळांचा मोठा जिव्हाळा होता. तिचा आवाज ऐकतांच कादंबिनीची धाकटी मुलगी धांवतच बाहेर आली आणि कृष्णा तिथें बसलेला पाहून ओरडून म्हणाली, " किशामामा, सैंपाकघरांत तुझं जेवण झांकून ठेवलंय. तूं जेवून घे. जेवणखाण उरकून आई झोंपली आहे. "

थक होऊन हेमांगिनी म्हणाली, " अजून किशा जेवला नाहीं ? तुझी आई जेवून झोंपलीसुद्धां कां ग ? काय रे किशा, एवढा उशीर कां केलास आज ? "

कृष्णा तसाच मान खालीं घालून बसला होता. तिच्या प्रश्नाचें उत्तर टुनीनें दिलें, " किशामामा रोज याचवेळीं येतो कीं जेवायला. जेवूनखाऊन झोप काढून बाबा दुकानीं जातात तेव्हां त्याला येतां येतं ! "

कृष्णाला दुकानच्या कामाला लावल्याचें अशा रीतीनें हेमांगिनीला कळलें. जवळ बसून त्याला जेवायला घालायची गोष्ट दूरच राहो, पण एवढा वेळपर्यंत त्याला उपाशी राहावें लागत असेल असें तिला वाटलें नव्हतें. भुकेतहानेनें व्याकुळ झालेल्या त्या गरीब पोराचा चेहरा पाहून तिच्या डोळ्यांना पाणी आलें. पदरानें डोळे पुशीत पुशीत ती आपल्या घरीं निघून गेली.

थोड्या वेळानें वाटीभर दुध हातीं घेऊन ती सैंपाकघरांत आली—आंत येतांच शहारून तिनें तोंड फिरवलें.

कृष्णा जेवायला बसला होता. एका पितळेच्या थाळींत वाळून गार झालेला भात आणि त्याच्यावर थोडेसें वरण टाकलें होतें. जवळच भाजीसारखें कांहीं तरी होतें.

दूध मिळाल्याबरोबर त्याचें कोमजलेलें तोंड एकदम प्रफुल्लित झालें.

हेमांगिनी दाराच्याबाहेर येऊन उभी राहिली होती. जेवण उरकून कृष्णा आचवायला तळ्यावर गेला त्यावेळीं तिनें आंत डोकावून पाहिलें, थाळींत भाताचें एक शीतसुद्धां शिल्लक नव्हतें. भुकेच्या आगीनें त्यानें होतें नव्हतें तेव्हढें धुऊनपुसून खाऊन टाकलें होतें.

हेमांगिनीचा मुलगा ललित कृष्णाच्याच वयाचा होता. आपल्यामागें आपल्या मुलांची स्थिति अशीच नाहीं ना व्हायची, अशी वेडीबिद्री कल्पना मनांत येऊन तिला एकदम भडभडून आलें. ओठांशीं येणारें रडें दांतओठ खाऊन गिळून टाकीत ती आपल्या घरीं निघून गेली.



सर्दीमुळें हेमांगिनीला मधून मधून ताप येई आणि एक दोन दिवस राहून आपोआप बरा होई. असाच ताप आल्यामुळें एके दिवशी संध्याकाळीं ती बिछान्यावर पडली होती. खोलींत दुसरें कुणी नव्हतें. कुणी तरी आंतून हळूच डोकावून पहात आहे असें सहज तिला वाटलें. तिनें विचारलें, " कोण रे तिथं तो ? ललित का ? "

कुणी उत्तर दिलें नाहीं. तिनें पुनः हटकलें त्यावेळीं दाराआडून उत्तर आलें, " मी ! "

" कोण ' मी ' रे ? ये ना. आंत ये ना. "

घाबरत घाबरत कृष्णा आंत आला आणि भिंतीला टेकून उभा राहिला. हेमांगिनी उठून बसली आणि त्याला हांक मारून जवळ बोलावून म्हणाली, " काय रे कृष्णा ? "

कृष्णा हळूच एकदोन पावलें पुढें आला आणि आपल्या मळक्या धोतराच्या सोग्यांत बांधलेले अर्धवट पिकलेले दोन पेरू बाहेर काढून म्हणाला, " तापाला हे बरे ! " हात पुढें करून हेमांगिनी म्हणाली, " कुठं मिळाले रे ? कालपासून मी किती जणांना किती सांगतेंय पण कुणी कांहीं आणून दिले नाहींत—" असें म्हणून पेरूसकट कृष्णाचा हात धरून त्याला ओढून तिनें जवळ बसवून घेतलें.

कृष्णाचा चेहरा लाजेनें लालीलाल झाला होता. हे पेरूचे दिवस नव्हते. पेरूसाठीं हेमांगिनीही कांहीं उतावीळ झाली नव्हती,—तरीसुद्धां हे दोन पेरू मिळवण्यासाठीं दुपारच्या भर उन्हांतून तो कुठें कुठें फिरला होता कोण जाणे.

हेमांगिनीनें विचारलें, " काय रे किशा, मला ताप आलाय म्हणून कुणी सांगितलं तुला ?—" कृष्णानें उत्तर दिलें नाहीं तेव्हां ती पुढें म्हणाली— " मला पेरू हवे होते ते कसं कळलं रे तुला ? "

त्याही प्रश्नाचें उत्तर त्यानें दिलें नाहीं. एकदां जी त्यानें मान खालीं घातली होती ती वर उचलली नाहीं. मुलगा अगदींच भित्रा, अगदींच लाजाळू असल्याचें हेमांगिनीला यापूर्वीच कळून चुकलें होतें.

तिनें त्याच्या माथ्यावरून हात फिरवला, तोंडावरून हात फिरवला, मोठ्या लडिवाळपणानें ' दादा ' म्हणून हांक मारली—आणखीही किती तरी लाडिकपणा करून त्याची भीति दूर करण्यासाठीं ती सारखी त्याच्याबरोबर किडबिडत बसली.

पेरू कशा रीतीनें मिळवले त्या हकिकतीपासून सुरवात करून, आपल्या गांवची हकिकत, आईची हकिकत, इथली जेवणखाणाची व्यवस्था, दुकानावर काय काय काम करावें लागत होतें त्याची हकिकत—सारी हकिकत ऐकून घेतल्यावर ती डोळे पुसून म्हणाली, " मी तुझी ताई बरं, या ताईपासून कांहीं

लपवून ठेवूं नकोस किशा. जेव्हां तुला कांहीं हवंसं वाटेल तेव्हां गुपचुप येऊन मला सांग अन् घेऊन जा. सांगशील ना ? "

मोठ्या खुषींत येऊन कृष्णा म्हणाला, " ठीक आहे. "

खऱ्या प्रेमाचें लक्षण कसें असतें याचा धडा कृष्णानें आपल्या दुःखी दरिद्री आईकडून घेतला होता, तोच अनुभव या ताईच्या बाबतींत आल्यामुळें आईच्या वियोगाचें आजवर दाबून ठेवलेलें दुःख आज पार धुऊन गेलें. जायच्यावेळीं ताईच्या पायावर डोकें ठेवून तो बाहेर आला आणि वाऱ्यानें हेलावणाऱ्या गवताच्या पातीसारखा तरळत तरळत निघून गेला.

त्याच्या आक्काचा छळ दिवसेंदिवस वाढत चालला होता. सावत्र आईचा मुलगा—निराधार झालेला—तशीच वेळ आली तर घालवून द्यावा असें म्हटलें तर लोकांत निंदा व्हायची—दुसऱ्या कुठेंही त्याला वटावणें शक्य नव्हतें—इथेंच ठेवून घेण्याखेरीज गत्यंतर नाहीं असें पाहून, आहे तोंवर त्याला चांगला राबवून घ्यायचा, असें तिनें ठरवलें.

तो आंत आल्याबरोबर आक्कानें त्याला छेडायला सुरवात केली, " साऱ्या दुपारभर दुकानांतून पळून कुठं गेला होतास रे किशा ? "

कृष्णानें उत्तर दिलें नाहीं. अत्यंत संतापून कादंबिनीनें विचारलें, " बोल लौकर ! "

तरीही कृष्णानें उत्तर दिलें नाहीं. माणूस उगी राहिलें म्हणजे कुणाकुणाचा राग ओसरतो—कादंबिनी अशा माणसातली नव्हती. त्यानें तोंड उघडावें म्हणून जसजशी ती त्याला छेडूं लागली—तो उत्तर देत नाहीं असें पाहून तिचा रागही तसतसा भडकून उठूं लागला. शेवटीं तिनें पांचूगोपाळला हांक मारली आणि त्याच्याकरवीं त्याचे दोन्ही कान पुनः पुनः पिरगळायला लावले. त्या रात्रीं त्याच्यासाठीं आधणाला तांदूळ चढले नाहींत.

आघात केवढाही मोठा होवो, त्याची प्रतिक्रिया झाली नाहीं तर तो जाणवत नाहीं. कड्यावरून कुणाला नुसतें लोटून दिलें तर हातपाय मोडत नाहींत—खालच्या कठीण जमिनीवर ज्यावेळीं ती पडण्याची गती अडवली जाते त्यावेळींच हातपाय मोडतात. कृष्णाच्या बाबतींत तसेंच झालें होतें. आधाराला असलेली आईची पांखर त्याच्या पायांखालून नाहींशीं झाल्यावेळापासून बाहेरचा कोणताही आघात त्याला जमिनदोस्त करायला समर्थ

होत नव्हता. दुःखी दरिद्री माणसांचा तो मुलगा होता खरा, पण त्या छोट्या आयुष्यांत त्यानें दुःख अनुभवलें नव्हतें. तिटकारा हेटाळणीचा त्याला यापूर्वी परिचय नव्हता. कादंबिनीकडे आल्या दिवसापासून हे सारे आघात सहन करायला तो जो समर्थ झाला, तो पायतळचा आधार नाहींसा झाल्यामुळेंच.

पण आतां सारें कांहीं सहनशक्तीपलीकडे गेलें होतें. हेमांगिनीच्या मातृवात्सल्याच्या मजबूत पायावर तो आतां उभा राहिला होता, त्यामुळेंच आजकाल होत असलेला अत्याचार आणि अपमान त्याला जाणवूं लागला आणि त्यामुळेंच तो जमिनदोस्त होऊं लागला. या निराधार मुलाला तीं आईमुलें सारखीं छळीत, अपमान करीत, मार देत राहिलीं होतीं.

ती निघून गेल्यावर काळोखांत तो जमिनीवर आडवा झाला. फार दिवसांनीं त्याला आईची आठवण झाली. नव्या लाभलेल्या ' ताई'चें नांव घेऊन तो फुलून फुलून रडूं लागला.



दुसरे दिवशीं सकाळीं हळुच खोलींत शिरून कृष्णा अचानक हेमांगिनीच्या बिछान्याच्या पायथ्याशीं एका बाजूला येऊन बसला.

पाय आखडून घेऊन हेमांगिनी बिछान्यावर बाजूला वळली आणि म्हणाली, " दुकानीं गेला नाहींस किशा ? "

" जाईन आतां. "

" उशीर लावूं नकोस दादा. याचवेळीं जा. नाहींतर ती आतांच येईल आणि शिवीगाळ सुरू होईल. "

कृष्णाचा चेहरा एकदम लालीलाल झाला आणि लगेच पांढरा फटक पडला. " जातों " असें म्हणून तो उठून उभा राहिला. इकडेतिकडे पाहून बोलायला म्हणून तोंड उघडतां उघडतां पुनः तोंड मिटून तो उगी राहिला.

ती कल्पना येऊन हेमांगिनी म्हणाली, " मला कांहीं सांगायचंय का रे ? "

खालीं पहात कृष्णा अगदीं हळुच म्हणाला, " काल जेवलों नव्हतों ताई—"

" कालपासून जेवला नाहींस ? म्हणतोस काय किशा ? "

क्षणभर हेमांगिनी ताठरल्यासारखी राहिली होती. लगेच तिचे डोळे आसवांनीं भरून आले. डोळयांतून खालीं पाण्याची झरणी लागली. त्याचा हात धरून ओढून तिनें त्याला जवळ बसवून घेतलें आणि हळुहळू विचारून एकेक गोष्ट त्याच्या कडून कळून घेतल्यावर ती म्हणाली, "काल रात्रींच कां आला नाहींस?"

कृष्णा उगीच राहिला. पदरानें डोळे पुसून हेमांगिनी म्हणाली, "तुला माझ्या गळ्याची शपथ आहे भाई,—तुझी आई मेली नाहीं—मीच तुझी ती आई म्हणून समज आजपासून."

योग्य वेळीं ही हकिकत कादंबिनीच्या कानीं गेली. स्वतःच्याच खोलींतून हाक मारून ती जावेला म्हणाली, "एवढी जी गळीं पडायला गेली होतीस ती माझ्या भावाला पोसायला मी समर्थ नाहीं म्हणून का?"

तिच्या बोलण्याचा रोख ध्यानीं येऊन हेमांगिनीच्या अंगाचा भडका झाला. मनांतली गोष्ट मनांत ठेवून ती म्हणाली, "मी गळी पडलें तर त्यांत काय चुकलं?"

कादंबिनीनें विचारलें, "उद्यां तुझ्या मुलाला बोलावून जर मी असंच कांहीं केलं तर तुझा मान कसा राहील तें सांग ना? तूं अशा रीतीनं त्याला चुचकारलंस, तर मी त्याला कशी शिक्षा लावावी तें सांग ना?"

यापुढें सहन करणें हेमांगिनीला कठीण गेलें. ती म्हणाली, "जाऊबाई, पंधरा सोळा वर्षं आपण एका घरांत एके जागीं होतों—मी तुम्हांला ओळखतें. असं पोट मारायच्यापूर्वी आधीं आपल्या पोटच्या पोराला शिक्षा लावा—अन् मग दुसऱ्याच्या पोराला शिक्षा लावायचं बोला—मग ही गळीं पडण्याची गोष्ट नाहीं बोलली तरी चालेल."

कादंबिनी थक्क झाली. ती म्हणाली, "माझ्या पांचुगोपालची सर त्याला लावतेस का? देवाची न् माकडाची तुलना करतेस? आतां यापेक्षां आणखी काय बोलणार आहेस तेंच मला समजत नाहीं!"

हेमांगिनीनें उत्तर दिलें, "देव कोण अन् माकड कोण तें मला चांगलं माहित आहे. आतां मी कांहीं बोलणार नाहीं जाऊबाई. बोलायचंच तर असं म्हणेन, कीं तुमच्यासारखी निर्दय, निष्ठूर, आतताई बाई या जगांत शोधून सांपडायची नाहीं." असें म्हणून प्रत्युत्तराची अपेक्षा न करतां खिडकी बंद करून ती निघून गेली.

त्या दिवशीं संध्याकाळच्या पूर्वी—म्हणजे घरचे घरधनी घरीं यायच्या सुमारास मोठी जाऊ आपल्या घराच्या अंगणांत उभी राहून मोलकरणीला उद्देशून मोठमोठ्यानें आरडत ओरडत होती, " रात्रंदिवस जी ही उठाठेव करतेय तिनंच काय तें निराकरण "करावं. आईपेक्षां मावशीचंच मन मोठं होय ! माझ्या भावाचं वर्म मला कळत नाहीं ?—दुसऱ्याला कळतं !—कधीं बरं व्हायचं नाहीं यांचं. भावाबहिणींत झगडा लावून बसल्या बसल्या मजा पहाल, पण देवधर्माला तें मानवायचं नाहीं—सांगून ठेवतेंय !" असें म्हणून ती सैंपाकघरांत निघून गेली.

आजवर दोन्ही जावांमधें अशा प्रकारची शिवीगाळ, तोंडातोंडी, शापशपथा, कितीतरी वेळ होऊन गेल्या होत्या. पण आज ती मात्रा बरीच वाढली होती. कानीं आलें तरी बहुधा हेमांगिनी तें ऐकत नसे. अंगीं आलें तरी लावून घेत नसे. पण आज तिची प्रकृति बिघडलेली असल्यामुळें तिला सहन झालें नाहीं. ती येऊन खिडकींत उभी राहिली आणि म्हणाली, " इतक्यांतच कां थांबलां जाऊबाई ?—देवाच्या कानीं पोचलं नसेल अजून. आणखी चालूं दे कीं थोडा वेळ. द्या कीं मला शिव्याशाप—थोरले भावजी घरीं येऊं देत—हे येऊंदेत—घरीं येऊन ऐकूं देत. इतक्यांत थकलांत तर कसं होईल ? "

कादंबिनी धक्क्यावर चढून उभी राहिली आणि वर पाहून ओरडली, " कधीं कुठल्या अवदसेचं नांव मी घेतलं होतं माझ्या तोंडानं ? "

शांतपणें हेमांगिनी म्हणाली, "कशाला बोलाल तोंडानं ! तुम्हीं कधीं तोंडानं का बोलतां ? जाऊबाई, काय वाटतं तुम्हांला ? एक तुम्हीं काय त्या शहाण्या ? अन् पृथ्वीच्या पाठीवरचीं सारीं माणसं मूर्ख ! कुणाचं डोकं आदळून फुटतंय ते त्या माणसाला कळत का नाहीं ? "

आतां कादंबिनी आपल्या मूळ पदावर आली. अगदीं आकर्ण तोंड पसरून हातपाय नाचवीत ती म्हणाली, " अन् न कळलं म्हणून काय झालं ? खाई त्याला खवखवे. तुला तेवढं कळतं—अन् मला का कळत नाहीं ? किशा इथं आला तेव्हां सात थपडा दिल्या तरी हुं म्हणत नसे, जो हुकूम करीन तो मुकाट्यानं ऐके, आज दुपारीं कुणाच्या जोरावर त्यानं काय जबाब दिला तें या प्रसन्नच्या आईला एकदां विचारून पहा ना. " असें म्हणून तिनें मोलकरणीकडे बोट दाखवलें.

प्रसन्नची आई म्हणाली, " तें मात्र खरं हो सूनबाई ! आज तो भात टाकून उठून गेला तेव्हां यांनीं म्हटलं, 'हे पिंड गिळले नाहींस तर यमाच्या घरीं जावं लागेल,--कुणाच्या जोरावर एवढी मिजास आलीय तुला ?'—त्यावेळीं काय म्हणतो तो, 'माझी ताई आहे तोंवर मी कुणालाच भीत नाहीं.' "

छाती फुलवून कादंबिनी म्हणाली, " काय ! झालं ना ? ही मिजास कुणाच्या जोरावर ! आज मी अगदीं सरळसरळ सांगतें तुला, त्याला अशी शंभर वेळ हांका मारीत जाऊं नकोस—आम्हां भावाबहिणींत अशी आडवी येऊं नकोस ! "

हेमांगिनी यावर कांहीं बोलली नाहीं. सापानें उलटून डंख मारलेला पाहून तिच्या आश्चर्याची कमाल झाली. खिडकींतून दूर होऊन ती विचार करूं लागली—किती डिंवचली म्हणजे ही सर्पीण उलटेल ?

तिचें डोकें दुखत होतें. ताप यायला सुरवात झाली होती, म्हणून अवेळींच जाऊन ती बिछान्यावर आडवी पडली. ती तिची स्थिति ध्यानीं न आल्यामुळें तिचा नवरा रागारागानें आंत येऊन म्हणाला, " वहिनीबरोबर आज कसला तंटा केलास ? कुणाचंच कसं ऐकत नाहींस ? जगांत असतील नसतील तेवढे दळभद्रे दिसले, कीं तूं कंबर कसून सरसावतेस !—रोज रोज हा त्रास सुरू राहिला तर मला सहन व्हायचं नाहीं. आज वहिनीनं निष्कारण माझ्यावर भलतीकडे तोंडसुख घेतलं. "

थकल्या वाणीनें हेमांगिनी म्हणाली, " वहिनीनं तोंड टाकलं म्हणून का आज तुम्हीं नाहक माझ्यावर तोंड टाकतांहांत ? "

विपिन म्हणाला, " पण आजचं तिचं म्हणणं कांहीं गैर नव्हतं. तुझा स्वभाव मला माहित आहे. मागं एकदां घरच्या गुराख्याचं प्रकरण काढून असंच केलंस. मोती कुंभाराच्या भाच्याची बाग तुझ्यामुळेंच हातावेगळी झाली—उलट पोलीसांची तोंडें बंद करायला माझेच शेंदीडशें गेले. स्वतःचं बरं वाईट तुला स्वतःच कसं कळत नाहीं ? ही तुझी खोड कधीं जाणार ? "

हेमांगिनी उठून बसली आणि नवऱ्याच्या तोंडाकडे पाहून म्हणाली, "माझी खोड जाणार माझ्या बरोबर—मी मेलें म्हणजे !—त्याच्या आधीं नाहीं. मी आई आहें, माझ्या आसऱ्याला चार कच्चीबच्चीं आहेत—वर देव पहातो आहे—वडील माणसांच्या विरुद्ध मला यापेक्षां कांहीं तेढंवांकडं बोलायचं नाहीं.

आज माझी प्रकृति बिघडलेली आहे. यावेळीं मला टाकून बोलूं नका. जा पाहूं ! " असें म्हणून अंगावर पांघरूण ओढून ती पाठ फिरवून झोपीं गेली.

यापुढें उघड उघड वाद करण्याचें विपिनला धैर्य झालें नाहीं. मनांतल्या मनांत आपल्या बायकोवर—विशेषतः गलग्रह झालेल्या त्या दळभद्यावर तो भयंकर संतापला होता.

## ६

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हेमांगिनी खिडकी उघडते न उघडते तोंच तिच्या कानीं मोठ्या जावेच्या कठोर आवाजाचा झंकार प्रवेश करता झाला. ती नवऱ्याला उद्देशून म्हणत होती, " मेला कालपासून कुठं पळून गेलाय. एकदां चौकशी करा ना ! "

नवऱ्यानें उत्तर दिलें, " गेला चुलींत ! कसली चौकशी करायची ? "

साऱ्या गांवाला ऐकूं येईल एवढ्या मोठ्यानें ती म्हणाली, " मग लोकांच्या तोंडापुढं या गावीं रहाणं कठीण जाईल बरं. आधींच आम्हाला गावांत शत्रू फार—कुठं तरी जाऊन पडून मेलाबिला, तर घरच्या लहानमोठ्या साऱ्या माणसांना तुरुंगांत जावं लागेल, याची आहे ना कल्पना ? "

हेमांगिनीला सारें कांहीं कळून चुकलें. लगेच खिडकी बंद करून ती बाजूला झाली. एक मोठा सुस्कारा सोडून ती दुसरीकडे निघून गेली.

दुपारीं सैंपाकघरांतल्या चौथऱ्यावर बसून ती थोडीशी रोटी खात होती. तितक्यांत चोरासारखीं पावलें टाकीत कृष्णा येऊन हजर झाला. तोंड उतरलेलें—रुक्ष झालेलें ! तिनें विचारलें, " कुठं पळाला होतास रे किशा ?"

" पळालों नव्हतों—काल संध्याकाळीं दुकानांत झोंपलों होतों. जागा झालों अन् पहातों तर मध्यान्ह रात्र झालेली.—भूक लागलीय ताई. "

" जा तिकडे आपल्या घरीं आणि खा. जा. " असें म्हणून हेमांगिनी आपल्या थाळींतली रोटी खाऊं लागली.

एक मिनिटभर उगीच राहून वाट पाहून कृष्णा जायला निघाला होता, त्याला मागें बोलावून हेमांगिनीनें जवळ बसवून घेतलें आणि सैंपाकीणबाईला तिथेंच त्याचें ताट वाढायला तिनें सांगितलें.

त्याचें अर्धें जेवण झालें न झालें तोंच बाहेरून उमा घाबऱ्याघुबऱ्या पण मुलींच गडबड न करतां धांवत आली आणि म्हणाली, " बाबा येताहेत ! "

मुलीची ही कावरीबावरी अवस्था पाहून आईला आश्चर्य वाटलें, " त्यांत एवढं घाबरायला काय झालं ग ? "

उमा आली ती कृष्णाच्या मागें उभी राहिली होती. उत्तरादाखल त्याच्याकडे बोट करून नाकतोंड मुरडून खुणेनें दाखवून ती म्हणाली, " जेवतोय ना !—हा ! "

काय झालें तें पहाण्यासाठीं कृष्णानें मान वळवली. उमेची उत्कंठित नजर आणि संशयित मुद्रा त्याच्या नजरेला आली. एकदम त्याचा चेहरा पांढरा फटक झाला. त्यावेळीं त्याला काय वाटलें तें त्याचा तोच जाणे.

" ताई, बाबू येताहेत ! " असें म्हणून जेवण टाकून तो पळत जाऊन सैंपाकघराच्या दाराआड लपला. तो पळतो आहे असें पाहून उमाही पळत दुसरीकडे गेली. घरवाला आल्यावर चोराची जी गत होते तशीच त्यांची गत झाली होती. हेमांगिनीला पहिल्यानें कांहींच कल्पना न आल्यामुळें तिनें एकदां इकडे तिकडे पाहून घेतलें. नंतर थकल्यासारखें करून ती भिंतीला टेकून पडली. तिच्या हृदयाला बाण लागून ओरखडे आल्यासारखें झालें होतें.

तितक्यांत विपिन येऊन हजर झाला. अशाप्रकारें आपली बायको समोरच बसलेली पाहून जवळ येऊन त्यानें उद्विग्नपणें विचारलें, " हें काय ? जेवणाचं भरलं ताट समोर घेऊन अशी कां बसली आहेस ? "

हेमांगिनीनें उत्तर दिलें नाहीं. अधिकच अस्वस्थ होऊन विपिननें विचारलें, " पुनः ताप आला वाटतं ? "

अर्ध्या जेवणावरून उठलेलें कृष्णाचें ताट त्याच्या नजरेसमोर येतांच तो म्हणाला, " इथं हा एवढा भात टाकून उठून कोण गेलं ? ललित वाटतं ? "

हेमांगिनी उठून बसली आणि म्हणाली, " नाहीं. ललीत नव्हे. शेजारचा किशा जेवीत होता. तुमच्या भीतीनं जाऊन दाराआड लपलाय. "

" कां ? "

हेमांगिनी म्हणाली, " तें तुमचं तुम्हालाच माहित. नुसता तोच कांहीं घाबरला नाहीं—तुम्ही येतांहां म्हणून घाबरून वर्दी द्यायला उमाच आली होती पळत. "

आपली बायको तेढी बोलते आहे याची विपिनला कल्पना आली. म्हणूनच तिला सरळ मार्गावर आणण्यासाठीं त्यानें हंसून विचारलें, "कां उगीच अशी पळत आली ती?"

हेमांगिनी म्हणाली, "कोण जाणे! समोरच आईची बेअब्रू झालेली बघायला नको म्हणून आली असेल पळत!—" असें म्हणून एक सुस्कारा सोडून ती पुन: उद्गारली, "किशा म्हणजे परक्याचा मुलगा. तो घाबरून लपला यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण प्रत्यक्ष पोटच्या पोरीला भीति वाटली याचं आश्चर्य वाटतं. मूठभर भात कुणालातरी द्यायचा अधिकार आपल्या आईला नाहीं हें तिला सुद्धां कळलं."

प्रकरण विकोपाला गेलें आहे याची कल्पना विपिनला आली. आतां तें जास्त विकोपाला जाऊं नये म्हणून ती गोष्ट थट्टेवारी नेऊन उडवून टाकण्याच्या उद्देशानें, डोळे मिचकावून मान हलवून तो म्हणाला, "नाहीं. खरंच अधिकार नाहीं. भिकाऱ्याला भिक्षा घालायचासुद्धां अधिकार नाहीं. जाऊंदे तें—कालपासून डोकं धरलं नाहीं ना? उद्यां शहरच्या केदार डॉक्टरला बोलवावंसं वाटतंय मला. नाहींतर एकदां कलकत्त्याच्याच डॉक्टरला—"

दुखणें आणि त्या दुखण्याच्या उपायाची चर्चा एवढ्यावरच थांबली. हेमांगिनीनें मधेंच विचारलें, "उमेच्यासमोर तुम्हीं किशाला कांहीं बोललां होतां?"

विपिनला आकाशांतून कोसळल्यागत वाटलें. तो म्हणाला, "मी? कुठं—नाहीं! हं हं! त्या दिवशीं मला वाटतं, बोललों होतों—वहिनी रागावली होती—दादा चिडले होते, तेव्हां तिथं उभी होती वाटतं—समजलं का—"

"समजलं!" असें म्हणून हेमांगिनीनें त्या विषयावर पडदा टाकला.

विपिन आपल्या खोलींत निघून गेल्यावर कृष्णाला बाहेर बोलावून ती म्हणाली, "किशा, हे चार पैसे घे नि दुकानावरचे चणेकुरमुरे, नाहींतर कांहींतरी घेऊन खा जा. कधीं भूक लागली तर यापुढं माझ्याकडे येऊं नकोस. बाहेरच्या माणसाला घासभर भात घालायची सत्ता कांहीं तुझ्या ताईच्या हातीं राहिलेली नाहीं."

कृष्णा मुकाट्यानें निघून गेला. विपिननें तें खोलींतून पाहिलें. रागानें दांतओंठ खात त्याच्याकडे पहात तो तसाच उभा राहिला होता.

# ७

पांचसात दिवसांनंतर एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं तोंड वांकडें करून विपिन रागारागानें आंत आला आणि म्हणाला, "हें काय चालवलंयस तूं ! दुसऱ्याच्या पोरांचा बोजा घेऊन रात्रंदिवस ही आपसाआपसांत लढाई कां सुरू झालीय ? आज पाहिलं—दादासुद्धां आतां रागाला आलाय !"

थोड्याच वेळापूर्वी स्वतःच्या खोलींत बसून जाऊबाईनीं धाकट्या जावेला उद्देशून आपल्या नवऱ्यापुढें आरडून ओरडून जे अपशब्दाचे बाण फेकले होते त्यांतला एकसुद्धां फुकट गेला नव्हता. सारे बाण येऊन हेमांगिनीला लागले होते. त्याच्या प्रत्येकाच्या फाळाला असलेल्या विषाचा परिणाम होऊन तिच्या सर्वांगाची लाहीलाही झाली होती. मोठे भावोजी मधें हजर असल्यामुळें तें सहन करण्यापलिकडे हेमांगिनीला त्याचा प्रतिकार करणें अशक्य झालें.

इतिहासकाळीं यवन लोक ज्याप्रमाणें समोर गायी उभ्या करून रजपूत-सेनेवर बाण सोडीत आणि युद्धांत जय मिळवीत, त्याचप्रमाणें कादंबिनी अलिकडे आपल्या नवऱ्याला पुढें करून या युद्धांत हेमांगिनीला हार खायला लावीत असे.

नवऱ्याच्या या भाषणामुळें हेमांगिनी एकदम भडकली. ती म्हणाली, "म्हणतां काय ? तेसुद्धां रागवले अं ! एवढं मोठं आश्चर्य घडलेलं कधीं कुणी ऐकलं होतं का ? विश्वास बसेल का कुणाचा ? बरं—आतां काय करूं म्हणजे त्यांचा राग जाईल ?"

विपिन मनांतल्या मनांत चिडला होता. पण तसें कांहीं बाहेर दिसूं देणें त्याच्या सवयीचें नव्हतें. म्हणूनच मनांतला राग मनात ठेवून तो सहजपणें म्हणाला, "कांहीं झालं तरी तीं वडिल माणसं—"

त्याचें वाक्य पुरें होऊं न देतां हेमांगिनी म्हणाली, "माहीत आहे. वडिलांचा मान कसा ठेवायचा हें न कळायला मी कांहीं पाळण्यांतली पोर नाहीं. बिचाऱ्या पोराबद्दल मला लोभ वाटतो म्हणून मेल्याचे डोळे फुटताहेत नि रात्रंदिवस मला असं टोंचताहेत—" तिचा आवाज आता नरम आला होता. वडिल दिराबद्दल आपण त्वेष आणून बोललों याची जाणीव होऊन

ती मनांतल्या मनांत ओशाळली होती. पण तिच्याही अंगाचा भडका झाला होता म्हणूनच राग आवरणें तिला कठीण गेलें.

विपिनचा ओढा आंतून प्रतिपक्षाकडे होता. परक्याच्या पोराचा प्रश्न घेऊन उगीच दादाबरोबर झगडा माजवणें त्याला पसंत नव्हतें. आपली बायको आतां ओशाळली आहे असें पाहून जरा जोरांत येऊन तो म्हणाला, " यांत टोंचणी कसली ? स्वतःच्या मुलाला रीत लावण्यासाठीं त्यांनीं त्याला शिक्षा केली तर त्यांत तुला कशाला टोंचणी लागायला हवी ? शिवाय कांहींही म्हण—वडिल माणसं ना तीं ! "

नवऱ्याच्या तोंडाकडे हेमांगिनीनें पाहिलें तेव्हां पहिल्यानें तिला थोडेंसें आश्चर्य वाटलें. या पंधरासोळा वर्षांच्या कारकिर्दीत त्यानें कधींही भ्रातृ-भक्तीचा एवढा मोठा पुरावा दाखवला नव्हता. तरीही त्याच क्षणाला रागानें तिच्या सर्वांगाची लाही झाली. ती म्हणाली, " तीं जशीं वडिल माणसं, तशीच मी आई आहें. वडिल माणसं जर स्वतःचा मान घालवून बसायला लागलीं, तर त्याची भरपाई मी कशी करणार ? "

विपिनच्या तोंडाशीं कांहींतरी उत्तर आलें होतें पण तो थांबून उगीच राहिला. दाराच्या बाहेरून कुणाचा अत्यंत विनयशील पण संकुचित आवाज ऐकूं आला, " ताई ! "

नवराबायकोची नजरानजर झाली. नवरा थोडासा हंसला. त्या हसण्यांत प्रीतीचें लक्षण सामावून दिसत होतें. हसूं आवरण्यासाठीं दातानीं ओठ चावून ती दरवाजाच्या बाजूला सरकली. एक शब्दसुद्धां न बोलतां कृष्णाच्या तोंडाकडे तिनें मोठ्या प्रेमानें पाहिलें, त्यासरशीं त्यालाही आनंदाचें भरतें आलें आणि जें तोंडाला आलें तें बोलावें म्हणून तो म्हणाला, " बरी आहेस ना ताई ? "

क्षणभर हेमांगिनीच्या तोंडांतून शब्द उमटला नाहीं. आतांच नवरा-बायकोमध्यें ज्या बाबतींत भांडण झालें होतें त्याचें मूळ एकाएकीं असें समोर दिसतांच त्या वितंडवादाची आठवण तिच्या मस्तकांत जागी झाली. तोंडांतल्या तोंडांत पण रागारागानें हेमांगिनी म्हणाली. " इथं कशाला आलायस ? रोज रोज कशाला इथं येतोस ? सांग ना ? "

कृष्णाच्या हृदयांत धसका बसला. तिच्या शब्दांतला निष्ठुरपणा खरोखरच त्याला इतक्या कठोरपणानें जाणवला—उद्देश कांहीही असो—

हें भाषण कांहीं थट्टेचें नव्हे, हें त्या बिचाऱ्या पोराला कळायला कठीण गेलें नाहीं.

भीतीनें—आश्चर्यानें, शरमेनें त्याचें तोंड काळवंडून गेलें. तो हळुच म्हणाला, " पहायला आलों होतों. "

विपिन हंसून म्हणाला, " पहायला आला होता !—तुला ! " त्या हंसण्यानें आपले दांतच पाडले असें हेमांगिनीला वाटलें. शेपटीवर पाय पडलेल्या नागिणीसारखी ती फणाणून उठली आणि कृष्णाला उद्देशून म्हणाली, " जा—आजपासून इथं येऊं नकोस—जा ! "

" बरं. " असें म्हणून कृष्णानें हंसण्याचा वेडावांकडा प्रयत्न केला—पण त्यामुळें त्याची मुद्रा अधिकच काळवंडून गेली. तशाच कालवंडलेल्या तोंडानें मान खालीं घालून तो चालता झाला.

कृष्णाच्या मुद्रेवरची ती काळवंडलेली छाया हेमांगिनीच्या चेहऱ्यावर उमटलेली दिसली. त्या तशा काळवंडलेल्या मुद्रेनें एकवार नवऱ्याकडे पाहून भराभर पावलें टाकीत ती तिथून निघून गेली.



गेल्या पांच सहा दिवसांत हेमांगिनीचा ताप उतरला नव्हता. काल डॉक्टरनें येऊन पाहिलें तेव्हां छातींत सर्दी भरल्याचें त्यानें सांगितलें.

नुकतीच सांजवात लावली होती. थाटमाटाचे कपडे करून ललित आंत आला आणि म्हणाला, " आई, दत्तांच्या घरीं बाहुलीचा खेळ आहे. जाऊं का पाहायला ? "

उगीच थोडीशी हंसून आई म्हणाली, " काय रे ललित, आज पांच सहा दिवस तुझी आई अशी पडून आहे, एकदांसुद्धां जवळपास कुठं आला नाहींस ना ? "

ललित ओशाळला आणि तिच्या उशागती येऊन बसला. लाडक्या मुलाच्या पाठीवर हात ठेवून आई म्हणाली, " माझं हें दुखणं बरं झालं नाहीं, मी मेलें, तर काय करशील रे ? खूप रडशील ? "—

" जा ! बरं होईल ! " असें म्हणून ललितनें आपला हात तिच्या अंगावर ठेवला. मुलाचा तो हात आपल्या हातीं घेऊन ती मुकाट्यानें पडून राहिली

होती. तापाच्या भरांत तो मुलाच्या हाताचा स्पर्श तिला मोठा गोड लागत होता, आंगभर जाणवत होता. असेंच घटकाभर रहावें असें तिला वाटत होतें. पण तितक्यांत ललित गडबड करूं लागला. बाहुलीचा खेळ इतक्यांत सुरू झाला असेल असें वाटून तो फार अस्वस्थ झाला होता. मुलाचा उद्देश ध्यानीं येऊन आई मनांतल्या मनांत हंसून म्हणाली, " बरं बरं. जा—पाहून ये. रात्रीं फार वेळ राहूं नकोस."

" नाहीं आई, अगदीं लवकर येतों परत." असें म्हणून ललित खोलीबाहेर निघून गेला—पण लगेच फिरून आला आणि म्हणाला, " आई, एक गोष्ट विचारूं ?"

आई हंसून म्हणाली, " एक रुपया हवा ना ? त्या फडताळांत आहे. तो घे जा—पण जास्त घेऊं नकोस हं."

" नाहीं आई, रुपया नको. पण आधीं सांग, तूं ऐकशील ?"

चकित होऊन आईनें विचारलें, " रुपया नको ! मग काय आहे रे ?"

ललित अगदीं तिच्या जवळ येऊन हळुच म्हणाला, " किशामामाला जरा इथं येऊं देशील ? तो आंत नाहीं यायचा—उंबरठ्यावर उभा राहून एकदां तुला पाहून घेऊन तसाच जाईल परत. कालसुद्धां तो असाच बाहेर येऊन बसला होता—आजही बसला आहे येऊन."

हेमांगिनी अस्वस्थ होऊन उठून बसली आणि म्हणाली, " जा जा ललित, आत्तांच घेऊन ये त्याला. अरेरे ! बसलाय म्हणतोस ? कुणी कां सांगितलं नाहीं रे मला ?"

" तो भीत होता यायला." असें म्हणून ललित निघून गेला. थोड्या वेळानें कृष्णा आंत आला आणि मान खालीं घालून भिंतीला टेकून उभा राहिला.

हेमांगिनीनें हांक मारली, " ये दादा, ये."

कृष्णा तसाच उभा राहिला होता असें पाहून ती स्वतः उठली आणि त्याचा हात धरून मोठ्या कष्टानें पुनः बिछान्यावर येऊन बसली. त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ती म्हणाली, " हो का रे किशा, टाकून बोललें म्हणून ताईला काय असं विसरतां येतं होय ?"

कृष्णा एकदम हुंदकून रडूं लागला. हेमांगिनीला आश्चर्य वाटलें. यापूर्वी तो रडल्याचें कधीं कुणीं पाहिलें नव्हतें. कुणी कितीही छळलें, त्रास दिला,

मार दिला, तरीही मुकाट्यानें तो मान खालीं घालून उभा राही. लोकांसमोर डोळ्यांतून कधीं एक टिप बाहेर येऊं देत नसे. हा त्याचा स्वभाव हेमांगिनीला माहित होता म्हणूनच तिला आश्चर्य वाटलें. ती म्हणाली, "छे! असं रडायचं काय तें! अशा तुझ्यासारख्या मोठ्या मुलानं काय डोळ्यांतून टिपं काढायचीं!"

धोतराचा बोळा तोंडांत घेऊन रडें आवरण्याचा जिवापाड प्रयत्न करीत तो म्हणाला, "छातींत सर्दी भरलीय असं म्हणतात ना डॉक्टर!"

हेमांगिनी हंसली आणि म्हणाली, "एवढंच! छे छे! काय पोरकट आहेस रे!" बोलतां बोलतां तिच्याच डोळ्यांतून टपटप करून दोन टिपें खालीं घरंगळलीं, तीं डाव्या हातानें पुसून दुसरा हात त्याच्या मस्तकावर ठेवून ती कौतुकानें म्हणाली, "सर्दी भरलीय! भरेना का रे? मी मेलें कीं तूं अन् ललित दोघेही मला खांद्यावर घेऊन गंगेवर घेऊन जा ना!—कसं! नेशील ना?"

"काय ग सूनबाई? कशी काय आहे प्रकृति आज"—असें म्हणत मोठ्या जाऊबाई येऊन दारांत उभ्या राहिल्या. क्षणभर तिखट नजरेनें कृष्णाकडे पहात कादंबिनी म्हणाली, "वा:! स्वत:च स्वारी हजर झाली आहे वाटतं येऊन? अन् हें काय? रडूनकढून ताईला माया लावायचं ढोंग चाललंय होय? म्हणतात वेडा—पण सारी ढोंगं साधतात हो याला!"

थकल्यामुळें हेमांगिनी नुकतीच तक्क्याला टेकून पडली होती ती ताड्‌कन् उठून बसली आणि म्हणाली, "जाऊबाई, सहासात दिवस मला ताप येतोय, मी तुमच्या पायां पडतें, आज तुम्हीं जा पाहूं."

कादंबिनी पहिल्यानें जराशी दबकली होती खरी पण लगेच अवसानांत येऊन म्हणाली, "मी तुला सांगत नव्हतें सुनबाई! स्वत:च्या भावाला मी बोलत होतें, तिथं कां एवढी निकडीला येऊन उसळलीस?"

हेमांगिनी म्हणाली, "तें बोलणं तर रात्रंदिवस सुरूच आहे. तें तिकडे तुमच्या घरीं चालूं द्या. माझ्यासमोर नको. इथं मी बोलूं द्यायची नाहीं कुणाला."

"कां? काय करशील? घरांतून बाहेर काढशील मला?"

हेमांगिनी हात जोडून म्हणाली, "माझी प्रकृति बरी नाहीं जाऊबाई. तुमच्या पायां पडतें, एक उगी तरी रहा.—नाहींतर निघून तरी जा."

कादंबिनी म्हणाली, "स्वत:च्या भावाला मी शिक्षा लावायची नाहीं!"

हेमांगिनी उत्तरली, " तें काय तें तिकडे तुमच्या घरीं करा ! "

" तें आतां चांगलंच होईल ! त्याची काळजी नको. माझ्या नांवाची बदनामी करतो—सारं बिंग बाहेर काढतें मेल्याचं. नष्ट खोटा मेला ! मी म्हटलं, गाईला दावं नाहीं—थोडा ताग कापून आण म्हटलं—तर म्हणतो. ' नाहीं आक्का. तुझ्या पाया पडतों. बाहुलीचा खेळ पहायला जातों '—हा बाहुलीचा खेळ चाललाय होय रे ? " असें म्हणून दणदण पावलें वाजवीत कादंबिनी निघून गेली.

हेमांगिनी कितीतरी वेळ काष्ट होऊन पडून राहिली होती. ती म्हणाली, " बाहुलीचा खेळ बघायला कां गेला नाहींस रे किशा ? गेला असतास तर कशाला हें असं झालं असतं ! तूं इथं आलेलं जर त्यांना आवडत नाहीं तर भाई, कशाला इथं येतोस माझ्याकडे ? "

एक शब्दसुद्धां न बोलतां कृष्णा हळुहळु निघून गेला—पण त्याच क्षणीं पुनः परत येऊन म्हणाला, " आमची गांवची विशालाक्षी देवी म्हणजे मोठी जागृत देवता आहे ताई. तिची पूजा करून तीर्थ घेतलं, कीं सारे रोग बरे होतात. तेवढं कर ना ताई. "

आतांच जावेबरोबर निष्कारण झगडा झाल्यामुळें हेमांगिनीचें मन अगदीं बिघडून गेलें होतें. नुसतें भांडणतंटा झाला एवढ्यासाठींच नव्हे, एवढें बोलणें ऐकून घ्यावें लागलें तरी हा सारें कसें विसरून जातो, याची दशा पुढें काय होणार, या कल्पनेनें तिच्या अंतःकरणाला पीळ पडूं लागला होता. कृष्णा परत आला त्याचवेळीं हेमांगिनी उठून बसली आणि त्याला जवळ बसवून घेऊन त्याच्या पाठीवरून हात फिरवीत रहूं लागली. डोळे पुसून ती म्हणाली, " मी बरी झालें कीं हळुच तिकडे कुणाला नकळत तुला पाठवून देईन पूजा करायला. एकटाच जाशील ? "

कृष्णा खुषींत आला आणि एवढाले डोळे करून पहात म्हणाला, " हो हो. एकटाच जाईन तर ! आतांच एक रुपया दे मला ताई—आत्तांच जातों मी—उद्यां सकाळींच पूजा करून तुला प्रसाद घेऊन येतों. प्रसाद खाल्ला, कीं लगेच दुखणं बरं होईल. मग काय ताई, पाठवतेस ना मला आजच ! "

हेमांगिनीनें जेव्हां पाहिलें कीं आतां तो कांहीं ऐकत नाहीं, तेव्हां ती म्हणाली, " पण उद्यांपर्यंत तिकडे राहिलास तर हीं चोप देतील ना तुला ! "

माराची गोष्ट निघतांच पहिल्यानें तो हटला पण लगेच उल्हासून म्हणाला, " मारीनात का—तुझं दुखणं तर बरं होईल ! "

पुनः तिच्या डोळयांतून आसवें पाझरूं लागलीं. ती म्हणाली, " काय रे किशा, मी तुझी कुणी नव्हे—कां एवढा जीव खालीं वर करतोस माझ्यासाठीं ! "

या प्रश्नाचें उत्तर बिचारा किशा काय देणार होता ?

त्याचें पिळवटलेलें हृदय रात्रंदिवस आंसवें गाळीत आईच्या शोधांत होतें.

कांहीं वेळ तिच्या तोंडाकडे पाहून तो म्हणाला, " तुझं दुखणं अजून बरं होत नाहीं, ताई ! छातींत सर्दी भरली आहे ना ? "

उगीच थोडेसें हंसून हेमांगिनी म्हणाली, " माझ्या छातींत भरलंय, त्यांत तुझं काय गेलं ? तुला कशाला ती काळजी ? "

कृष्णा आश्चर्यचकित होउन म्हणाला, " कशी काळजी वाटायची नाहीं, ताई ! छातींत सर्दी भरणं भारी वाईट. हें दुखणं जर असंच वाढलं, तर मग—"

" तर मग तुला बोलवायला पाठवीन. पण बोलावल्याशिवाय येऊं नकोस, भाई. "

" कां ताई ? "

निश्चयाच्या स्वरानें हेमांगिनी म्हणाली, " नाहीं—तुला मी इथं येऊं द्यायची नाहीं. न बोलावतां आलास तर मला भारी राग येईल. "

तिच्या चेहऱ्याकडे घाबरटपणें पाहून कृष्ण म्हणाला, " तर मग उद्यां सकाळीं बोलवायला पाठवशील मला ! "

" उद्यां सकाळीं यायला हवं का तुला ? "

कृष्णा ओशाळून म्हणाला, " बरं—सकाळीं नको असलं तर दुपारीं येईन—नाहीं ताई ? "

त्याची मुद्रा अगदीं काकुळतवाणी झाली होती. हेमांगिनीच्या मनाला तें फार लागलें. पण मन कठोर केल्यावांचून तिला गत्यंतर नव्हतें. सर्वांनीं मिळून या भोळया बिचाऱ्या असहाय मुलाचा जो छळ सुरू केला होता, तो कांहीं ना कांहीं करून वाढूं न देणें अवश्य होतें. तें तिलाच साधलें असतें. ताईला येऊन भेटण्यापायीं कितीही कडक शिक्षा झाली तरी ती सहन करायला तो मागें हटला नसता. पण तिला वाटलें, आपण तें कसें सहन करावें !

हेमांगिनीचे डोळे फाटून पाणी आलें. उसना कठोरपणा आणून ती म्हणाली, " मला त्रास देऊं नकोस कृष्णा. नीघ इथून. बोलावीन तेव्हां ये. उगीच जेव्हां तेव्हां येऊन माझं डोकं भडकवूं नकोस ! "

" बरं तर. नाहीं येत ! " असें म्हणून शरमेनें मान खालीं घालून कृष्णा तसाच निघून गेला.

हेमांगिनीच्या डोळ्यांतून आसवांचा पूर लोटूं लागला. आई हरपल्यामुळें हें अनाथ पोर आपल्यालाच आई मानून कवटाळतें आहे, हें तिला स्पष्ट कळून चुकलें. तिच्या पदराची एखादीशी पाखर मिळण्यासाठीं भिकाऱ्यासारखें हें पोर कसें जीव खालीं वर करतें आहे !

डोळे पुसून हेमांगिनी आपल्याशींच म्हणाली, " असं तोंड वाकडं करून गेलास कृष्णा,—पण ही तुझी 'ताई'सुद्धां तुझ्याइतकीच असहाय झाली आहे. बळेंच तुला घेऊन जवळ करायचं सामर्थ्य कांहीं तिच्या ठायीं नाहीं भाई ! "

उमा येऊन म्हणाली, " आई, काल किशामामा वसुलीला गेला नाहीं, तुझ्याकडे येऊन बसून राहिला, म्हणून काकांनीं त्याला मार दिला. त्याच्या नाकांतून—"

तिला धमकावून हेमांगिनी म्हणाली, " बरं बरं—कळलं ! जा तूं. नीघ इथून ! "

अचानक धमकी मिळाल्यामुळें उमा चमकली. ती मुकाट्यानें जाऊं लागली होती, तोंच तिच्या आईनें तिला हांक मारून विचारलें, " काय ग, नाकांतून रक्त आलं म्हटलंस होय ? "

उमा थांबून म्हणाली, " नाहीं—तसं फार नाहीं—थोडंसं. "

" बरं बरं, तूं जा. "

उमा दाराजवळ उभी राहून म्हणाली, "आई, किशामामा हा इथंच उभा आहे ! "

कृष्णाच्या तें कानीं गेलें. तेंच बोलावणें समजून आंत डोकावून लाजत लाजत हंसत तो म्हणाला, " आतां कसं आहे, ताई ? "

हेमांगिनीला जितकें वाईट वाटलें होतें, तितकीच ती चिडली होती. पिसाळल्याप्रमाणें ओरडून ती म्हणाली, " कशाला येतोयस इथं ? जा. जा म्हणतें ना इथनं ? "

कृष्णा वेड्यासारखा पहात राहिला. हेमांगिनी अधिकच पिसाळून म्हणाली, " अजून उभा राहिला आहेस, दळभद्या ? गेला नाहींस ? "

नुसतें ' जातों '—म्हणून कृष्णा तोंड वांकडें करून निघून गेला. तो गेल्याबरोबर हेमांगिनी उसासे टाकीत बिछान्यावर पडली आणि रागारागानें आपल्याशींच म्हणाली, " शंभर वेळ सांगितलं मेल्याला, कीं इथं येऊं नकोस म्हणून—तरी ' ताई ताई ' करीत येतो. शिवूला सांग उमा—म्हणावं, याला इथं पाऊल टाकूं देऊं नकोस. "

उमेनें उत्तर दिलें नाहीं. तीही हळुच बाहेर निघून गेली.

रात्रीं हेमांगिनीनें नवऱ्याला बोलावून घेऊन रडकुंडीला येऊन म्हटलें, " आजवर तुमच्यापाशीं मी कांहीं मागितलं नाहीं—ही अशी बिछान्यावर पडलें आहें—एक मागणं आहे—द्याल ? "

संदिग्धपणें विपिननें विचारलें, " काय मागणं आहे ? "

हेमांगिनी म्हणाली, " एवढा हा कृष्णा मला द्या. दीनवाणा झाला आहे बिचारा—आईबाप नाहींत—हीं माणसं त्याला बडवून मारताहेत, तें माझ्यानें पाहवत नाहीं. "

विपिन हंसत हंसत म्हणाला, " तर मग डोळे झांकून घे ! "

नवऱ्याचे ते निष्ठुर उद्गार हेमांगिनीच्या हृदयाला बाणासारखे लागले. इतर वेळीं ती चिडली असती पण यावेळीं तिचा जीव कळवळला होता, म्हणूनच मुकाट्यानें सहन करून ती हात जोडून म्हणाली, " शपथेवर सांगतें तुम्हांला, तो पोटच्या गोळ्यासारखा वाटतोय मला. मला द्या तो ! त्याला खायला प्यायला घालीन—लहानाचा मोठा करीन—मग तुम्हाला काय वाटेल तें करा. मोठा झाला कीं मी एक शब्द सुद्धां बोलणार नाहीं."

थोडासा नरम येऊन विपिन म्हणाला, " कृष्णा म्हणजे काय माझ्या दुकानांतला डाळतांदूळ, तो तुला आणून देऊं ? दुसऱ्याचा भाऊ, दुसऱ्या घरीं आलेला, तूं मधें पडतेस कसल्या कळवळ्यानं ? "

हेमांगिनीला रडें कोसळलें. डोळे पुसून ती म्हणाली, " तुम्ही मनात आणलं तर भावजींना सांगतां येईल, जाऊबाईना सांगतां येईल, खुशाल घेऊन येतां येईल त्याला. तुमच्या पायां पडतें, एवढं माझं ऐका. "

विपिन म्हणाला, "बरं, बरं. तसं करतां येईल. पण त्याला पोसायला मी तरी काय असा बडा माणूस लागून गेलों आहें ?"

हेमांगिनी म्हणाली, "आजवर मी सांगेन तें—अगदीं क्षुल्लक गोष्ट असली तरी—तुम्ही कधीं नाहीं म्हटलं नाहीं. काय माझी अशी चूक झाली म्हणून आतां हें असं उत्तर देतां ? खरोखर सांगतें, माझा जीव अगदीं आशेला आला आहे. एवढं लहानसं मागणंसुद्धां द्यायचं नाहीं का तुम्हांला ? अभागी बिचारा—म्हणून का तुम्ही सारीं त्याच्या जिवावर उठलां आहां ? मी ठेवून घेतें त्याला. काय करतात तें तरी पाहतें !"

विपिन आतां चिडीला आला. तो म्हणाला, "त्याला पोसायची माझी तयारी नाहीं."

हेमांगिनी म्हणाली, "माझी तयारी आहे. आपल्या पोरांना पोसतां येऊं नये, असा या घरांत मला मुळींच का अधिकार नाहीं ? उद्यांच घेऊन येतें त्याला. जाऊबाई जबरदस्ती करूं लागली तर पोलिसांत वर्दी देईन."

बायकोचें भाषण ऐकून विपिनला राग आला. आपल्या मर्जीविरुद्ध ती जाऊं पहाते आहे, याची त्याला चीड आली. तो रागारागानें म्हणाला, "बरं. बरं. तें पाहतां येईल !—" असें म्हणून तो निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळपासून पाऊस पडत होता. हेमांगिनी खिडकी उघडून आकाशाकडे पहात बसली होती. तितक्यांत पांचूगोपाळची आरडाओरड तिच्या कानीं आली. तो मोठमोठ्यानें ओरडून आपल्या आईला सांगत होता, "आई, तुझा शहाणा भाऊ भिजत भिजत आला आहे कुठून तरी."

"खेटर कुठं आहे रे ! आलें हं !"—असें म्हणून डोक्यावर पंचा टाकून कादंबिनी घाईघाईनें सदर दरवाजाकडे गेली.

हेमांगिनीच्या हृदयांत थरकांप सुटला. ललितला हांक मारून ती म्हणाली, "अरे बाबा, जरा जा शेजारच्या घरीं, अन् पहा तर खरं तुझा किशामामा कुठून आला आहे तो ?"

ललित धांवत गेला आणि तसाच धावत परत आला. तो म्हणाला, "पांचूदादानं किशामामाला आंगठे धरायला लावलेयत् अन् दोन विटा ठेवल्या आहेत त्याच्या मानेवर."

हेमांगिनीनें विचारलें, "काय केलं रे त्यानं ?"

ललित म्हणाला, " काल दुपारीं वसुलीसाठीं त्याला गवळवाड्यांत पाठवला होता. त्यानं तीन रुपये वसूल केले आणि सारे खर्चून परत आला घरीं. "

हेमांगिनीला तें खरें वाटलें नाहीं. ती म्हणाली, " त्यानं पैसे वसूल केले, असं कोण म्हणतं ? "

" लक्ष्मण गवळी स्वतः येऊन सांगून गेला—" असें म्हणून ललित आपल्या अभ्यासाला लागला.

आणखी दोन तीन घटका कसलीच गडबड ऐकूं आली नाहीं. दहा वाजायच्या सुमारास सैंपाकीणबाईनें ताटांतून दोन चपात्या आणून ठेवल्या. हेमांगिनी जेवायला बसणार होती, इतक्यांत तिच्याच खोलीबाहेर कुरुक्षेत्र माजलेलें तिला ऐकूं आलें.

पांचूगोपाळनें कृष्णाचे कान पकडले होते. कादंबिनी त्याच्या मागें होती. बरोबर घरधनीही होते. विपिनला बोलावण्यासाठीं दुकानावर माणूस पाठवला होता.

घाबऱ्याघाबऱ्या हेमांगिनी माथ्यावरचा पदर ओढून एका बाजूला उठून उभी राहिली. मोठ्या भावोजींचें कर्कश व्याख्यान सुरू झालें,—" हें पहा सूनबाई, तुझ्यापायीं आम्हांला हें घर टाकावं लागणार. विपिनला सांगून आमच्या घराची किंमत देऊन टाक, म्हणजे आम्हीं जातों दुसऱ्या कुठं तरी."

आश्चर्यानें हतबुद्ध होऊन हेमांगिनी एक शब्दसुद्धां न उच्चारतां स्वस्थ उभी राहिली, त्यावेळीं लढाई पुढें चालवण्याची जबाबदारी स्वतःच्या हातीं घेऊन थोरली जाऊ अगदीं दारासमोर येऊन तोंड वेंगाडून हातवारे करीत म्हणाली, "अग सुनबाई, मी तुझी वडील जाऊ—मलासुद्धां कोल्ह्याकुत्र्याच्या लायकीची का समजतेस ? म्हणायचं तसं तर म्हण, पण लोकांसमोर तोंडदेखला चांगुलपणा दाखवून माझ्या भावाचं माथं बिघडवूं नकोस म्हणून हजार वेळ तुला सांगतेंय—कसं ? ऐकलंस का माझं ? अग बाई, दोन दिवस लाडिकपणा करणं सोपं असतं. पण जन्मभर कांहीं तूं त्याचा बोजा घ्यायची नाहींस !—तो मलाच घेतला पाहिजे. "

वांकडेंतिकडें बोलून आपल्याला भांडणांत ओढायचा हा तिचा उपक्रम होता—दुसरें कांहीं नव्हे—हें हेमांगिनीला कळून चुकलें होतें. तिनें हळुच विचारलें, " काय झालंय ? "

वडिल जाऊ म्हणाली, "आम्हीं त्याला खायला घालीत नाहीं—नुसता राबवतों—अन् तूं त्याला पोटाला घालून जगवलंयस, होय ?"

हेमांगिनीनें उत्तर दिलें, "होय, होय ! आजपर्यंत केव्हांसुद्धां तुम्हीं त्याला दोन वेळ पोटभर अन्न घातलं नाहीं. नुसती धरमार चाललीय आणि राबवून घेतांहांत. तुमच्या भीतीनं मी त्याला येऊं नको म्हणून हजारवेळां सांगितलं – पण त्या बिचाऱ्याला भूक आवरत नाहीं. माझ्याकडे आलं कीं पोटभर खायला मिळतं म्हणून तो येतो धावत इथं—चोरी दरोडेखोरीचे धडे घ्यायला नव्हे ! पण तुम्हीं अशीं चांडाळ माणसं आहांत कीं तेंसुद्धां तुमच्यानं पहावत नाहीं !"

आतां मात्र दीरानें उत्तर दिलें. त्यानें कृष्णाला समोर ओढलें आणि धोतराच्या सोग्यांत त्यानें बांधून आणलेल्या केळीच्या पानांचा द्रोण बाहेर काढून दाखवून रागारागानें विचारलें, "आम्ही दुष्ट, आम्ही चांडाळ, आम्हांला कुणाचं बरं पहावत नाहीं, तें आतां तूंच पहा आपल्या डोळ्यांनीं ! तुला बरं वाटावं म्हणून माझे पैसे चोरून कुठल्याशा देवाची पूजा करून यान हा प्रसाद आणलाय तो तुझ्या शिकवणीमुळंच ! घे हा !—" असें म्हणून त्यानें त्या द्रोणांतले एकदोन संदेश आणि फूलपत्री बाहेर काढून दाखवली.

भिवया वर चढवून कादंबिनी म्हणाली, "काय ग बाई तरी ! झांकलं माणिक—सैतानाची अवलाद—कावेबाज कारटं ! आतां तूंच सांग ना—कोणत्या मतलबानं यान चोरी केली, त्याचं आतां तूंच दे ना उत्तर. माझ्यासाठीं गेला होता का हा नवस फेडायला ?"

हेमांगिनी रागानें बेफाम झाली. आधींच आजारी असलेली—त्यांतून हा खोट्या आरोपांचा मारा बसलेला – तणतणत ती कृष्णासमोर आली आणि काडकन त्याच्या थोबाडींत भडकावून म्हणाली, "हरामजादा चोर ! चोरी करायला तुला मी का शिकवलं ? इथं येऊं नको म्हणून किती वेळा तुला सांगितलं ? किती वेळ तुला इथून घालवून दिलं ? इथं येतोस, आडून आडून डोकावतोस, तो चोरी करायसाठींच अशी आतां खात्री झालीय माझी."

इतक्यांत घरची सगळी मंडळी येऊन हजर झाली होती. शिबू म्हणाला, "परवां रात्रीं हा तुमच्या खोलीसमोर काळोखांत उभा राहिलेला मी स्वतः

वडिल जाऊ म्हणाली, "आम्हीं त्याला खायला घालीत नाहीं—नुसता राबवतों—अन् तूं त्याला पोटाला घालून जगवलंयस, होय ?"

हेमांगिनीनें उत्तर दिलें, "होय, होय ! आजपर्यंत केव्हांसुद्धां तुम्हीं त्याला दोन वेळ पोटभर अन्न घातलं नाहीं. नुसती धरमार चाललीय आणि राबवून घेताहांत. तुमच्या भीतीनं मी त्याला येऊं नको म्हणून हजारवेळां सांगितलं – पण त्या बिचाऱ्याला भूक आवरत नाहीं. माझ्याकडे आलं कीं पोटभर खायला मिळतं म्हणून तो येतो धावत इथं—चोरी दरोडेखोरीचे धडे घ्यायला नव्हे ! पण तुम्हीं अशीं चांडाळ माणसं आहांत कीं तेंसुद्धां तुमच्यानं पहावत नाहीं !"

आतां मात्र दीरानें उत्तर दिलें. त्यानें कृष्णाला समोर ओढलें आणि धोतराच्या सोग्यांत त्यानें बांधून आणलेल्या केळीच्या पानाचा द्रोण बाहेर काढून दाखवून रागारागानें विचारलें, "आम्ही दुष्ट, आम्ही चांडाळ, आम्हांला कुणाचं बरं पहावत नाहीं. तें आतां तूंच पहा आपल्या डोळ्यांनीं ! तुला बरं वाटावं म्हणून माझे पैसे चोरून कुठल्याशा देवाची पूजा करून यानं हा प्रसाद आणलाय तो तुझ्या शिकवणीमुळंच ! घे हा !—" असें म्हणून त्यानें त्या द्रोणांतले एकदोन संदेश आणि फूलपत्री बाहेर काढून दाखवली.

भिवया वर चढवून कादंबिनी म्हणाली, "काय ग बाई तरी ! झांकलं माणिक—सैतानाची अवलाद—कावेबाज कारटं ! आतां तूंच सांग ना— कोणत्या मतलबानं यानं चोरी केली, त्याचं आतां तूंच दे ना उत्तर. माझ्यासाठीं गेला होता का हा नवस फेडायला ?"

हेमांगिनी रागानें बेफाम झाली. आधींच आजारी असलेली—त्यांतून हा खोट्या आरोपाचा मार बसलेला – तणतणत ती कृष्णासमोर आली आणि काडकन त्याच्या थोबाडींत भडकावून म्हणाली, "हरामजादा चोर ! चोरी करायला तुला मी का शिकवलं ? इथं येऊं नको म्हणून किती वेळा तुला सांगितलं ? किती वेळ तुला इथून घालवून दिलं ? इथं येतोस, आडून आडून डोकावतोस, तो चोरी करायसाठींच अशी आतां खात्री झालीय माझी."

इतक्यांत घरची सगळी मंडळी येऊन हजर झाली होती. शिवू म्हणाला, "परवां रात्रीं हा तुमच्या खोलीसमोर काळोखांत उभा राहिलेला मी स्वतः

त्यानंतर जवळ बसून उमेनें आपल्या आईचे डोळे आपल्या पदरानें पुशीत पुशीत सांगितलें, " प्रसन्नची आई किशामामाला ओढून बाहेर घेऊन गेली—"

यावर हेमांगिनी कांहीं बोलली नाहीं. ती तशीच तिथें पडून राहिली होती. दोनतीन वाजायच्या सुमाराला हिंव भरून तिला भयंकर ताप आला. बऱ्याच दिवसांनीं आजच ती पथ्याचें घ्यायला बसली होती—तें अजून तसेंच एका बाजूला पडून सुकून वाळून गेलें होतें.

संध्याकाळीं विपिन घरीं आला. त्या घरीं वहिनीच्या तोंडून सारा प्रकार कळल्यामुळें रागारागानें आपल्या बायकोच्या खोलींत तो येत होता, तोंच उमा त्याच्या जवळ आली आणि कुजबुजत म्हणाली, "—आईला ताप आलाय—बेशुद्ध झालीय !"

विपिन दचकून म्हणाला, " म्हणतेस काय ग ? आज तीनचार दिवस तर मुळींच ताप नव्हता !"

विपिनचें आपल्या बायकोवर अत्यंत प्रेम होतें. तें किती उत्कट होतें याचा पुरावा चार पांच वर्षांपूर्वी दादापासून विभक्त व्हायच्या वेळीं मिळाला होता. कासावीस होऊन तो खोलींत गेला—ती तशीच जमिनीवर पडलेली होती. घाबऱ्या घाबऱ्या त्यानें तिला उचलून बिछान्यावर ठेवलें. अंगाला हात लागतांच हेमांगिनीनें डोळे उघडून एक क्षणभरच आपल्या नवऱ्याकडे पाहिलें आणि एकदम त्याचे दोन्ही पाय धरून ती रडतरडत म्हणाली, " आधीं कृष्णाला आसरा द्या. नाहींतर माझा हा ताप कांहीं बरा व्हायचा नाहीं. आई दुर्गेचा कोप होईल माझ्यावर ! "

आपले पाय तिच्या हातून सोडवून घेऊन विपिन तिच्या बाजूला बसला आणि तिच्या माथ्यावरून हात फिरवीत तिची समजावणी करूं लागला.

हेमांगिनीनें विचारलें, " द्याल आसरा ? "

विपिनचे डोळे ओलावले होते. त्यानें ते पुसून घेऊन म्हटलें, " तूं म्हणशील तसं करीन—पण आधीं तूं बरी होऊन ऊठ."

त्यानंतर हेमांगिनी कांहीं बोलली नाहीं.

रात्रींच तिचा ताप निघाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं विपिनला तें कळलें तेव्हां त्याला फार आनंद झाला. रोजचें नित्यकृत्य आटोपून थोडासा अल्पाहार

त्यानंतर जवळ बसून उमेनें आपल्या आईचें डोळे आपल्या पदरानें शीत पुशीत सांगितलें, "प्रसन्नची आई किशामामाला ओढून बाहेर ऊन गेली—"

यावर हेमांगिनी कांहीं बोलली नाहीं. ती तशीच तिथें पडून राहिली होती. ोनतीन वाजायच्या सुमाराला हिंव भरून तिला भयंकर ताप आला. बऱ्याच देवसांनीं आजच ती पथ्याचें घ्यायला बसली होती—तें अजून तसेंच एका ाजूला पडून सुकून वाळून गेलें होतें.

संध्याकाळीं विपिन घरीं आला. त्या घरीं वहिनीच्या तोंडून सारा प्रकार कळल्यामुळें रागारागानें आपल्या बायकोच्या खोलींत तो येत होता, तोंच उमा त्याच्या जवळ आली आणि कुजबुजत म्हणाली, "—आईला ताप आलाय—बेशुद्ध झालीय!"

विपिन दचकून म्हणाला, "म्हणतेस काय ग? आज तीनचार दिवस तर मुळींच ताप नव्हता!"

विपिनचें आपल्या बायकोवर अत्यंत प्रेम होतें. तें किती उत्कट होतें याचा पुरावा चार पांच वर्षांपूर्वी दादापासून विभक्त व्हायच्या वेळीं मिळाला होता. कासावीस होऊन तो खोलींत गेला—ती तशीच जमिनीवर पडलेली होती. घाबऱ्या घाबऱ्या त्यानें तिला उचलून बिछान्यावर ठेवलें. अंगाला हात लागतांच हेमांगिनीनें डोळे उघडून एक क्षणभरच आपल्या नवऱ्याकडे पाहिलें आणि एकदम त्याचे दोन्ही पाय धरून ती रडतरडत म्हणाली, "आधीं कृष्णाला आसरा द्या. नाहींतर माझा हा ताप कांहीं बरा व्हायचा नाहीं. आई दुर्गेचा कोप होईल माझ्यावर!"

आपले पाय तिच्या हातून सोडवून घेऊन विपिन तिच्या बाजूला बसला आणि तिच्या माथ्यावरून हात फिरवीत तिची समजावणी करूं लागला.

हेमांगिनीनें विचारलें, "द्याल आसरा?"

विपिनचे डोळे ओलावले होते. त्यानें ते पुसून घेऊन म्हटलें, "तूं म्हणशील तसं करीन—पण आधीं तूं बरी होऊन ऊठ."

त्यानंतर हेमांगिनी कांहीं बोलली नाहीं.

रात्रींच तिचा ताप निघाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं विपिनला तें कळलें तेव्हां त्याला फार आनंद झाला. रोजचें नित्यकृत्य आटोपून थोडासा अल्पाहार

करून तो दुकानीं जायला निघाला होता. त्यावेळीं हेमांगिनी त्याच्या समोर आली आणि म्हणाली, " कालच्या मारानं कृष्णाला भारी ताप आलाय. त्याला मी इथं घेऊन येतें."

विपिन मनांतल्या मनांत चिडून संतापून म्हणाला, " इथं कशाला आणायला हवं त्याला ? आहे तिथंच राहूं दे."

हेमांगिनी स्तंभित झाली. एक क्षणभर तशीच राहून ती म्हणाली, " त्याला आसरा देऊं म्हणून काल रात्रींच तुम्ही मला वचन दिलं होतं ना ? "

हेटाळणीच्या झोकानें मानेला हिसडा देऊन विपिन म्हणाला, " हं: ! कोण तो असा, म्हणून त्याला आणून आम्हीं पोसायचं ? तुझं आपलं भलतंच कांहीं तरी.

कालरात्रीं तिची प्रकृति फार बिघडली होती म्हणून त्यानें जें कबूल केलें होतें, तें आज सकाळीं तिची प्रकृति बरी झाल्याचें दिसून येतांच त्यानें फेटाळून लावलें. छत्री बगलेला मारून तो उठून उभा राहिला आणि म्हणाला, " उगीच वेडेपणा करूं नकोस—दादाबिदा भारी संतापतील ! "

निश्चयाच्या वाणीनें हेमांगिनी म्हणाली, " दादाबिदा संतापले तर काय त्याचा खून करणार आहेत ?—कीं मी उद्यां त्याला घेऊन आलें तर या घरांत मला कोण नाहीं म्हणणार आहे ? आजवर दोन मुलं होतीं मला—उद्यांपासून तीं तीन होतील. यापुढं मी कृष्णाची आई ! "

" बरं बरं तें पुढचं पुढं पाहूं—" असें म्हणून विपिन जायला निघाला होता त्याच्या समोर येऊन उभी राहून हेमांगिनी म्हणाली, " त्याला इथं आणणार कीं नाहीं ? "

" चल चल, हा काय वेडेपणा ? " असें म्हणून विपिन तिच्यावर डोळे वटारून निघून गेला.

हेमांगिनीनें हांक मारली, " शिबू , एक बैलगाडी घेऊन ये. मी माहेरीं चाललें ! "

विपिननें तें ऐकलें. तो हंसत हंसत म्हणाला. " वा: घाबरवतेयस मला होय ? "

त्यानंतर तो दुकानीं गेला.

चंडीमंडपाच्या एका कोपऱ्याला एका फाटक्या चटईवर कृष्णा पडला होता. त्याला सडकून ताप भरला होता. त्याचें अंग ठणकत होतें. छातींतल्या दु:खीमुळें तो बेहोष होऊन पडला होता.

हेमांगिनीनें साद घातली, " कृष्णा ! "

कृष्णा जसा कांहीं तयारच होता—तसाच तडक उठून उभा राहिला आणि उद्गारला, " ताई ! "

त्याच क्षणाला त्याचें कोमेजलेलें तोंड उजळून उठलें—लाजवटपणें तो हंसत होता—जसा कांहीं त्याला तापबीप कांहीं आला नव्हता. मोठ्या उत्साहानें एकदम उठून तो उभा राहिला आणि धोतराच्या सोग्यानें ती फाटकी चटई झाडून घेऊन म्हणाला, " बैस."

त्याचा हात धरून हेमांगिनीनें त्याला आपल्या हृदयाशीं कवटाळलें आणि म्हटलें, " आतां इथं बसायचं नाहीं दादा, चल माझ्याबरोबर ! आजच्या आज तुला तुझ्या गांवीं पोचवलं पाहिजे."

" चल ! " असें म्हणून कृष्णानें आपली मोडकी काठी बगलेला मारली आणि फाटका पंचा खांद्यावर टाकला.

दारांत बैलगाडी उभी होती. कृष्णाला घेऊन हेमांगिनी गाडींत बसली.

गाडी गांवाच्या सीमेच्या बाहेर पोंचून पुढें निघाली त्यावेळीं मागून कुणीतरी ओरडत हाका मारीत आहे, असें पाहून गाडीवाल्यानें गाडी थांबवली. धांवतां धांवतां घामाघुम झालेला विपिन गाडीजवळ येऊन पोहोंचला. त्यानें घाबरून विचारलें. " कुठं चाललीस ? "

कृष्णाकडे बोट करून हेमांगिनी म्हणाली, " याच्या गांवीं. "

" केव्हां येणार ? "

निश्चयाच्या स्वरानें हेमांगिनीनें गंभीरपणें उत्तर दिलें, " देव जेव्हां घरीं परत पाठवील तेव्हां. "

" म्हणजे ? "

पुन: कृष्णाकडे बोट करून हेमांगिनी म्हणाली, " याची कधीं कुठं सोय लागेल—कधीं कुठं याला आसरा मिळेल—तेव्हांच मी स्वत: फिरून परत घरीं येईन. नाहींतर याच्याच सांगाती राहिलं पाहिजे मला ! "

त्या दिवशीं तिची मुद्रा अशीच झाली होती, तिच्या आवाजांत असाच कठोरपणा होता,—विपिनला तें आठवलें. मोती कुंभाराच्या निराधार भाच्याची बाग वांचवण्यासाठीं साऱ्या गांवाविरुद्ध जाऊन ज्यावेळीं ती उभी राहिली होती त्यावेळीं तिची वृत्ति अशीच झाली होती. त्याला आठवलें, ही हेमांगिनी ती नव्हे.—डोळे वटारून गप्प बसवतां येईल अशी ती आपली रोजची बायको ही नव्हे !

विपिन थंडावून म्हणाला, " माफ कर—चल आतां घरीं. "

हेमांगिनी हात जोडून म्हणाली, " तुम्हींच माफ करा मला. हातीं घेतलेलं काम पुरं केल्याशिवाय मी पुनः घराचा उंबरटा चढायची नाहीं. "

आपल्या बायकोच्या शांत आणि निश्चयपूर्ण मुद्रेकडे कांहीं वेळपर्यंत विपिन मुकाट्यानें पहात राहिला होता.

कृष्णाचा हात धरून तो म्हणाला, " कृष्णा, बाळ, तुझ्या ताईला घेऊन आतां तूंच ये घरीं भाई. आज मी शपथ घेतों—या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुम्हां दोघां बहीणभावांत मी अंतराय आणणार नाहीं. ये भाई—तुझ्या ताईला घेऊन ये ? "

